# बालमन

लेखक

म. का. कारखानीस, बी. ए.

माजी प्रिन्सिपाल, ट्रेनिंग कॉलेज, धुळें



कर्नाटक पब्लिशिंग हाऊस, मुंबई, २

किंमत १॥ रुपया

# प्रस्तावना

—०—

'बालमन' या विषयावर इंग्रजी भाषेंत कितीतरी पुस्तकें लिहिलेलीं आहेत. यांपैकीं कांहीं पुस्तकें सामान्य वाचकांकरितां अगदीं सोप्या भाषेंत व मनोरंजक पद्धतीनें लिहिलेलीं आहेत. अशाच प्रकारचें एखादें पुस्तक मराठी भाषेंत लिहावें अशी फार इच्छा होती. 'वऱ्हाडशालापत्रका'चे उत्साही व तरुण संपादक रा. वाळके यांच्या आग्रहानें मीं त्यांच्या मासिकांत बालमनावर एक लेखमाला प्रसिद्ध केली. ही लेखमाला शिक्षकांना व पालकांना आवडली. या लेखमालेंत बरीच सुधारणा करून व पुष्कळ भर घालून प्रस्तुतचें पुस्तक तयार केलें आहे. विषय सोपा व मनोरंजक व्हावा म्हणून शक्य तितका प्रयत्न केला आहे. पुष्कळ ठिकाणीं द्विरुक्ति झालेली आढळेल, पण मानसशास्त्रावरील पुस्तकांत अशी द्विरुक्ति टाळणें शक्य नसतें. प्रस्तुत पुस्तक प्रसिद्ध करण्याचें काम कर्नाटक प्रेसचे मालक, माझे मित्र रा. मंगेशराव यांनीं अंगावर घेतलें नसतें, तर तें इतक्या लवकर व इतक्या सुंदर स्वरूपांत दिसलें नसतें. रा. मंगेशरावांच्या या साहाय्याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहें.

हें पुस्तक लिहितांना मीं अनेक इंग्लिश व अमेरिकन लेखकांच्या कृतींचा उपयोग केला आहे. त्या सर्वांचे अंतःकरणपूर्वक आभार मानणें हें माझें कर्तव्य आहे.

माझी ही कृति जर वाचकांना आवडली, तर माझ्या श्रमाचें चीज झालें असें मी समजेन.

क्लेश फलेनहि पुनर्नवतां विधत्ते ।

'निवास'<br>
डेक्कन जिमखाना<br>
पुणें २४।१।३८

म. का. कारखानीस

# अनुक्रमणिका





—x—

# बालमन

## भाग पहिला

### मनुष्याची बाल्यावस्था

मनुष्याच्या आयुष्याचे बाल्य तारुण्य, प्रौढावस्था व वार्धक्य असे चार भाग करतां येतील. मनुष्याच्या आयुष्याच्या पहिल्या सोळावर्षांच्या आंतील काळाला बाल्य असें मानतात. या नंतरचा पुढचा वीस वर्षांचा काळ हा त्याच्या तारुण्याचा काळ होय. पुढील पंधरा वर्षांच्या काळाला प्रौढावस्थेचा काळ असें म्हणतात. या नंतरचा काळ हा वार्धक्याचा काळ होय.

मनुष्याच्या तारुण्याला व प्रौढावस्थेला प्रारंभ केव्हां होईल व ही प्रत्येक अवस्था किती वर्षें टिकेल हें सर्वस्वीं त्याच्या मानसिक व शारीरिक शक्तीवर अवलंबून राहतें. कांहीं माणसें आपल्या वयाच्या ३५ व्या वर्षीच म्हातारीं दिसूं लागतात, त्यांचे केस पिकूं लागतात व दांत पडूं लागतात. त्यांच्या चेहऱ्यावर सुरकुत्या दिसूं लागतात. त्यांच्यामध्यें शारीरिक किंवा बौद्धिक काम नेटानें करण्याची शक्ति व उत्साह हीं उरत नाहींत. उलट पक्षीं कांहीं माणसांची शरीरप्रकृति व मानसिक शक्ति साठाव्या वर्षीही इतकी चांगली असते कीं, तिचा तरुणाला देखील हेवा वाटावा. प्रत्येक माणसाची शरीरप्रकृति व मानसिक शक्ति यांजवर, त्याच्या तारुण्याची व प्रौढावस्थेची सुरवात केव्हां होईल व ही प्रत्येक अवस्था किती काळ टिकेल हें अवलंबून राहील आणि म्हणूनच वर दिलेला या अवस्थांचा सुरवातीचा काळ व टिकण्याचा अवधि हे साधारण अनुमानानें दिलेले आहेत. उष्ण कटिबंधांतील लोकांच्या तारुण्याचा, प्रौढावस्थेचा व वार्धक्याचा प्रारंभ समशीतोष्ण कटिबंधांतील लोकांच्या पेक्षां अधिक लवकर होतो. समशीतोष्ण देशांतील आयुर्मर्यादा देखील उष्णं देशांतील लोकांच्या आयुर्मर्यादेपेक्षां जास्त असते आणि म्हणू-

नच त्यांच्या तारुण्याचा व प्रौढावस्थेचा अवधिही उष्ण देशांतील लोकांच्या तारुण्याच्या व प्रौढावस्थेच्या अवधीपेक्षां जास्त असतो.

मनुष्याची बाल्यावस्था साधारणपणें सोळा वर्षें टिकते हें वर सांगितलेंच आहे. (बाल आषोडशाद्वर्षात्-नारद) बाल्याच्या पूर्वार्धाला शैशव असें म्हणतात. अर्थातच शैशव म्हणजे मनुष्याच्या आयुष्याच्या पहिल्या आठ वर्षांचा काळ होय.

मनुष्यप्राणी हा सर्व प्राण्यांत श्रेष्ठ आहे. सर्व प्राण्यापेक्षां त्याला बुद्धि जास्त असल्यामुळें तो सर्व जगावर व प्राण्यांवर आपला अंमल चालवितो; ही गोष्ट जरी खरी आहे, तरी बालपणीं मनुष्यप्राण्यासारखा दुर्बल प्राणी दुसरा कोण-ताही नसतो. पुष्कळसे प्राणी जन्मल्याबरोबर आपल्या जीवनाला आवश्यक असे व्यवसाय करूं लागतात. गाईचें वासरूं जन्मास आल्याबरोबर उभें राहतें, चालतें व गाईच्या सडाला लागतें. लवकरच पळणें, खेळणें, उड्या मारणें, अंग चाटणें इत्यादि त्याचे व्यवहार सुरू होतात. मासा अंड्यांतून बाहेर पडल्याबरोबर त्याच्या आयुष्यक्रमाला अवश्य असे व्यवहार तो करूं लागतो. त्याची शरीररचना जन्मतांच बहुतेक पुरी झालेली असते. त्याला आपले व्यवहार चालविण्यास दुसऱ्या कोणाची जरूर लागत नाहीं. अंड्यांतून बाहेर पडल्याबरोबर अळी पानें खाण्याचें आपलें काम सुरू करिते. हें काम ती सारखें कांहीं दिवस करीत राहाते. नंतर ती कोशावस्थेस जाते. कोंबडीचीं पिलें दाणे टिपणें, धांवणें, पळणें वगैरे व्यवहार जन्मापासूनच करूं लागतात. कांहीं थोडे दिवस तीं आपल्या आईच्या आश्रयाला असतात, पण लवकरच तीं आपले सर्व व्यवहार आईच्या मदतीशिवाय स्वतंत्रपणें करूं लागतात. कुत्र्याचीं व मांजराचीं पिलें यांचे डोळे उघडण्यास बरेच दिवस लागतात. पण महिन्याच्या आंतच हीं पिलें आईच्या मदतीशिवाय इकडे तिकडे धावूं पळूं लागतात व पुढें थोड्याच महिन्यांनीं त्यांची व त्यांच्या आईची ओळख देखील राहात नाहीं.

मनुष्याच्या बालकाची स्थिति इतर प्राण्यांच्या पिलांप्रमाणें नसते. मासा किंवा अळी यांच्या प्रमाणें जन्मतांच त्याचीं सर्व इंद्रियें आपले व्यापार करूं शकत नाहींत. कुत्र्यांच्या किंवा मांजरांच्या पिलांप्रमाणें बालक थोड्याच दिव-

सांत आपल्या आईच्या मदतीशिवाय आपले व्यवहार करूं शकत नाहीं. पहिले चार पांच महिने तर मुलाला या कुशीवरून त्या कुशीवरही होतां येत नाहीं. सहा सात महिन्यांचें झाल्यावर मूल सरकूं लागतें व रांगूं लागतें. मूल साधारणपणें नऊ दहा महिने आईच्या अंगावर पीत असतें. यानंतर आई त्याला गाईचें दूध पाजूं लागते व अन्न भरवूं लागते. मूल तीन चार वर्षांचें झाल्याशिवाय त्याला आपल्या हातानें जेवतां येत नाहीं. मुलाला स्नान घालणें, त्याचे कपडे धुणें, त्याचा पोषाक करणें, त्याला स्वच्छ ठेवणें वगैरे कामें आईलाच तीन चार वर्षें करावीं लागतात व पुढेंही आणखी कांहीं वर्षें यांपैकीं कांहीं कामें बालकाकरितां तिलाच करावीं लागतात. पहिले तीन चार महिने मुलांच्या स्नायूंना सामर्थ्य नसल्यामुळें व त्यांना कसें चलन द्यावें याचें ज्ञान त्याला नसल्यामुळें हात पसरणें, वस्तु हातांत घेणें ह्या सारख्या साध्या क्रियाही त्याला करितां येत नाहींत. मुलाच्या स्नायूंत हळूहळू शक्ति येते व या स्नायूंना चलन देऊन क्रिया कशी करावी याचें ज्ञानही मुलाला सावकाश मिळत जातें. स्नायूंना सामर्थ्य देण्याचें व त्यांची चपलता वाढविण्याचें काम बालपणांत व तारुण्यांत देखील चाललेलें असतें. मनुष्याचा मेंदू जन्मतांच अगदीं अपूर्ण स्थितींत असतो. त्याची वाढ व विकास हीं हळूहळू होतात. मेंदूची वाढ व विकास हीं जसजशीं जास्त होत जातात तसतशी मनुष्याची विचारशक्ति व ज्ञानसंपादन करण्याचें सामर्थ्य हीं वाढत जातात.

सोळा वर्षांनंतर जरी मनुष्याच्या तारुण्यास सुरुवात होते, तरी त्याची शरीररचना यावेळीं अगदीं पूर्ण झाली असें म्हणतां येत नाहीं. त्याच्या मेंदूचा पूर्ण विकास होण्याला आणखी काळ लागतो.

मुलाचीं पहिलीं पांच वर्षें घरींच आईबापाच्या व कुटुंबांतील इतर माणसांच्या संगतींत जातात. या पांच वर्षांत मूल कितीतरी गोष्टी शिकतें. ६ व्या वर्षीं तें शाळेंत जातें. लिहिणें, वाचणें, चित्रें काढणें, अंकगणित, हातकाम वगैरे कामें तें शाळेंत शिकतें. नंतर तें दुय्यम प्रतीच्या शाळेंत जातें. एथेंच साधारणपणें गरिब स्थितींतील मुलाचा अभ्यासक्रम संपतो. कलाकौशल्य, धंदा, विद्या वगैरे शिक्षणांत मनुष्याच्या आयुष्याचीं कितीतरी वर्षें जातात. शारीरिक सामर्थ्य व चपलता हींही मनुष्य शिक्षणानेंच संपादन करतो. शिक्षण

संपादन करण्याचा मनुष्यप्राण्याचा हा काळ इतर कांहीं प्राण्यांच्या प्रमाणें अगदींच मर्यादित नसतो.

मानवी समाज जसजसा सुधारत जातो, तसतसा हा शिक्षणाचा काळही वाढत जातो. सुधारलेल्या देशांत तर मुलाच्या वयाच्या पंधरा-सोळा वर्षेपर्यंत त्याला सक्तीचें प्राथमिक शिक्षण देतात. यानंतर त्याला विद्या, कला, कौशल्य, धंदा वगैरे शिकण्याकरितां आणखी कांहीं वर्षे घालावीं लागतात.

मनुष्यप्राणी बालपणीं इतका दुर्बल कां असतो व त्याच्या बाल्याचा काळ इतका दीर्घ कां असतो या दोन गोष्टी विचार करण्याजोग्या आहेत. वरवर पाहिलें असतां आपणांस असें वाटतें कीं, परमेश्वराचा या कामीं मोठा अन्याय आहे. परमेश्वरानें कृपाळू होऊन इतर प्राण्यांना ज्या देणग्या दिल्या आहेत त्या मनुष्यप्राण्यास त्यानें दिल्या नाहींत. यामुळेंच मनुष्यप्राणी बाळपणीं सर्वस्वी आपल्या आईबापांवर व वडील माणसांवर अवलंबून राहातो. पण जरा बारकाईनें विचार करून पाहिलें असतां, आहे हीच स्थिति मनुष्याला फार उपकारक आहे असें ध्यानांत येईल. मनुष्यप्राणी जन्मतांच दुर्बळ असल्या-मुळें व त्याच्या बाल्याचा काळही दीर्घ असल्यामुळें त्याची आजपर्यंतची सुधारणा झाली आहे व त्याला सृष्टींत आजची बहुमानाची जागा प्राप्त झाली आहे.

जगांतील, मनुष्याखेरीज बहुतेक इतर प्राण्यांचा आयुष्यक्रम ठरलेला असतो. त्यांत फारच थोडा फरक होण्याचा संभव असतो. माशाचें सर्व आयुष्य पाण्यांत जावयाचें असतें. ठरलेल्या काळीं ठरलेल्या गोष्टी त्याला करावयाच्या असतात. खाणें शोधून काढणें, शत्रूपासून बचाव करणें, अंडीं घालणें इत्यादि ठराविक कामेंच माशाला करावयाचीं असतात. या ठराविक कामांतच त्याचें आयुष्य जातें. इतर पशु व कीटक यांचाही सामान्यतः ठरा-विक असाच आयुष्यक्रम असतो असें म्हणण्यास हरकत नाहीं.

मनुष्यप्राण्याचा आयुष्यक्रम असा ठराविक व यांत्रिक नसतो. त्याच्या आयुष्यक्रमांत फार विविधता असते. त्याचें राहण्याचें ठिकाणही एकच नसतें. तो कांहीं दिवस थंड हवेंत राहील, तर कांहीं दिवस समशीतोष्ण हवेंत राहील, तर कधीं कधीं तो उष्ण हवेंत राहील. त्याच्या भोंवतालची परिस्थितिही

सारखी बदलत असते व त्या परिस्थित्यनुरूप त्याला आपला आयुष्यक्रम बदलावा लागतो. पशुपक्षी व कीटक यांप्रमाणें त्याचीं कर्तव्येंही मर्यादित नसतात. त्याला अनेकविध गोष्टी करावयाच्या असतात. शास्त्रें, विद्या, कलाकौशल्य, धंदा, व्यापार यांचें ज्ञान त्याला मिळवायचें असतें. मनुष्यप्राण्याच्या भोंवतालची परिस्थिति बदलत असते. या बदलत्या परिस्थितीप्रमाणें वर्तन ठेवण्याचें ज्ञान व कौशल्य मनुष्यांत नसेल, तर तो प्रतिकूल परिस्थितीच्या तडाक्यांत सांपडेल व त्याचा नाश होईल.

ज्या प्राण्याचा मेंदू व शरीररचना हीं जन्मतांच बहुतेक पूर्ण झालेलीं असतात किंवा थोड्याच कालांत पूर्ण होतात, त्यांचा आयुष्यक्रम अगदीं ठराविक असतो व त्यांच्या परिस्थितींतही फारसा फरक होत नाहीं. त्यांच्या आयुष्यक्रमाला अगदीं आवश्यक असें उपजत ज्ञान परमेश्वरानें त्यास दिल्यामुळें या प्राण्यांचें आयुष्य व्यवस्थितपणें चाललेलें असतें. मधमाशीला मेण व मध गोळा करणें, पोळें बांधणें इत्यादि कृतींना लागणारें ज्ञान जन्मतांच मिळालेलें असतें. त्यामुळें तिचा आयुष्यक्रम सुरळित चालतो. प्राण्याच्या भोंवतालची परिस्थिति जर त्याच्या आयुष्यांत एकसारखी बदलत असेल, त्याला करावयाचीं कामें अनेक व बहुविध असतील, तर त्याचा मेंदू व शरीररचना पूर्ण होण्यास जन्मल्यानंतर बराच काळ लागतो. हा नियम सर्वांशीं नाहीं, तरी बव्हंशी खरा आहे. या नियमानुसार मनुष्याची शरीररचना व मेंदू पूर्ण होण्यास जन्मानंतर पुष्कळ काळ लागतो.

एकंदरींत विचार करून पाहिलें असतां असें दिसतें कीं, जर प्राण्याला ठरलेल्या परिस्थितींतच राहावयाचें असेल व ठरलेल्या प्रकारेंच जर त्याचें आयुष्य जाणार असेल, तर त्या प्राण्याची शरीररचना व मेंदू हीं जन्मतांच पूर्ण झालेलीं असतात. या प्राण्याला बालपणीं आईच्या मदतीची जरूर लागत नाहीं. किडे, मासे, बेडूक, झुरळ वगैरे प्राणी या प्रकारचे असतात. पशूंचा आयुष्यक्रम किड्याप्रमाणें अगदींच ठराविक नसतो; त्यांची परिस्थिति थोडीफार बदलत असते. या कारणानें पशूंपैकीं कांहींची–उदाहरणार्थ कुत्रा, मांजर वगैरेंची शरीररचना जन्मतांच अपुरी असते व कांहींची जरी पूर्ण असते, तरी आपल्या आईच्या आश्रयाला राहून आयुष्यक्रमाला उपयुक्त

अशा क्रिया त्यांना शिकाव्या लागतात. पक्ष्यांचाही आयुष्यक्रम अगदीं ठराविक नसतो. त्यांना भिन्न भिन्न परिस्थितींत आपलें आयुष्य घालवावें लागतें. यामुळें पक्ष्यांचीं पिलें जन्मतांच अगदीं अपूर्ण स्थितींत असतात व दुर्बळ असतात. त्यांचें संगोपन करण्याला आई व बाप–नर व मादी–यांना कष्ट करावे लागतात. दोघें मिळून पिलांकरितां घरटें बांधतात. मादी अंडीं उबवीत असतां नर तिला खावयास आणून देतो अगर आपण अंड्यांवर बसून तिला भक्ष्यशोधार्थ जाऊं देतो. पिलें अंड्यांतून बाहेर पडल्यावर त्यांना खाऊं घालण्याचें व त्यांचें रक्षण करण्याचें काम आई व बाप दोघेंही करीत असतात. अशाप्रकारें नर व मादी दोघें मिळून, पिलांना पंख फुटून तीं स्वतंत्रपणें उडून जाईतोंपर्यंत, त्यांचें संगोपन व रक्षण करितात. कांहीं पक्ष्यांत पिलांना पंख फुटून तीं घरट्यांतून उडून जाईतोंपर्यंत नर व मादी यांचा सहवास टिकतो. परंतु कांहीं पक्ष्यांचीं नर मादी मरेतोंपर्यंत एकमेकांना सोडीत नाहींत. एवढेंच नव्हे तर जोडप्यांतील एक मेल्यास दुसराही दुःखानें प्राण सोडतो.

कीटकांत अपत्यसंगोपनाची व संरक्षणाची जबाबदारी आई किंवा बाप यांपैकीं कोणीही पतकरीत नाहींत. पशूंमध्यें ही जबाबदारी आईवरच असते. कांहीं जातींचे वानर व हत्ती यांत ही जबाबदारी मादीबरोबर नरही पतकरीत असतो. पक्ष्यांमध्यें पिलांच्या संगोपनाचें काम आई व बाप दोघेंही करितात.

मनुष्यांचें बालक जन्मतांच अतिशय दुर्बळ असतें व त्याच्या बाळपणाचा काळही फार दीर्घ असतो हें आपण पाहिलेंच आहे. बालकाच्या दुर्बळपणामुळें व त्याच्या बाल्यावस्थेचा काळ फार मोठा असल्यामुळें त्याच्या संगोपनाची जबाबदारी आई व बाप या दोघांवर येते. मनुष्यप्राण्यांतील आई व बाप या दोघांच्याही अंतःकरणांत परमेश्वरानें अपत्यप्रेमाची भावना दृढ ठेविली आहे. यामुळें मानवी समाजाच्या अर्धवट रानटी स्थितींतही आई व बाप हीं दोघेंही अपत्यप्रेमानें बांधलीं गेलीं व एकत्र राहूं लागलीं. मुलाकरितां वाटेल तो स्वार्थत्याग करण्याची दोघांचीही प्रवृत्ति असल्यामुळें दोघेंही अपत्यसंगोपनाकरितां व अपत्यसंरक्षणाकरितां अनेक प्रकारचे कष्ट करूं लागलीं. अशा प्रकारें मानवी समाजांत गृहस्थाश्रमाला प्रारंभ झाला. या अपत्यप्रेमामुळेंच

पति व पत्नी हीं एकत्र राहूं लागलीं. मनुष्याच्या अंतःकरणांत प्रेम, सहानुभूति, आदर, पूज्यभाव, कृतज्ञता वगैरे अनेक उच्च मनोवृत्तींचें बीज ठेविलें आहे. त्यांचा विकास व परिपोष होण्याला या गृहस्थाश्रमाची फार मदत झाली आहे. या उच्च मनोवृत्तींच्या विकासामुळेंच मनुष्याची आध्यात्मिक सुधारणा होत गेली. आपल्या मुलाला सुख लाभावें याजकरितां पति व पत्नी कष्ट करून संपत्ति उत्पादन करूं लागलीं व साठवूं लागलीं. संपत्तीच्या आशेमुळें मनुष्यप्राण्याची भौतिक सुधारणा होत गेली. त्याच्या ज्ञानांत भर पडत गेली व तो सुधारणेच्या निरनिराळ्या अवस्थांतून पुढें जात चालला. सारांश, अपत्यप्रेम हें सर्व मानवी समाजाच्या सुधारणेचें बीज आहे. बालक जन्मतांच अतिशय दुर्बल असल्यामुळें व त्याच्या बाल्याचा काळ फार मोठा असल्यामुळेंच आई व बाप यांनीं गृहस्थाश्रम स्वीकारून अपत्यसंगोपनाची जबाबदारी पतकरली व या कालापासून मनुष्याच्या आध्यात्मिक व भौतिक सुधारणेस प्रारंभ झाला.

आपण वर पाहिलेंच आहे कीं, बाल्य हा शिक्षणाचे दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा काल आहे. या वयांत मुलाला जें शारीरिक, बौद्धिक व नैतिक शिक्षण मिळतें त्याजवरच त्याचें पुढील आयुष्य अवलंबून असतें. मुलाला शिक्षण देणें म्हणजे मुलांत बीजरूपानें ज्या शारीरिक व मानसिक शक्ति आहेत त्यांचा योग्य विकास करणें होय. मुलांच्या शिक्षणाचें काम आईबाप व शिक्षक यांना करावयाचें असतें. बालमनाच्या स्वरूपाची व त्याच्या कार्याची थोडीशी तरी माहिती असल्याशिवाय बालशिक्षणाचें हें पवित्र व महत्त्वाचें कार्य समाधानकारक रीतीनें पार पडणें शक्य नाहीं. मुलाचा शैशवावस्थेचा काळ तर फारच महत्त्वाचा असतो. याच काळांत शारीरिक, बौद्धिक व नैतिक शिक्षणाचा पाया घातला जातो. या वयांत बालमनाचें स्वरूप कसें असतें, त्याचा विकास कसा होत जातो व तें कार्य कसें करतें याचा थोडक्यांत या पुस्तकांत विचार करण्याचें योजलें आहे. पुढील भागांत छोट्या बाबूच्या बारशापासून त्याच्या मनाच्या विकासाच्या वर्णनास प्रारंभ केला आहे.

# भाग २ रा

## ज्ञानार्जनाची सुरुवात

दहा वाजले होते. घरांत मंडळी जेवावयास बसली होती. छोट्या बाबूचें बारसें कालच झालें होतें. आज सकाळींच त्याला आंघोळ घालून निजविलें होतें. बाजेवर स्वच्छ अंथरूण केलें होतें. त्यावर बाबू खुशाल झोपला होता. शेजारीं त्याची आईहि पडली होती. इतक्यांत बाबूची झोप पुरी झाली. त्यानें डोळे उघडले. स्वारी कांहीं वेळ स्वस्थ पडली होती. मग त्यानें थोडा वेळ हातपाय हालविले. इतक्यांत त्याला भूक लागली. नंतर स्वारीनें आधीं हळू व मग मोठ्यानें रडण्यास प्रारंभ केला. भूक लागली कीं रडावें म्हणजे आई आपणास पाजील, ही कल्पना लहान्या बाबूला नव्हती. हें त्याला कळतहि नव्हतें. भूक लागल्यावर रडण्याची ही बाबूची क्रिया अगदीं साहजिकपणें घडत होती. आईनें बाबूचें रडें ऐकिलें व ती उठून बसली. तिनें बाबूला उचललें, मांडीवर घेतलें व पोटाशीं धरलें. तिच्या मऊ, उबदार व मांसल स्तनाचा स्पर्श बाबूचे गालास होतांच तो तोंडांत धरण्याकरितां बाबूनें आपलें तोंड इकडे तिकडे हलविण्यास सुरुवात केली. आईनें माई तोंडांत घालतांच बाबूनें चोखण्यास सुरुवात केली व आपली चिमुकली मिटलेली मूठ आईचे स्तनावर ठेविली. दूध तोंडांत जातांच बाबूचे चेहऱ्यावर संतोष दिसूं लागला, लवकरच बाबूची भूक शमली व स्वारी झोपीं गेली.

सर्व दिवस व रात्र झोप घ्यावी, मधून मधून जागें व्हावें, भूक लागली कीं रडावें, आईनें पोटाशी धरलें कीं पिण्यास सुरवात करावी; भूक थांबली कीं थोडा वेळ हातपाय हलवावे व झोपीं जावें, ऊन पाणी अंगास लागलें कीं रडावें, अंगाखालचें अंथरूण भिजलें किंवा बाजेखालील शेगडीची जास्त उष्णता लागली कीं गळा काढावा असा बाबूचा आयुष्यक्रम आहे. नेत्र, कर्ण, जिव्हा वगैरे ज्ञानेंद्रियें जरी परमेश्वरानें त्याला दिलीं आहेत, तरी त्यांच्या योगानें त्याला बाह्यजगाचें ज्ञान होत नाहीं. उजेडाकडे तो डोळे फिरवितो व झगझगीत उजेड त्याच्या दृष्टीसमोर धरला तर तो डोळे मिटतो. मोठा आवाज झाला तर तो बिचकतो. कडू पदार्थ जिभेवर ठेवला, तर तो तोंड वेडें वाकडें करतो व रडतो. फार ऊन किंवा गार पदार्थ अंगाला लागला तर तो रडतो. आईच्या

मांडीवर निजून स्तनपान करितांना तिच्या उबदार स्पर्शानें त्याला समाधान वाटतें. एवढेंच काय तें त्याच्या ज्ञानेंद्रियांचें सध्यांचें कार्य आहे. त्याच्या नाकाला चांगला अथवा वाईट वास बिलकूल कळत नाहीं. त्याचें रुधिराभिसरण, श्वासोच्छ्वास व पचनक्रिया या व्यवस्थितपणें चालू आहेत. त्याच्या मुठी नेहमीं मिटलेल्या असतात आणि त्या मुठींत जर आपण आपलें बोट घातलें, तर तो तें घट्ट आवळून धरितो, पण ही कृति स्वाभाविकपणेंच त्याच्या हातून घडते. त्याला ही कृति आपण करीत आहों असें वाटतही नाहीं व ही कृति कशी करावी ह्याचें ज्ञानही त्याला नाहीं. त्याच्या तोंडांत आपण जर बोट घातलें व त्यास जर भूक लागलेली असली, तर तें बोट तो चुरूचुरू चोखतो, पण बोट चोखून भूक शमली नाहीं कीं तो रडावयास प्रारंभ करतो.

बाबूचें सध्याचें आयुष्य अगदीं परस्वाधीन आहे व आणखी कांहीं काळ तें तसेंच राहणार. त्याच्या सर्व मानसिक व शारीरिक शक्ति बीजरूपानें त्याच्यांत आहेत. त्यांचा विकास क्रमाक्रमानें हळूहळू योग्य कालीं होत जाईल.

सध्यां बाबूला बाह्यजगाचें बिलकूल ज्ञान नाहीं. त्याला डोळ्यांसमोर कांहीं तरी दिसतें व कानावर निरनिराळे आवाज अस्पष्टपणें ऐकूं येतात, पण आपल्या डोळ्यांसमोर अमुक एक पदार्थ धरला आहे, अगर आपणाला ऐकूं येत असलेला आवाज माणसाचा अथवा पदार्थाचा आहे हेंहि त्यास कळत नाहीं.

मनुष्याच्या कृति व व्यापार यांचा आपण एथें थोडासा विचार करूं म्हणजे बाबूच्या सध्यांच्या क्रिया कोणत्या प्रकारच्या आहेत हें आपणांस सांगतां येईल. मनुष्याचें हृदय, श्वसनेंद्रियें व जठर यांचें कार्य निरंतर व अखंड सुरू असतें. मनुष्य जन्मास आल्यापासून तों मरेपर्यंत त्याच्या शरिरांत रुधिराभिसरण, श्वसन व पचन या क्रिया एकसारख्या सुरू असतात. या क्रियांवर मनुष्याचा ताबा नसतो. त्या क्रिया त्याला आपल्या इच्छेप्रमाणें थांबवितां येत नाहींत किंवा त्या थांबल्या असतां त्याला आपल्या इच्छेनें सुरू करितां येत नाहींत. मनुष्य सावध असो कीं बेसावध असो, त्याच्या शरीरांतील हे तीन व्यापार एकसारखे सुरू असतात. मनुष्याच्या जीवनाला अतिशय आवश्यक अशा या तीन क्रिया साहजिकपणें एकसारख्या चालू असतात, ही गोष्ट मनुष्य-

प्राण्याच्या जीवनाच्या दृष्टीनें अतिशय हितकारक आहे. अर्थातच जेव्हां आपण मनुष्याच्या व्यापारांचा किंवा क्रियांचा विचार करितों तेव्हां साहजिक होणाऱ्या या क्रियांचा विचार करणें अवश्य नाहीं. कारण यांजवर कोणत्याही प्रकारें मनुष्याचें नियंत्रण नाहीं.

आपल्या डोळ्यांसमोर कोणीं बोट आणिलें अगर एखादा पदार्थ आणिला अगर आला तर झटकन् आपण आपले डोळे मिटतों. आपल्या नाकांत कांहीं गेलें, तर आपणांस लागलींच शिंक येते. आपल्या घशांत कांहीं गेलें, तर आपणास खोकला येतो, अगर ठसका येतो. आपल्या अंगास कंड आली, तर लागलींच आपण आपलें अंग खाजवितों. या क्रिया करण्यास आपणांस विचार करावा लागत नाहीं. या क्रिया अतिशय झटकन् आपल्या हातून घडतात. डोळ्यांसमोर पदार्थ येण्याचें कारण घडलें कीं डोळे मिटण्याचें कार्य ताबडतोब घडतें. नाकांत कांहीं कण शिरण्याचें कारण घडलें कीं शिंक येण्याचें कार्य ताबडतोब घडतें. शरीराच्या रक्षणाकरितांच डोळे मिटणें, शिंक येणें, खोकला येणें इत्यादि क्रिया घडत असतात. या क्रिया करण्यांत मनुष्यांना विचार बिलकूल करावा लागत नाहीं. अगदीं लहान मुलांच्या देखील या क्रिया होत असतात. अशा प्रकारच्या क्रियांना प्रतिक्षेपात्मक क्रिया किंवा प्रतिक्षिप्त क्रिया असें म्हणतात. या क्रिया करण्यास विचार करावा लागत नाहीं. कारण घडलें कीं या क्रिया कार्य म्हणून ताबडतोब होतात. शरिराच्या कोणत्या तरी एका भागाकडून प्रतिक्षिप्त क्रिया होत असते. शरिराच्या रक्षणार्थच या क्रिया घडतात. या क्रिया कोणताहि हेतु मनांत धरून किंवा विचार करून मनुष्यप्राणी करीत नाहीं; आणि म्हणूनच यांना अहेतुक क्रिया असें म्हणतात. या क्रिया मनुष्याप्रमाणें इतर प्राणीही करितात.

आतां तिसऱ्या प्रकारच्या क्रियांचा आपण विचार करूं. या क्रियाहि प्राणीमात्राच्या जीवनाच्या रक्षणार्थ सर्व प्राण्यांना जन्मापासूनच करितां येतात. या क्रिया प्राण्यांना न शिकवितांच जन्मापासून करितां याव्या अशी ईश्वरी योजना आहे. या क्रिया प्राण्यांना जन्मापासूनच करतां न आल्या, तर प्राणी भराभर मरतील. चोखणें, गिळणें, पिणें, शरिराला सुखदायक अशा गोष्टींकडे वळणें, शरिराला दुःखदायक अशा गोष्टीपासून दूर सरणें इत्यादि क्रिया या

प्रकारांत येतात. मुलें, वासरें, हरणें, कोंकरें जन्मल्यावर थोड्याच वेळांत आईचें दूध पिऊं लागतात. पक्ष्याचीं पिलें जन्मल्यानंतर आईबापांनीं चोंचींनीं तोंडांत घातलेलें अन्न गिळूं लागतात. या कृतीमुळें त्यांचें पोषण होतें. मूल अंगाला गार अगर उष्ण पदार्थ लागला, तर रडूं लागतें. त्याचें रडें ऐकून आई त्याला तेथून हलविते. पिणें, खाणें, गिळणें वगैरे स्वाभाविक होणाऱ्या या क्रिया बालकाच्या पोषणाकरितां अगदीं आवश्यक आहेत. त्या लहान मुलें व प्राण्यांचीं बालकें जन्मतांच अगदीं साहजिकपणें अथवा स्वाभाविकपणें करितात. या क्रिया करितांना मुलांना किंवा प्राण्यांच्या बालकांना विचार करावा लागत नाहीं. कोणताही हेतु मनांत धरून मुलें या क्रिया करीत नाहींत; कारण त्यांना या वयांत कशाचेंच ज्ञान नसतें. म्हणूनच खाणें, पिणें, चोखणें, गिळणें वगैरे क्रियांना स्वाभाविक क्रिया म्हणतात. या क्रियाहि अहेतुक म्हणजे कोणताहि हेतु मनांत धरून केलेल्या नसतात.

एखादा हेतु मनांत धरून विचारपूर्वक जी क्रिया केली जाते तिला सहेतुक क्रिया असें म्हणतात. आठ वर्षांचा मधुकर खेळतां खेळतां दमला. त्याला भूक लागली. घरांत आईनें सकाळीं लाडू व चिवडा करून ठेवला आहे हें त्याला आठवलें. स्वारी आईकडे गेली. तोंड वाईट करून आईला मधोबा म्हणाले, 'आई मला फार भूक लागली आहे. तुझा सैंपाक होण्यास अजून कितीतरी वेळ आहे. आम्हांला कांहीं तरी खावयास दे.' मधुकरानें नळावर जाऊन हातपाय धुतले व तांब्या पाण्यानें भरून आणला. त्यानें आपला पाट मांडला व समोर ताटली ठेवली. आईनें त्या ताटलींत एक लाडू व थोडा चिवडा वाढला. मधोबानें ते पदार्थ तेव्हांच संपविले व फुलपात्रभर पाणी पिऊन स्वारी आंचविण्यास गेली. घरांत भांडें ठेवून मधोबा पुन्हां खेळण्यास गेले. मधुकरानें भूक शमविण्याकरितां ही जी सर्व कृति केली ती हेतु धरून विचारपूर्वक केलेली आहे; म्हणूनच मधूची ही कृति सहेतुक आहे. मधूचें हें सर्व करणें सहेतुक क्रियेचें उदाहरण आहे. गोविंदरावांची पत्नी राधाबाई माहेरीं गेली होती. सकाळीं ९ वाजेतोंपर्यंत गोविंदरावांनीं लिहिण्याचें काम केलें. नंतर जेवण्याचा विचार त्यांच्या मनांत आला. आतां आपण स्वयंपाक करण्यास लागलों, तर कचेरींत जाण्यास आपणांला उशीर होईल

असें त्यांना वाटलें. त्यांनीं स्नान केलें व पैसे खिशांत घालून खाणावळीचा रस्ता पकडला. खाणावळींत गेल्यावर मालकाला पैसे देऊन ते जेवावयास बसले. या ठिकाणींहि गोविंदरावाची ही सर्व क्रिया हेतुपुरःसर व विचारपूर्वक झाली आहे, म्हणून ही क्रियाहि सहेतुक क्रिया आहे. रामूला संध्याकाळीं इटीदांडू खेळावयास जावयाचें आहे. इटीदांडू तर घरांत नव्हता. मग रामूनें एक चांगलें वाटोळें लाकूड शोधून काढलें. घरांतून कोयता आणून त्यानें त्या लाकडाचा एक सुंदर दांडू बनविला. मग लहानशी इटीहि त्यानें तयार केली. रामूनें केलेली ही सर्व क्रिया हेतूनें व विचारपूर्वक केली आहे, म्हणून या क्रियेला सहेतुक क्रिया असें म्हणतां येईल. सहेतुक क्रिया कांहींतरी हेतु मनांत धरून केलेल्या असतात. त्यांत करणाराला विचार करावा लागतो व त्या करण्याची कर्त्याच्या अंगांत चपलता व शक्ति असावी लागते.

आतां बाबूच्या सध्यांच्या क्रिया कोणत्या प्रकारांत येतात हें पाहूं. त्याचें रुधिराभिसरण, श्वसन व पचन या क्रिया अव्याहत चाललेल्या आहेत. या क्रिया सहज किंवा स्वाभाविकपणें घडतात आणि या सर्व क्रियांवर मनुष्याचें नियंत्रण नसल्यामुळें श्वसनादि क्रियांना स्वाभाविक अहेतुक क्रिया म्हणतात हें आपण पाहिलें आहे. डोळे मिटणें, शिंकणें, खोकणें इत्यादि क्रिया बाबू करितो. या क्रियांना प्रतिक्षिप्त क्रिया म्हणतात व त्या अहेतुक असतात हेंही आपण पाहिलें आहे. भूक लागली असतां स्तन ओढणें, दूध गिळणें वगैरे क्रिया बाबू करितो. पण या क्रिया अहेतुक व स्वाभाविक आहेत -हेंही आपण पाहिलेंच आहे. बाबूला चवथ्या प्रकारच्या म्हणजे सहेतुक क्रिया मात्र करितां येत नाहींत. कारण ह्या क्रिया करण्याला ज्ञान लागतें, तें बाबूला नाहीं. त्या क्रिया करण्याला शरिराच्या अवयवांना जी चपलता व शक्ति लागते, ती बाबूंत नाहीं. हळूहळू बाबूला ज्ञान मिळेल व क्रिया करण्याची चपलता, हुशारी व शक्ति त्याच्या आंगीं येईल. ही गोष्ट कशी होईल हें आपणांस पाहावयाचें आहे.

लहान मुलाच्या ज्ञानाला सुरवात त्याच्या शारीरिक सुखदुःखांमुळें व शारीरिक गरजांमुळेंच होते. बाबू झोपेंतून जागा होतो, रडतो, लगेच आईचा आवाज त्याला ऐकूं येतो, आईचें तोंड त्याला दिसतें, तिच्या हाताचा त्याला स्पर्श होतो, तिच्या स्तनाचा स्पर्श त्याच्या ओठांस होतो, मग त्याला दूध

घ्यावयास मिळतें. याच गोष्टी याच क्रमानें दिवसा व रात्रीं रोज घडत असतात. त्यांतील एक गोष्ट झाली कीं तिच्या पाठोपाठ दुसरी घडते. अशी स्थिति कांहीं दिवस सारखी चालल्यावर बाबूला कांहीं दिवसांनीं आईच्या आवाजाचें ज्ञान होऊं लागतें. आरंभीं कांहीं दिवस हें ज्ञान अस्पष्ट असतें व नंतर तें स्पष्ट होतें. आईचा आवाज ऐकल्यावर तो रडें थांबवितो. आतां आई आपणाला घेऊन पाजील हा विचार त्याच्या चिमुकल्या डोक्यांत येतो. आईचा चेहराही हळूहळू ओळखूं लागतो. अर्थातच ही आपली प्रेमळ आई आहे ही कल्पना कांहीं त्याच्या मनांत नसते. आईचा चेहरा दिसला कीं आतां आपणाला दूध मिळेल हीच कल्पना त्याच्या मनांत येते. आई दररोज बाबूला स्नानाकरितां बाजेवरून उचलून उघडा करिते, मग ती त्याला मांडीवर घेऊन त्याच्या अंगाला व डोक्याला तेल चोळते. मग ती त्याला ऊन पाण्यानें आंघोळ घालते. ही स्नानाची कृति रोज याचप्रकारें घडत असते; व या कृतींतील अंगांतील कपडे काढणें, मांडीवर घेणें, तेल लावणें, ऊन पाणी घालणें, अंग पुसणें, पुन्हां कपडे घालून बाजेवर निजविणें इत्यादि क्रिया एकामागून एक अशा सारख्या अनुक्रमानें होत असतात. कांहीं दिवसांनीं या क्रियांची अस्पष्ट कल्पना बाबूला येऊं लागते. आईनें कपडे काढले कीं ती आतां अंगाला तेल चोपडणार व ऊनपाणी घालणार ही गोष्ट बाबूच्या लक्षांत येते. तेल चोळण्यानें त्याला बरें वाटतें, म्हणून तेल चोळण्याकरितां मांडीवर घेतल्यावर तो गप्प बसतो. ऊन पाणी त्याला आवडत नाहीं म्हणून पाणी अंगावर पडण्याचे आधींच तो रडण्याची सुरवात करितो. अशा प्रकारें भूक व स्नान या शरिराला अत्यावश्यक ज्या क्रिया त्यांच्याच योगानें आईचा आवाज, तिचा चेहरा, तिचा स्पर्श, ऊन पाणी इत्यादि गोष्टींचें प्रथम अस्पष्ट, नंतर स्पष्ट असें ज्ञान बाबूला होतें. तीन महिन्यांनंतर बाबू आईचा चेहरा स्पष्ट ओळखूं लागतो व ती जवळ आली कीं, तो आनंदानें हातपाय हलवूं लागतो.

शारीरिक सुखदुःखांमुळें व शारीरिक गरजांमुळेंच मुलांच्या ज्ञानार्जनाला कशी सुरवात होते हें आपण आतां पाहिलें. आतां त्यांच्या शारीरिक हालचालींचा आपण विचार करूं. हातपाय हलविण्याची क्रिया मुलें जन्मल्यानंतर कांहीं दिवसांनीं करूं लागतात. ही क्रियाहि कोणताही हेतु मनांत न

धरितां किंवा विचार न करितां होत असते आणि म्हणूनच ही हातपाय हलविण्याची क्रिया अहेतुक व स्वाभाविक आहे. या क्रियेनें मुलाला व्यायाम मिळतो व त्याच्या पचनास मदत होते. या क्रियेनें त्याच्या हाताच्या व पायाच्या स्नायूंची शक्ति वाढते. या स्वाभाविक व अहेतुक क्रियेचें रूपांतर सहेतुक चलनवलनांत घडतें. बाबू सहा महिन्यांचा झाल्यावर त्याच्या आईनें त्याचे डोळ्यांपुढें एक रंगित खुळखुळा धरला. त्याचा तो रंग पाहून बाबू त्याच्याकडे पाहूं लागला. आईनें त्याच्या मुठींत तो खुळखुळा दिला. बाबूनें पहिल्यानें तो तोंडांत घातला. त्याच्या तोंडाला तो टणक लागला व त्याला चवहि लागली नाहीं. तेव्हां हा खावयाचा पदार्थ नाहीं असें समजून बाबूनें तो तोंडाच्या बाहेर काढला. हात सहज हलवितांना तो खुळखुळा वाजला. त्याचा आवाज ऐकून बाबूला आनंद वाटला. पुन्हां त्यानें आपला हात हलविला. पुन्हां तो वाजला. मग बाबूनें हात हालवून तो खुळखुळा वाजविण्यास सुरवात केली. आपणांस खुळखुळा वाजवितां येतो हें पाहून त्याला आनंदहि वाटला. दुसऱ्या दिवशीं आईनें तोच खुळखुळा बाबूचे मुठींत दिला. कालची थोडीशी आठवण त्याला होतीच. त्यानें हात हलवून तोच खुळखुळा वाजविण्यास सुरवात केली. आतां बाबूची ही क्रिया सहेतुक झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. तिसऱ्या दिवशींहि त्यानें तो वाजविला. बाबूला तो खुळखुळा वाजविण्याची गोडी लागली. अशा प्रकारें खुळखुळ्याचा रंग, त्याचा आवाज, त्याचा आकार, यांचें ज्ञान बाबूला झालें व या ज्ञानाची प्रतिमा त्याच्या चिमुकल्या मेंदूवर उमटली. खुळखुळा वाजवितांना तो कसा हलवावा या क्रियेचें ज्ञानहि त्याला झालें व ही क्रिया आतां त्याला करितां येऊं लागली. यानंतर बाबूला वस्तु हातांत धरतां येऊं लागली. पुढें तो पोटानें जमिनीवर सरकूं लागला. एकदां त्याच्या थोरल्या बहिणीनें एक जपानी रंगित बाहुली त्याचेपुढें ठेविली. पण ती दूर असल्यामुळें त्याला ती हातांत घेतां येईना. मग स्वारी हळूहळू पोटानें पुढें सरकली, तरी ती बाहुली त्याच्या हातांत आली नाहीं. मग बाबूरावची स्वारी आणखी पुढें सरकली. मग मात्र बाहुली हातांत आली. बाबूरावाला अतिशय आनंद झाला. ती बाहुली प्रथम त्यानें तोंडांत घातली. पण ती गोड न लागल्यामुळें त्यानें ती तोंडाबाहेर काढली व ती हातांत धरून खुळखुळ्याप्रमाणें वाजविण्याचा त्यानें यत्न

केला; पण ती बाहुली खुळखुळ्याप्रमाणें वाजेना. मग बाबूराव हिरमुसले होऊन त्या बाहुलीकडे पहात स्वस्थ पडले.

बाबूला पोटानें पुढें सरकतां येऊं लागल्यापासून त्याच्या ज्ञानांत भर पडूं लागली. तो पुढें सरकून वस्तु हातांत घेतो, ती घेऊन डोळ्यांसमोर धरतो, ती तोंडांत घालतो, ती हलवून पाहतो. हा त्याचा उद्योग सारखा चाललेला असतो. या त्याच्या उद्योगामुळें वस्तूचा रंग कसा आहे, ती खाण्याजोगी आहे कीं नाहीं, ती टणक आहे कीं मऊ आहे, तिचा आवाज होतो कीं नाहीं इत्यादि गोष्टी हळूहळू त्याच्या लक्षांत येऊं लागल्या आहेत. भांड्यावर बाहुली आपटून भांड्याचा आवाज काढण्यांत व खुळखुळा वाजविण्यांत त्याला फार मौज वाटते. नवीन नवीन कृतिहि तो हळूहळू करण्यास शिकत आहे.

मूल आपले नेत्र, कर्ण, स्पर्श, रसना, हात यांच्या योगानें ज्ञान मिळवितें. तें ज्ञान मिळविण्यास त्याची स्वतांची कृति फार उपयोगी पडते. तें रांगूं लागलें किंवा पोटानें सरकूं लागलें कीं, त्याच्या ज्ञानांत जास्त भर पडण्याला सुरवात होते. तें चालूं लागलें कीं, ज्ञानार्जनाचें त्याचें काम फार झपाट्यानें चालूं लागतें.

मनुष्याच्या कृति ४ प्रकारच्या असतात. त्यांपैकीं पहिल्या तीन अहेतुक असतात, व चवथी सहेतुक असते. मुलांच्या कृति प्रारंभीं अहेतुक असतात. सहेतुक क्रिया करणाराला ती क्रिया कशी करावी याचें ज्ञान लागतें व ती क्रिया करण्यांची चपलता व सामर्थ्य त्याच्या आंगीं असावें लागतें. पण या दोन्हीही गोष्टी प्रारंभीं मुलांत नसल्यामुळें त्यांना सहेतुक क्रिया करितां येत नाहीं हें आपण या दुसऱ्या भागांत पाहिलें.

## भाग ३ रा

## ज्ञानार्जनाचें कार्य

मुलाच्या ज्ञानाला सुरवात कशी होते याचें थोडेंसें दिग्दर्शन मागील भागांत केलें आहे. मुलाची ज्ञान मिळविण्याची क्रिया कशी चालते, व मूल आपल्यां ज्ञानांत भर कशी घालतें, हें आतां आपण या भागांत पाहूं.

मघाशीं मी टेबलावर लिहीत होतों. हवेच्या झुळकीबरोबर मला कांहीं तरी वास आला, व मीं हा वास गुलाबाच्या फुलांचा आहे, हें ताबडतोब ओळखलें. माझी ही ज्ञान मिळविण्याची क्रिया कशी झाली हें पाहूं. गुलाबाच्या फुलांतील अतिशय सूक्ष्म असे परमाणु हवेंत पसरले व त्यांपैकीं कांहीं माझ्या नाकांत शिरले. तेथील ज्ञानतंतूंवर त्यांनीं आघात करतांच ती बातमी ज्ञानतंतूंनीं माझ्या मेंदूस कळविली, व कशाचा तरी वास येत आहे अशी जाणीव माझ्या मनास झाली. गुलाबाच्या फुलांचा पूर्वी मीं अनेक वेळां वास घेतल्यामुळें त्या वासाचें मला पुरें ज्ञान झालेलें होतें. या अनुभवाच्या व ज्ञानाच्या साहाय्यानें मला येत असलेला हा वास गुलाबाच्या फुलांचा आहे, हें मला ताबडतोब कळलें. काल मी असाच लिहीत बसलों असतां मला कांहीं तरी आवाज ऐकूं आला. मीं आपलें लक्ष तिकडे दिलें. तेव्हां तो आवाज पेटीचा आहे व पेटीवर कोणीतरी भैरवी राग वाजवीत आहे हें मला समजलें. आतां ही ज्ञान मिळविण्याची क्रिया कशी झाली हें पाहूं. पेटींतून निघणाऱ्या ध्वनीनें भोंवतालच्या हवेंत लाटा उत्पन्न केल्या. त्या पसरत पसरत माझ्या कानापर्यंत येऊन पोहचल्या व माझ्या कानांतील ज्ञानतंतूंवर त्या आदळल्या. त्यांचा आघात झाल्याबरोबर ज्ञानतंतूंनीं ही बातमी माझ्या मेंदूस कळविली, व त्याबरोबर कांहींतरी आवाज होत आहे ही जाणीव माझ्या मनास झाली. पेटीचा आवाज मीं अनेक वेळां ऐकल्यामुळें हा आवाज पेटीचा आहे हें ज्ञान मला झालें. भैरवीचे स्वर मीं पुष्कळ वेळां ऐकल्यामुळें मला त्यांचें ज्ञान झालें होतें. या पूर्वज्ञानामुळें व अनुभवामुळें पेटीवर कोणीतरी भैरवी राग वाजवीत आहे हें मला लागलींच समजलें. याचप्रमाणें वस्तूचा स्पर्श, स्पर्शेंद्रियाला झाला म्हणजे तेथील ज्ञानतंतु ती बातमी माझ्या मेंदूला कळवितात, व कांहीं तरी स्पर्श होत आहे ही जाणीव माझ्या मनाला होते. तशा प्रकारच्या स्पर्शांचा जर मला अनुभव झाला असेल, तर डोळे मिटूनही मला हा पदार्थ अमुक आहे असें समजतें. नेत्रेंद्रियानें पाहिलेल्या व जिव्हेनें चाखलेल्या पदार्थांचेंही ज्ञान मला याच प्रकारें होतें.

नाक, डोळे, कान या ज्ञानेंद्रियांवर अनुक्रमें परिमाणूंचा, प्रकाशलहरींचा, व ध्वनीनें उत्पन्न झालेल्या हवेच्या लहरींचा आघात होऊन कांहींतरी आघात झाला आहे अशी मनास जाणीव होते. त्याचप्रमाणें त्वचेवर व जिव्हेवर

पदार्थांचा स्पर्श झाल्याबरोबरही कांहींतरी आघात झाला आहे अशी मनास जाणीव होते. अशाप्रकारें ज्ञानेंद्रियांवर आघात होऊन कांहींतरी आघात झाला आहे अशी जी जाणीव मनास होते तिला संवेदन असें म्हणतात. संवेदन झाल्यावर मन त्या आघात करणाऱ्या वस्तूकडे जास्त लक्ष देतें. मनांत पूर्वी सांठलेलें ज्ञान व पूर्वीचा अनुभव यांच्या साहाय्यानें ज्ञानेंद्रियांवर आघात होणाऱ्या गोष्टींचें मनाला मग स्पष्ट ज्ञान होतें.

आतां आपण लहान मुलांच्या ज्ञान मिळविण्याच्या पद्धतीकडे वळूं. मुलांच्या ज्ञानेंद्रियांची शक्ति हळूहळू वाढत जाते. संवयीनें व शिक्षणानें ज्ञानेंद्रियांच्या शक्तीची वाढ होते. ही वाढ जसजशी होत जाते तसतसें त्यांचें बाह्य जगाचें ज्ञान मिळविण्याचें काम जास्त जास्त समाधानकारक होत जातें. पूर्वज्ञान व अनुभव मुलांना नसल्यामुळें ज्ञानेंद्रियांवर आघात करणाऱ्या वस्तूंचें मोठ्या माणसाला जें ज्ञान होतें तें लहान मुलाला होणें शक्य नाहीं. एका एक वर्षाच्या मुलानें घड्याळ पाहिलें व त्याच्या वडिलानें तेंच घड्याळ पाहिलें. दोघांच्या नेत्रेंद्रियांवर एकाच जातीच्या प्रकाशलहरींचा आघात झाला व दोघांच्या कानावर हवेंत झालेल्या एकाच जातीच्या लहरी आदळल्या. तरी बापलेकाच्या घड्याळाच्या ज्ञानांत फार फरक पडेल. मुलाला घड्याळ हा टिक्‌टिक् करणारा व चमकणारा पदार्थ आहे एवढेंच ज्ञान होईल. बापाला पूर्व अनुभव व ज्ञान असल्यामुळें हें घड्याळ वेळ दाखवितें, याला तीन काटे आहेत, सेकंद-कांटा झरझर चालला आहे, हें घड्याळ चांदीचें आहे, हें मनगटावर बांधण्याचें रिस्टवॉच आहे, वगैरे किती तरी ज्ञान होईल. प्रौढ मनुष्य व लहान मूल यांच्या ज्ञानार्जनाच्या पद्धतींतील हा भेद पुष्कळ वेळां शिक्षकांच्या व वडील माणसांच्या लक्षांत येत नाहीं. त्यांना असें वाटतें कीं, आपल्या ज्ञानेंद्रियांनीं ज्याप्रमाणें एखाद्या वस्तूचें आपणाला झटकन व विविध प्रकारचें ज्ञान होतें, त्याचप्रमाणें आपल्या लहान मुलालादेखील झालें पाहिजे; आणि तसें न झालें कीं, त्यांना वाटतें कीं या आपल्या मुलाला अक्कलच अगदीं कमी आहे.

ज्या गोष्टी शारीरिक सुख देतात त्यांजकडे वळण्याची व ज्या गोष्टींपासून शरिराला दुःख होतें त्यांजपासून दूर होण्याची साहजिक प्रवृत्ति प्राणिमात्राच्या

ठिकाणीं ईश्वरानें त्याच्या कल्याणार्थ ठेविली आहे. यामुळें ज्या गोष्टींशीं शारीरिक सुखदुःखाचा संबंध येतो त्यांचेंच ज्ञान मुलाला आधीं होतें. आई, दूध, स्नानाचें पाणी, डोळ्यांत घालावयाचें काजळ यांचें ज्ञान याच कारणामुळें मुलाला फार लवकर होतें, हें आपण मागील भागांत पाहिलेंच आहे. मुलांच्या अंगीं जिज्ञासा ही सहज-प्रवृत्ति परमेश्वरानें त्यांच्या कल्याणार्थ ठेवलेली असते. तिचा उदयही जन्मल्यानंतर थोड्याच महिन्यांनीं होतो. या प्रवृत्तीची ज्ञान मिळविण्याच्या कामीं मुलाला फार मदत होते. मुलाचा ज्ञान मिळविण्याचा क्रम कसा चालतो हें पाहण्यासाठीं आपण कांहीं उदाहरणें घेऊं.

बाबूची ६ वर्षांची थोरली बहीण विमला त्याच्याजवळ बाहुल्या घेऊन खेळत होती. बाबू पाळण्यांत जागाच होता. विमलनें आपली रबराची बाहुली बाबूच्या हातांत दिली. ती पाहून त्याला गंमत वाटली. त्यानें ती बाहुली हातांत धरून खूप इकडे तिकडे हलविली. ती बाबूच्या डोळ्याला लागली. तिचा स्पर्श बाबूला आनंददायक वाटला. ती त्याला मऊ मऊ लागली. विमलला ती बाहुली पाहिजे होती म्हणून तिनें ती रबरी बाहुली बाबूच्या हातांतून काढून घेतली व तो रडूं नये म्हणून त्याच्या हातांत आपली रंगीत लाकडी बाहुली दिली. बाबूनें तिच्याकडे पाहिलें. मग ती तोंडांत घालण्याचा प्रयत्न केला; पण ती तोंडांत कांहीं जाईना. मग हातांत धरून इकडे तिकडे त्यानें ती खूप हलविली. ती त्याच्या डोक्याला लागली. लगेच बाबूरावानें त्या दुःखानें रडण्याला प्रारंभ केला. अशाच प्रकारचे आणखी कांहीं अनुभव आल्यावर बाबूरावला मऊ व कठीण यांचें हळूहळू ज्ञान होत गेलें. अर्थात्च ह्या दोन प्रकारच्या पदार्थांतील फरकासंबंधीं त्याचें ज्ञान फारसें स्पष्ट नव्हतें. एकदां बाबू खेळत असतांना विमल जवळ आली. तिच्या हातांत एक रंगीत पुस्तक होतें. तें तिनें तेथेंच टाकिलें व आईनें हाक मारली म्हणून ती निघून गेली. बाबूला अद्याप बसतां येत नव्हतें व रांगतांही येत नव्हतें. पडल्या पडल्याच स्वारी हातपाय हालवीत खेळत असे. ताईचें तें रंगीबेरंगी पुस्तक पाहून बाबूरावचें लक्ष त्या पुस्तकाकडे गेलें. त्यानें तिकडे वळून हात लांब करून तें पुस्तक घेतलें. मग बाबूरावला फार आनंद झाला. तें पुस्तक त्यानें डोळ्यांसमोर धरलें. त्याचा कोपरा तोंडांत घालून तें पुस्तक लाळेनें त्यानें भिजविलें; मग इकडे तिकडे तें खूप हालविलें. ताई धांवतच आली.

तिनें तें पुस्तक त्याच्या हातांतून घेतलें. आईनें बाबूला पाळण्यांत ठेविलें. आज पाळण्यावर आईनें हिरव्या तांबड्या कापडाच्या मजेच्या चिमण्या व राघू टांगले होते. बाबूरावचें लक्ष तिकडे गेलें. हात हालवून हालवून त्यानें त्या चिमण्या व ते राघू धरण्याचा यत्न केला; पण ते दूर असल्यामुळें त्याच्या हातांत येईनात. अशाच प्रकारचे अनुभव आल्यावर बाबूरावला हळूहळू, 'दूरचा व जवळचा' यांतील अंतर कळूं लागलें. बाबू रांगूं लागल्यावर तर 'दूरचा व जवळचा' हें ज्ञान त्यास जास्त चांगलें झालें व जवळच्या वस्तु धरतां येतात, लांबच्या वस्तूंकडे रांगत जावें लागतें, हेंही ज्ञान त्यास झालें. प्रथम नुसत्या दृष्टीनें बाबूला जवळचा व दूरचा यांतील फरक दिसत नसे. सरकूं लागल्यावर त्याला हा फरक हळूहळू कळूं लागला.

बाबूनें एकदां पाळण्यांत खेळतां खेळता आपल्या पायाचा आंगठा धरला व तो तोंडांत घालण्याचा त्यानें यत्न केला, पण तो तोंडांत कांहीं जाईना. या वेळीं बाबूच्या हाताला स्पर्श होत होता, व आंगठ्यालाही स्पर्श झाल्याचें त्याला कळत होतें. एखादी वस्तु हातांत धरली कीं, तिचा एकाच जागीं स्पर्श होतो व ती वाटेल तशी हलवितां येते. शरिराचा एखाद्या भागाला स्पर्श झाला कीं, दुहेरी स्पर्श होतो, व शरिराचा हा भाग इतर वस्तूप्रमाणें हलवितां येत नाहीं, हा अनुभव नेहमीं येत असल्यामुळें बाबूरावला स्वतांच्या शरिराचें ज्ञान हळूहळू होऊं लागलें. आठव्या महिन्यांत बाबूला दांत येऊं लागले, तेव्हां त्याला पदार्थ हिरड्यांत धरून चावावा असें वाटे. ताईनें एकदां आपलें बोट त्याच्या तोंडांत घातलें. बाबूला ताईचें बोट चावण्यांत मौज वाटली. ताईनें आपलें बोट काढून घेतलें, व तिनें बाबूचेंच बोट त्याच्या तोंडांत घातलें आणि म्हणाली, 'लबाडा, चाव पाहूं आतां कसा चावतोस तो.' बाबूनें आपलें बोट चावलें; पण त्याला वेदना झाल्याबरोबर त्यानें तें बाहेर काढलें. पुन्हां ताईनें त्याचें बोट त्याच्या तोंडांत घातलें, पण तो मग आपल्या बोटाला चावला नाहीं. अशा प्रकारें आपलें बोट व दुसऱ्याचें बोट हा भेद बाबूच्या लक्षांत आला. स्वतांचें शरीर व इतर पदार्थ हे भिन्न आहेत हें ज्ञान बाबूला अशाच-प्रकारच्या अनुभवानें हळूहळू प्राप्त झालें.

दररोजच्या अनुभवानें बाबूला प्रथम आईच्या आवाजाचें ज्ञान झालें. नंतर तिचा चेहरा हळूहळू लक्षांत येऊं लागला. आई उभी असो अगर बसलेली

असो, ती पांढरें पातळ नेसो अगर काळें लुगडें नेसो, तिनें निरनिराळा पोषाक केला, तरी बाबू तिला ओळखूं लागला. प्रथम प्रथम त्याला आई व काकी यांतील फरक त्याच्या लक्षांत येत नसे. मग हळूहळू हा फरक लक्षांत येऊं लागला. आई आपणाला पाजते व पोटाशीं धरते, काकी आपणाला पाजीत नाहीं, काकीचा आवाज व चेहराही आईच्या चेहऱ्यापेक्षां व आवाजापेक्षां भिन्न आहेत, हें त्याला कळूं लागलें. आईनें हाक मारली कीं तो हातपाय हालवून व हसून आपला आनंद दाखवी. काकीनें हांक मारली तर फक्त तो तिच्या तोंडाकडे पाही. बाबू आठ महिन्यांचा असतांना एकदां त्याची आई जेवावयास तिच्या नातेवाइकाच्या येथें गेली. ती गेली तेव्हां बाबू पाळण्यांत निजला होता. जेवावयाचें तयार नसल्यामुळें घरीं परत यावयास तिला बराच वेळ लागला. इकडे बाबूराव जागे झाले. चुलतीनें गाणें गाऊन व झोका देऊन त्याला निजविण्याचा प्रयत्न केला; पण तो कांहीं केल्या निजेना. तेव्हां त्याला भूक लागली असेल असें समजून तिनें त्याला बाहेर काढलें व त्याला मांडीवर घेऊन अंगावर पाजण्याचा प्रयत्न केला. पण बाबूनें तिच्या तोंडाकडे पाहतांच 'ही आपली आई नाहीं' हें ओळखलें व चुलतीच्या अंगावर न पितां आपलें रडण्याचें काम सुरू ठेवलें. बिचाऱ्या काकीनें बाबूला शांत करण्याकरितां किती प्रयत्न केले! पण बाबूरावचें रडें थांबेना. अखेरीस बाबूरावची आई आली, तिनें त्याला मांडीवर घेतलें व पोटभर पाजलें. मग बाबू आनंदानें खेळूं लागला.

बाबूला आरंभीं बाबा, काका व आजोबा यांतील भेद देखील कळत नव्हता. बाबा त्याला नेहमीं मांडीवर घेत, खांद्यावर टाकून इकडे तिकडे त्याला खेळवीत. ते त्याला चिऊ, माऊ, काऊ दाखवीत, बाजारांत व दुसरीकडे हिंडावयास नेत. यामुळें त्याला बाबांचा आवाज ओळखतां येऊं लागला व त्यांचा चेहराही त्याच्या ओळखीचा झाला. बाबू सातआठ महिन्यांचा झाला तेव्हां तो बाबास, काकास व आजोबास बरोबर ओळखूं लागला. बाबा जवळ आले कीं हसूं लागे व त्यांच्याजवळ जाण्यासाठीं चळवळ करी. काका व आजोबा जवळ आले तर तो त्यांच्याशीं हसत असे, पण त्यांच्याजवळ जात नसे.

बाबूच्या घरीं एक सुंदर पांढरी गाय होती व तिचें एक वासरूं होतें. आई-

बाबा, काकी, विमल त्याला गाईजवळ नेत व त्याला ती दाखवीत व ही हम्मा आहे असें सांगत. बाबूचा हात त्या गाईवर ठेवीत. ती गाय फार गरीब असे. हळूहळू त्या गाईची भीति बाबूला वाटेनाशी झाली. तो तिला ओळखूं लागला. 'हम्माकडे चल, हम्मा कोठें आहे,' म्हटलें तर तो गोठ्याकडे बोट दाखवी. या वेळीं तो आठ-नऊ महिन्यांचा होता. गाईची त्याची कल्पना मात्र अस्पष्ट होती. तो बैलालाही हम्मा म्हणे. एकदां रस्त्यांत एक गाढव होतें. तें विमलनें त्याला दाखविलें व त्याला म्हटलें, 'बाबू, हें काय आहे.' बाबू म्हणाला, 'मा'. विमल आईला म्हणाली, 'आई, हा बाबू बघ गाढवालाही हम्मा म्हणतो'. बाबू घोड्यालाही हम्माच म्हणत असे.

बाबूला घोडा, गाढव, बैल व गाय यांतील भेद कळावयाला कितीतरी दिवस लागले. दीड वर्षाचा झाल्यावरही तो एकदां घोड्याला हम्मा म्हणाला. त्यावर त्याचे वडील म्हणाले, 'आमचा बाबू फार शहाणा आहे. बाबू, ही का तुझी हम्मा!' मग सगळीच मंडळी हसूं लागली. बाबूला ही मंडळी कां हसतात हें मुळींच कळेना. तो त्यांच्याकडे पाहूं लागला व आपणही हसूं लागला. बाबूला मनी मांजर फार आवडत असे. तिचा 'मिआव मिआव' शब्द त्याच्या चांगलाच ओळखीचा झाला होता. बाबू नऊ महिन्यांचा झाल्यावर त्याला आई दूधभात खावयास घाली. मनी जवळच बसत असे व सारखी 'मिआव मिआव' करीत असे. आईनें मनीला घांस घातला कीं, ती तो चटकन खाऊन टाकीत असे व पुन्हां 'मिआव मिआव' करीत आईकडे व बाबूकडे पाही. या निकट सहवासामुळें मनी बाबूच्या चांगलीच ओळखीची झाली. एकदां दुसरेंच एक मांजर आलें. तें पाहून बाबू 'माव' असें म्हणाला. मोत्या कुत्राही बाबूच्या चांगल्या ओळखीचा झाला. बाबू त्याला 'यू यू' म्हणत असे. एके दिवशीं अंगणांत एक शेळी आली. बाबू जरी या वेळीं एक वर्षाचा झाला होता, तरी तो शेळी व कुत्रा यांतील भेद ओळखत नव्हता. त्यानें ती शेळी पाहून 'यू यू' असें म्हटलें. शेजारींच विमल होती. बाबूचें हें बोलणें ऐकून ती हसूं लागली. ती म्हणाली 'वेडारे वेडा! आमचा बाबू शेळीलाच 'यू यू' म्हणतो.'

कृतीनें ज्ञान वाढतें व ज्ञानानें कृति चांगली करितां येते, असा कृति व ज्ञान यांचा परस्पर संबंध आहे. जेव्हां बाबू अगदीं लहान होता व बाजेवर

किंवा अंथरुणावर तो पडून असे, व जेव्हां त्याला हातांत वस्तु धरतां येत नसे अथवा ती हलवितां येत नसे, त्यावेळीं त्याच्या ज्ञानार्जनाची गति फार थोडी होती. जेव्हां त्याला वस्तु हातांत धरतां येऊं लागली व ती हलवितां येऊं लागली, आणि जेव्हां तो रांगूं लागला, त्यावेळीं त्याची कृति जास्त होऊं लागल्यामुळें त्याचें ज्ञान मिळविण्याचें कामही जास्त झपाट्यानें होऊं लागलें. बाबू जेव्हां पडलेला असे तेव्हां त्याला वस्तूचें ज्ञान फक्त एका किंवा दोन इंद्रियांनींच होत असे. दुरून त्यानें वस्तु पाहिली, तर तिचा रंगच त्याला दिसत असे. वस्तु हातांत धरतां न आल्यामुळें व ती आपटतां न आल्यामुळें त्या वस्तूचा आकार व आवाज कसा आहे, ती मृदु आहे का कठीण आहे, इत्यादि ज्ञान त्याला मुळींच होत नसे. वस्तु हातांत धरतां येऊं लागल्यापासून आणि ती हलवितां व आपटतां येऊं लागल्यापासून बाबूला त्या वस्तूचा आकार कसा आहे, ती टणक आहे कीं मऊ आहे, तिचा आवाज कसा आहे, याचें चांगलें ज्ञान होऊं लागलें. रांगतां येऊं लागल्यापासून वस्तु दूर आहे किंवा जवळ आहे याचेंही अधिक ज्ञान त्याला होऊं लागलें. एक उदाहरण घेऊन आपण हीच कल्पना स्पष्ट करूं. बाबू जेव्हां अगदीं लहान होता व त्याला पदार्थ धरतां येत नसे, तेव्हां विमलनें त्याच्या डोळ्यांपुढें पिकलेला एक आंबा धरला. यावेळीं बाबूला फक्त थोडकेंसें अस्पष्ट असें आंब्याचें ज्ञान झालें. यानंतर पांचसहा महिने गेले. बाबू आतां रांगूं लागला होता. बाजारांत आंबे विकावयास येऊं लागले होते. आईनें विमलला एक आंबा दिला. विमल आंबा भुईवर ठेवून जरा घरांत गेली. बाबूचें चित्त आंब्याच्या त्या पिवळ्या रंगानें आकर्षलें. तो रांगत रांगत त्या आंब्याजवळ गेला. त्यानें तो हातांत घेतला. दोन्ही हातांत घेऊन तो त्यानें चांगला न्याहाळून पाहिला. एकदोनदां त्यानें तो भुईवर आपटला. मग त्याला काय वाटलें कोण जाणें! त्यानें तो तोंडांत घातला. त्याला खालीं दोन व वर दोन असे पांढरे शुभ्र तांदळाच्या कण्यांसारखे दांत आले होते. त्या चिमण्या व अणकुचीदार दांतांनीं बाबूनें तो आंबा फोडला. त्याबरोबर आंब्याचा गोड रस त्याच्या तोंडांत गेला, आणि मग स्वारीचा आनंद काय विचारतां! आंबा खाण्यांत बाबूराव अगदीं गुंग झाले. इतक्यांत आपला आंबा नेण्याकरितां विमल तेथें आली. बाबू आपला आंबा खात आहे हें पाहून तिनें आईला हांक मारिली. बाबूरावचें तें ध्यान पाहून

आईला फार मौज वाटली. तिनें त्याच्या हातांतील आंबा घेऊन तो विमलला दिला व त्याचें तोंड तिनें स्वच्छ धुतलें. आपला गोड आंबा आईनें घेतला ही गोष्ट बाबूला आवडली नाहीं. आंब्यासाठीं तो एकसारखा रडूं लागला. अखेर आईनें त्याला पाजण्यास घेतलें व तो आईचे आंगावर पिऊं लागला, तेव्हां बाबूला आंब्याचा विसर पडला, व स्वारी आईबरोबर हसूं लागली. दुसऱ्या दिवशीं पुन्हां बाबूच्या घरीं आंबे आणले. ते हिरव्या रंगाचे होते. बाबूनें त्यांच्याकडे पाहिलें, व जरी त्यांचा रंग कालच्या रंगापेक्षां वेगळाच होता, तरी हे आंबेच आहेत हें त्यानें ओळखलें; व त्यांतील एक आंबा उचलून खाण्यास सुरुवात केली. यानंतर आंबा वाटोळा असो अगर लांबट असो, हिरवा असो, पिंवळा असो अथवा शेंदरी असो, बाबूला तो आंबा आहे हें ताबडतोब ओळखतां येत असे.

आपण या भागांत कोणत्या गोष्टींचा विचार केला हें एकदां पाहूं, व हा भाग पुरा करूं.

(१) ज्ञान चांगलें होण्याला ज्ञानेंदियांची शक्ति वाढावी लागते. जसजसा ज्ञानेंद्रियांना जास्त जास्त व्यवसाय (काम) मिळत जातो व जसजसें त्यांना शिक्षण मिळतें तसतशी ज्ञानेंद्रियांची ज्ञान मिळविण्याची शक्ति वाढत जाते व ज्ञानेंद्रियांनीं होणारीं संवेदनें भराभर होऊं लागतात व वस्तूचा बोधही झटकन् व स्पष्ट होतो. पूर्वज्ञान व पूर्वानुभव बराच वाढला म्हणजे त्यांच्या साहाय्यानें वस्तूचें विविध प्रकारचें व पुरेसें ज्ञान मुलास होतें.

(२) मुलांच्या ज्ञानेंद्रियांची शक्ति प्रारंभीं फार कमी असल्यामुळें व त्यांना पूर्नानुभव व पूर्वज्ञान नसल्यामुळें प्रौढ माणसांना ज्याप्रमाणें एकाद्या वस्तूचें स्पष्ट व अनेक बाजूंचें ज्ञान होतें तसें मुलांना होत नाहीं.

(३) कृतीमुळें ज्ञान मिळतें, व ज्ञानानें कृति जास्त चांगली करतां येते, असा कृति व ज्ञान यांचा परस्पर संबंध आहे. मुलांना वस्तु धरतां येऊं लागली, ती इकडे तिकडे हलवितां येऊं लागली, त्याला रांगतां येऊं लागलें, कीं मुलाच्या ज्ञानांत जास्त भर पडत जाते.

(४) वस्तूचें ज्ञान मिळविण्याच्या कामीं जितक्या जास्त ज्ञानेंद्रियांचा उपयोग होतो तितकें वस्तूचें ज्ञान अधिक व जास्त स्पष्ट होतें. वस्तु पाहणें, तिचा

आवाज ऐकणें, वस्तु हातांत घेणें, ती आदळणें व आपटणें, वस्तूकडे जाणें, तिची चव घेणें, इत्यादि कृति करतां येऊं लागल्या कीं, मुलांना वस्तूचें अधिक ज्ञान होतें.

(५) ज्या वस्तूपासून अगर कृतीपासून शरिराला सुख अगर दुःख होतें अशाच वस्तूंची अथवा कृतींची मुलांना प्रथम ओळख होते. हळूहळू या ज्ञानांत भर पडत जाते. दोन वस्तूंमधील अगर दोन माणसांमधील भेद प्रथमतः मुलांना चांगलासा कळत नाहीं; पण अनुभवानें तो जास्त स्पष्ट होतो.

---

## भाग ४ था

## ज्ञानाची वाढ

मूल जन्मल्यापासून त्याचें पाहिलें वर्ष संपेतोंपर्यंतच्या त्याच्या आयुष्यक्रमाचा विचार मागील दोन भागांत केला आहे. मुलाच्या ज्ञानप्राप्तीस सुरुवात कशी होते व तें आपल्या स्नायूंस हवें तसें चलन देण्यास कसें शिकतें याचेंही विवेचन मागील भागांत केलें आहे.

बाबूला आज दुसरें वर्ष लागलें. आज त्याच्या घरच्या मंडळीनें मोठ्या थाटानें त्याचा वाढदिवस साजरा केला. एका वर्षांत बाबूची किती तरी शारीरिक व बौद्धिक प्रगति झाली आहे. तो आतां साऱ्या घरांत व अंगणांत भराभर रांगत असतो. तो भिंतीला धरून उभा राहतो. आईचीं किंवा बापाचीं बोटें धरून हळूहळू दोन-चार पावलें चालतो. चालतांना त्याला फार आनंद वाटतो व धन्यतेनें तो आपल्या आईबापांकडे व बहिणीकडे पाहातो. वस्तु पाहिलीं कीं ती हातांत घ्यावी, ती आदळावी, आपटावी, ती वाजवून पाहावी, तिची मोडतोड करावी, असा त्याचा सारखा क्रम चालेला असतो. लहानशा काठीनें भांडीं वाजविण्यांत त्याला फार आनंद वाटतो. वडील माणसांचें अनुकरण करण्यांत तो फार हुशार झाला आहे. विमलची पाटी घेऊन तिच्यावर तो वेड्यावाकड्या रेघा काढीत बसतो. तिचें पुस्तक घेऊन तो ऐटींत बसतो व ऊ ऊ करून तें वाचण्याची नक्कल करतो. तो विमलला लटकाच खाऊ देतो. मांजर कशी ओरडते असें त्याला

विचारलें, तर तो माऊ माऊ असें म्हणून दाखवितो. 'बाबू, मला झोप आली, माला गाणें म्हण' असें विमलनें म्हटल्यावर बाबू तिला थोपटतो व 'जो जो' असें गाणें गातो. त्याला आतां आई, ताई, काऊ, माऊ, पाई ( पाणी ) वगैरे सोपे २०–२५ शब्द बोलतां येतात. तो बोबडें बोलतो, पण त्याचें तें बोलणें कानाला फार गोड लागतें. शब्दाचा उच्चार स्पष्ट करितां येत नसला, तरी जसा तो येईल तसा करावयाचा ही तर त्याला खोडच लागली आहे. त्याला स्वतःला जरी फारच थोडे शब्द बोलतां येतात, तरी त्यांहून बरेच जास्त शब्द त्याला समजतात. त्याला लहान व सोप्या वाक्यांचा अर्थही कळतो. त्याला जें कांहीं पाहिजे तें मिळाल्याशिवाय तो गप्प बसत नाहीं. एका शब्दांत किंवा दोन शब्दांत व कधीं कधीं शब्द व कृति यांच्या साहाय्यानें तो आपला हेतु वडील माणसांना कळवितो. त्याला जर स्वयंपाकघरांत आईकडे जावयाचें असेल, तर तो विमलला 'आई' असें म्हणून स्वयंपाकघराकडे बोट दाखवितो, म्हणजे मग विमल त्याला स्वयंपाकघराकडे घेऊन जाते. सकाळीं त्याचे वडील बाजारांत चालले कीं बाबू त्यांच्या कडेवर बसतो व खुंटीवरील आपल्या टोपीकडे बोट दाखवितो व 'भूर्' असें म्हणतो. माझ्या डोक्यांत टोपी घाला व बाहेर न्या' हें तो 'भूर्' या शब्दानें व खुणेनें वडिलांस सुचवितो. संध्याकाळीं त्याचे वडील कचेरींतून घरीं आले व हातपाय धुऊन खोलींत बसले कीं बाबू तेथें रांगत जातो व उत्कंठेनें वाट पाहात बसतो. बाबा आतां चहा व लाडू खातील व आपणासही आतां लाडू मिळेल ही गोष्ट त्याला दररोजच्या परिपाठानें चांगली माहीत झाली आहे. त्याला मनुष्य आपणाशीं रागानें बोलत आहे कीं प्रेमानें बोलत आहे हें बोलणाराच्या स्वरावरून चांगलें कळतें. त्याच्याशीं आपण प्रेमानें बोललों, तर तो हसतो व रागानें बोललों, तर तो रडूं लागतो.

एका वर्षांत प्रत्येक मुलाची इतकीच शारीरिक व बौद्धिक प्रगति होईल, जास्त किंवा कमी होणार नाहीं असें नाहीं. ही प्रगति मुलाची मूळची प्रकृति व त्याच्या भोंवतालची परिस्थिति यांजवर अवलंबून राहील.

मूल चालूं लागलें कीं ज्ञान मिळविण्याचें त्याचें काम जास्त जोरानें चालूं लागतें. ज्ञान हें पुष्कळ अंशीं क्रियेवर अवलंबून असतें, हें आपण मागें पाहि-

लेंच आहे. मुलाला चांगलें चालतां येऊं लागलें कीं, तें साऱ्या घरांत फिरत असतें. तें अंगणांतही फिरूं लागतें. मूल तीन चार वर्षांचें झालें कीं, तें शेजाऱ्याच्या बिऱ्हाडांतील आपल्याच वयाच्या मुलांबरोबर खेळण्यास जातें. तें आईच्या बरोबर देवळांत, नदीला व सोयऱ्याधायऱ्यांच्या येथें जातें. तें आपल्या बापाच्या बरोबर बाजारांत, दुकानांत, देवळांत व जत्रेला जातें. भाऊच्या बरोबर त्याच्या शाळेंत, त्याच्या सोबत्याकडे अगर खेळाच्या मैदानांत जातें, व ताईच्या बरोबर तिच्या शाळेंत व मैत्रिणीकडे जातें. अशा प्रकारें निरनिराळ्या स्थळीं गेल्यामुळें, निरनिराळ्या वस्तु, प्राणी व क्रिया तें पाहतें. मुलाच्या आंगीं अनुकरण करण्याची हौस असल्यामुळें व त्याला खेळाची स्वाभाविक आवड असल्यामुळें तें अनेक क्रिया करतें. या सर्व कारणांमुळें त्याच्या ज्ञानांत एकसारखी भर पडत जाते. जसजशी मुलांच्या ज्ञानांत भर पडत जाते व त्याचा अनुभव जसजसा वाढत जातो, तसतसें नवीन ज्ञान त्याला जास्त चांगल्या प्रकारें व लवकर ग्रहण करितां येतें. मूल एक वर्षाचें झाल्यावर हळूहळू त्याची स्मरणशक्ति वाढूं लागते. यामुळें ग्रहण केलेलें ज्ञान त्याच्या स्मरणांत जास्त चांगलें राहूं लागतें व अशा प्रकारें त्याच्या ज्ञानाचा संचय वाढत जातो. दुसऱ्या वर्षापासून कल्पनाशक्तीचाही हळूहळू उदय होऊं लागतो. लटकाच खाऊ देणें व लटकाच खाऊ खाणें ही देखील कल्पनाशक्तीच्या प्रेरणेमुळें होणारी क्रिया आहे. मूल बाजारांत गेलेल्या बाबांची वाट पाहात असतें व ते खाऊ आणतील म्हणून आनंदांत असतें, हें देखील त्याच्या कल्पनाशक्तीमुळेंच होतें. तीनचार वर्षांचें मूल झालें कीं, त्याची कल्पनाशक्ति अधिक प्रबळ होते व ती आपलें काम जास्त जोरांत करूं लागते. काठीला घोडा करून त्याजवर फेरफटका करणें, बाहुलीला थोपटून निजविणें, शिक्षक होऊन मुलें म्हणून खांबांना झोडणें, बाबा होऊन देवपूजा करणें वगैरे मुलांच्या क्रिया कल्पनाशक्तीच्याच प्रेरणेमुळें होतात. स्मरणशक्तीप्रमाणें कल्पनाशक्तीचेंही ज्ञान मिळविण्याचे कामीं साहाय्य होतें, यामुळें कल्पनाशक्तीच्या वाढीबरोबर ज्ञान मिळविण्याचें कार्य जास्त होऊं लागतें.

शौर्य, क्रौर्य, सौजन्य वगैरे भाववाचक नामांनीं दाखविलेले गुण मुलें ७।८ वर्षांचीं किंवा जास्त वयाचीं होईपर्यंत मुलांना चांगले कळत नाहींत. शूर माणूस, दुष्ट माणूस, दयाळू माणूस, वगैरे जोडींतील शूर, दुष्ट,

दयाळू या विशेषणांची मुलांना स्पष्ट कल्पना होते, पण भाववाचक नामांनीं दाखविल्या जाणाऱ्या गुणांची स्पष्ट कल्पना येण्यास बराच काल लागतो. त्याचप्रमाणें मुलांना सामान्यनामानें दाखविलेल्या वर्गाची कल्पना येण्यास बराच काळ लागतो. कुत्रा हा शब्द उच्चारतांच मुलाला त्यानें पाहिलेल्या एखाद्या कुत्र्याचें स्मरण होईल. पण कुत्रा हा इमानी प्राणी आहे यांत आपण कुत्रा हा शब्द ज्या अर्थानें (कुत्र्याचा वर्ग किंवा जात या अर्थानें) वापरतों, तो अर्थ मुलें ८।९ वर्षांचीं झाल्याशिवाय त्यांच्या लक्षांत स्पष्टपणें येत नाहीं. मनुष्य, कुत्रा, प्राणी वगैरे शब्दांचा जो हा सामान्य बोध तो मुलांना होऊं लागला म्हणजे त्यांची विचारशक्ति वाढूं लागते व शाळेंतील अभ्यासांतही त्यांची प्रगति होते. हा सामान्य बोध जोंपर्यंत मुलाला स्पष्टपणें होत नाहीं, तोंपर्यंत त्याला शास्त्रीय व्याख्या बिलकुल कळत नाहींत. निर्णय व अनुमान हीं दोन विचारशक्तींचीं कार्यें आहेत. मुलांची निर्णय व अनुमान काढण्याची शक्ति हळूहळू दुसऱ्या वर्षापासून दृष्टीस पडूं लागते. पहिल्या वर्षीही शेवटीं शेवटीं त्याचे थोडेसे निर्णय दृष्टीस पडतात. प्राणी, वस्तु व माणूस ओळखणें व त्याला हाक मारणें हा देखील निर्णयच आहे. घरांत एक लहान नवीन मांजर आलें. त्याबरोबर तेथें खेळत असणाऱ्या १० महिन्यांच्या मधूनें आईकडे पाहून 'माऊ' असें म्हटलें. मधूचा 'माऊ' हा शब्द एक प्रकारचा निर्णयच होय. कारण त्याच्या 'माऊ' या शब्दाचा अर्थ 'हा प्राणी मांजर आहे' असाच होतो. एका दीड वर्षाच्या मुलानें आपल्या टोपीवर शाई सांडली. तो डाग आपल्या आईस दाखवून तें म्हणालें, 'पपी शी' म्हणजे ही टोपी घाण झाली आहे. अर्थातच त्या मुलानें 'पपी शी' हें केलेलें विधान हा निर्णयच आहे. मुलें तीन-चार वर्षांचीं झालीं कीं, साधीं निर्णयात्मक वाक्यें त्यांच्या तोंडून भराभर बाहेर पडत असतात. मुलाच्या अनुमानशक्तीला केव्हां प्रारंभ होतो हें सांगणें कठीण आहे. प्रारंभीं कांहीं काल मुलें थोडक्या शब्दांत व अपूर्ण वाक्यांत आपला हेतु व्यक्त करीत असतात, त्यामुळें त्यांचीं अनुमानें ओळखणें कठीण जातें; तथापि तिसऱ्या वर्षापासून मुलाच्या अनुमानाचीं थोडीं थोडीं उदाहरणें दृष्टीस पडूं लागतात. एकदां आईनें ७ वर्षांच्या मनीस एक भांडें आणण्यास सांगितलें, पण तें न आणतां ती खेळण्याकरितां निघून गेली. विनू तीन वर्षांचा होता. त्यानें तें भांडें आईस आणून दिलें व तो

आईला म्हणाला, 'विनू शाणा, मनी शी.' या चार शब्दांत विनूचीं दोन अनुमानें दिसून येतात. तर्कशास्त्राच्या नियमांप्रमाणें हीं अनुमानें पद्धतशीर रीतीनें मांडल्यास तीं पुढें दिल्याप्रमाणें होतील.

( १ ) आईचें काम करणारीं मुलें शाहणीं असतात. विनू आईचें काम करणारा मुलगा आहे, म्हणून तो शाहणा आहे.

( २ ) आईचें काम न करणारीं मुलें वेडीं असतात. मनी आईचें काम न करणारी मुलगी आहे, म्हणून ती वेडी आहे.

मूल शाळेंत जाऊं लागण्याच्या पूर्वीच्या कालांत मुलाचा बौद्धिक विकास कसा होतो याची साधारण रूपरेषा वर दिली आहे. याच बौद्धिक विकासाचें विस्तृत विवेचन पुढील दोन तीन भागांत करावयाचें आहे, तेव्हां त्याजबद्दल जास्त सांगण्याची आवश्यकता नाहीं. एक गोष्ट मात्र लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, मनाच्या स्मरणशक्ति, कल्पनाशक्ति, सामान्यबोधशक्ति, अनुमान-शक्ति, वगैरे निरनिराळ्या शक्ति, मानसशास्त्राच्या विवेचनांत मानतात. तरी वास्तविक अशा प्रकारच्या त्या निरनिराळ्या शक्ति नाहींत. एकाच मनाचीं तीं निरनिराळीं स्वरूपें आहेत. विवेचनाच्या सोपेपणाकरितां व मनाच्या निर-निराळ्या स्वरूपांचा स्पष्ट विचार व्हावा एवढ्याचकरितां या निरनिराळ्या शक्ति मानण्याची पद्धति पडली आहे. दुसरीही एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, प्रथम स्मरणशक्ति नंतर कल्पनाशक्ति, नंतर अनुमानशक्ति अशा क्रमानें मनाचा विकास होत नाहीं. या सर्व शक्तींचीं कार्यें एकमेकांवर अवलंबून असतात. उदाहरणार्थ, आपण एखाद्या ६।७ महिन्यांच्या मुलाची कृति घेऊं. आईची एखादी मैत्रीण तिला भेटावयास येते. मुलाला पाहून ती त्याला आपल्या जवळ बोलविते. पण मूल तिच्या तोंडाकडे न्याहाळून पहातें, तिचा आवाज ऐकतें व ही आपली आई नाहीं असें ठरवितें व त्या बाईजवळ तें जात नाहीं. मुलाच्या अनुमानाचें हें एक उदाहरण आहे. अर्थातच हें अनुमान केवळ बीजरूपांतच असतें. सांगण्याचें तात्पर्य काय कीं, मनाची अमुक एक शक्ति प्रथम उदयास येते, नंतर कांहीं वर्षांनीं दुसरी शक्ति उदय पावते व ती विकास पावते, मग तिसरी शक्ति उदय पावते अशी वस्तुस्थिति नसते.

मुलाचा बौद्धिक विकास होण्याच्या कामीं त्याच्या आंगीं असणाऱ्या जिज्ञासा, कृतिप्रेम व स्पर्धा या सहज प्रवृत्ति फार उपयोगीं पडतात. त्याचप्रमाणें त्याच्या आंगीं असणारी खेळण्याची स्वाभाविक वृत्ति व अनुकरण करण्याची स्वाभाविक वृत्ति याही मुलाच्या बौद्धिक विकासाला मदत करितात. या दोन वृत्तींमुळें मुलाच्या ज्ञानांत भर पडते व त्याची विचारशक्ति वाढते. ' सहज प्रवृत्ति, त्यांचें कार्य व शिक्षण ' यांजवर पुढें एक स्वतंत्र लेख येणारच आहे. म्हणून या ठिकाणीं त्यांजबद्दल जास्त कांहीं लिहिण्यास नको. त्याचप्रमाणें ' खेळांचें शिक्षणदृष्ट्या महत्त्व ' याजवरही पुढें स्वतंत्र लेख येणार आहे, म्हणून अनुकरणाबद्दल थोडक्यांत सांगून हा भाग पुरा करूं.

मनुष्य हा फार अनुकरणप्रिय प्राणी आहे. अनुकरणाच्या या आवडीमुळें तो नवीन नवीन गोष्टी शिकतो व आपल्या ज्ञानांत भर घालतो. या आवडीमुळेंच तो निरनिराळ्या कला शिकतो. ज्या व्यक्तीबद्दल मनुष्याच्या मनांत आदर असतो, त्या व्यक्तीचे आचार व विचार शक्य तितके आपल्या कृतींत आणण्यास तो झटतो. या अनुकरणप्रियतेमुळें एका राष्ट्रांतील किंवा एका समाजांतिल व्यक्तीचे आचार, विचार, आवडी व नावडी इतक्या सारख्या राहतात व शेंकडों वर्षें त्यांच्यांत फरक होत नाहीं.

दुसऱ्याची कृति पाहून तिजप्रमाणें कृति करणें याला आपण अनुकरण म्हणतों. वडील माणसांची किंवा सोबत्यांची कृति पाहून तिजप्रमाणें कृति करण्याची वृत्ति लहान मुलांस फार असते. मुलें कधीं कधीं पशुपक्ष्यांच्या कृतींचेंही अनुकरण करितात. वामन पंडितांनीं आपल्या वनक्रीडा या कवितेंत गोपालबालांच्या अनुकरणप्रियतेचें फार सुंदर वर्णन केलें आहे.

वनीं देखुनी मेघनीळास मोर
प्रमोदें करी नृत्यलीला समोर
तयासारिखे नाचती तोक सारे
खुणावोनि अन्योन्य कीं तो कसारे !

हा व यापुढील दुसरे श्लोक यांत कवीनें केलेलें मुलांच्या अनुकरणप्रियतेचें वर्णन फार सरस आहे. मूल स्वाभाविकपणेंच भोंवतालच्या माणसांचें अनुकरण करीत असतें. या अनुकरणाच्यामुळें तें आपल्या स्नायूंवर ताबा मिळवितें व

अनेक प्रकारच्या नवीन क्रिया करण्यास शिकतें. चालणें, बोलणें, तोंड धुणें, स्नान करणें, पाटावर बसणें, जेवणें, कपडे घालणें वगैरे अनेक क्रिया, मूल वडील माणसांच्या कृतीच्या अनुकरणानें शिकतें; आणि एवढ्या करितांच वडील माणसांनीं आपल्या सर्व कृति व्यवस्थितपणें करण्याची काळजी घ्यावी. सुशिक्षित कुटुंबांत वाढलेलीं मुलें शुद्ध भाषा बोलतात. अशिक्षित कुटुंबांत वाढलेलीं मुलें शब्दांचा उच्चार अशुद्ध करितात व भाषाही अशुद्ध बोलतात. आईबाप जर हेल काढून बोलत असतील, तर मुलेंहीं हेल काढून बोलतात. लहानपणीं मुलांना बोलतांना ज्या खोडी लागतात त्या जन्मभर टिकतात. मूल पाहिल्यानें न समजून स्वाभाविकपणेंच वडील माणसांचें अनुकरण करीत असतें. पण पुढें तें समजून अनुकरण करूं लागतें. वडील माणसांच्याबद्दल मुलांच्या मनांत आदर व प्रेम हीं असतात आणि म्हणूनच आपलीं वडील माणसें जशीं वागतात तसेंच वागावें असें त्यांस वाटतें.

मूल चार पांच महिन्यांचें झालें कीं, त्याच्या अनुकरणशक्तीचें कार्य दिसूं लागतें. आई जर हसली, तर मूलही तिच्याकडे पाहून हसतें. ताईनें किंवा दादानें त्याच्याजवळ उभें राहून आपली जीभ बाहेर काढली, तर मूलही आपली जीभ बाहेर काढतें. प्रोफेसर प्रेयर यांचा मुलगा जेव्हां चार महिन्यांचा होता, तेव्हां त्याच्याजवळ उभें राहून जर त्यांनीं आपला खालचा ओठ पुढें आणला, तर त्याचें अनुकरण ताबडतोब त्यांचा मुलगा करीत असे. प्रोफेसर म्याकडुगल यांचा मुलगा जेव्हां पांच महिन्यांचा होता, तेव्हां त्याच्यासमोर कोणीं जीभ बाहेर काढली, तर तोही आपली जीभ बाहेर काढीत असे. अगदीं लहानपणीं मुलांनीं केलेलें अशा प्रकारचें अनुकरण हें न समजून स्वाभाविक-पणेंच केलेलें असतें.

मनुष्य आपल्या आयुष्यांत पुष्कळ वेळां न समजतांच दुसऱ्याचें अनुकरण करीत असतो. शाळेंत तर ही गोष्ट आपण नेहमीं पाहतों. शिक्षक वर्गांत आला व तो जर आनंदांत असला, तर सर्व वर्ग आपलें काम आनंदानें करूं लागतो. शिक्षक जर दुर्मुखलेला किंवा रागांत असेल, तर खिन्नतेची किंवा भीतीची छटा लागलीच सर्व वर्गावर पसरते. आनंदी मित्राच्या सहवासांत आपण आनंदानें हसूं लागतों. शिक्षक आणि पालक यांनीं, मुलें पुष्कळ वेळां न समजून साहजिकपणें आपलें अनुकरण करीत असतात हें लक्षांत ठेवावें.

मूल सात आठ महिन्यांचें झालें कीं, त्याला अनुकरण करण्याचा चाळा लागतो. हेंही अनुकरण मूल समजून उमजून किंवा बुद्धया करीत नसतें. ऐकलेला शब्द पुन्हां पुन्हां बोलणें, पाहिलेली कृति पुन्हां पुन्हां करणें, यांतच त्याच्या जागेपणाचा बहुतेक काळ जातो. भाऊचें बूक वाचणें, ताईच्या पाटीवर रेघा ओढणें, तिचे सागरगोटे घेऊन ते फेकणें, भाऊ पत्ते खेळत असतांना ते घेणें व पानें खालीं टाकणें, असा सारखा १।–१॥ वर्षांच्या मुलाचा चाळा चाललेला असतो. जी जी कृति मुलाला मजेदार वाटते व जिच्याकडे त्याचें लक्ष जातें, तिचें तें अनुकरण करितें—अशा प्रकारचें हें अनुकरण मूल साधारणपणें तीन वर्षांचें होईतोंपर्यंत करीत असतें.

मूल तीन वर्षांचें झालें कीं त्याची कल्पनाशक्ति काम करूं लागते. इतर मुलांत मिसळून तें खेळ खेळूं लागतें. खेळांत त्याच्या अनुकरणप्रियतेला व कल्पनाशक्तीला बराच वाव मिळतो. खेळत असतांना अनेक प्रकारच्या क्रियांचें अनुकरण मुलें करीत असतात. 'भाऊ, आतां जेवावयाला बसावयाचें,' असें खेळांत ताईनें म्हणतांच चार वर्षांचा मधू ताईनें पुढें ठेवलेल्या कागदाच्या तुकड्याला ताट समजून जेवावयास बसतो व कागदांतील डाळ्या चुरमुरे वरण-भात म्हणून खातो. नंतर पुस्तकें घेऊन शाळेंत जाण्याची नक्कल करितो. निरनिराळ्या धंदेवाल्यांच्या, दुकानदारांच्या व कारागिरांच्या कृति मुलें पाहतात व खेळांत त्या त्या कृतींचें अनुकरण करितात. मधू एक लहान टोपली डोक्यावर घेतो व चिवडेवाला बनून 'चिवडा घ्या हो चिवडा' असें ओरडतो व चिवड्याचें गाणें गातो. विनू टांगेवाला होतो, गणू घोडा होतो. विनू चाबूक घेऊन टांगेवाल्याच्या कृतीचें अनुकरण करितो, गणू घोड्याच्या चालण्याचें अनुकरण करतो. याचप्रमाणें सुतार, सोनार, शिंपी, माळी, दुकानदार, मोळीविक्या वगैरे अनेक धंदेवाल्यांचें मुलें अनुकरण करीत असतात. या अनुकरणाच्या योगानें आपल्या भोंवतालीं चाललेल्या घडामोडींचें काळजीपूर्वक निरीक्षण करून ज्ञान मिळविण्याची मुलांना संवय लागते. गांवच्या भूगोलाचा अभ्यास करण्याचा हा एक मार्ग आहे.

अनुकरणाचे वर सांगितलेले प्रकार चालू असतांच मूल हेतुपुरःसर आपल्या वडील माणसांच्या व सोबत्यांच्या क्रियांचें अनुकरण करावयास लागतें. बाबा

जो शब्द बोलतील तो लक्षपूर्वक ऐकावयाचा व तो जरी प्रथम बरोबर उच्चा-
रतां आला नाहीं, तरी पुन्हां पुन्हां त्याचा शुद्ध उच्चार करण्याचा प्रयत्न करा-
वयाचा; भाऊ दांडू घेऊन चेंडू मारतो, त्याप्रमाणें आपण मारण्याचा प्रयत्न
करावयाचा, अशा प्रकारें हेतुपुरःसर अनुकरण करण्याचें मुलाचें कार्य चाल-
लेलें असतें. या ऐच्छिक अनुकरणाचा, ज्ञान व कला संपादन करण्याच्या
कामीं व दररोजच्या आयुष्यक्रमाला आवश्यक अशा कृति शिकण्याच्या कामीं
फार उपयोग होतो. अंकलेखन, अक्षरलेखन, चित्रकला, हातकाम, नमस्कार
इत्यादि गोष्टींत मूल बुद्धया होऊन दुसऱ्याचें अनुकरण करीत असतें. अमुक
एक कृति कशी करावयाची, अमुक आकृति कशी काढावयाची, हें कितीही
जरी मुलांना तोंडीं समजावून सांगितलें, तरी त्यांना तें कळत नाहीं. शिक्षकानें
ती कृति प्रत्यक्ष करून दाखविली किंवा ती आकृति प्रत्यक्ष काढून दाखविली,
कीं मुलांना ती कृति सहज करितां येते किंवा ती आकृति सहज काढतां येते.
शिक्षणदृष्टया ही गोष्ट फार महत्त्वाची आहे व पालकांनीं व शिक्षकांनीं ती
नेहमीं लक्षांत ठेविली पाहिजे.

मूल तीन-चार वर्षांचें झालें कीं, वडील माणसांना ज्या योगानें संतोष
होईल व तीं आपणाला चांगलें म्हणतील असें वागण्याचा तें प्रयत्न करितें.
दादा आईचें काम ऐकतो, तो वस्तु उचलून व्यवस्थित ठेवतो, ताई आईला
मदत करिते आणि म्हणूनच आई व बाबा दादाला व ताईला शहाणे म्हण-
तात व तीं त्यांना आवडतात, असें पाहिलें म्हणजे धाकटा मधु, दादा व ताई
यांच्याप्रमाणें वागण्याचा प्रयत्न करितो. ज्या माणसांबद्दल आपणांस आदर
आहे त्या माणसांच्या चांगल्या आचारांचें, विचारांचें व आवडींचें अनु-
करण करण्याचें काम मनुष्य आपल्या सर्व आयुष्यभर करीत असतो. त्याला
सुरुवात वर सांगितल्याप्रमाणें होते. घरांतील वडील माणसें व शाळेंतील
शिक्षक यांच्याबद्दल मुलाला जर प्रेम व आदर वाटत असेल व त्यांचें आच-
रण उत्तम असेल, तर त्यांच्या अनुकरणानें मुलाचा फार फायदा होईल.

वरील विवेचनावरून मुलाच्या आंगीं असणारी अनुकरणप्रियता ही वृत्ति
शिक्षणदृष्टया किती महत्त्वाची आहे याची थोडी तरी कल्पना वाचकांना येईल.

# भाग ५ वा

## खेळ

मुलांच्या शारीरिक, बौद्धिक व नैतिक प्रगतीला मदत करणाऱ्या त्यांच्या दोन वृत्तींपैकीं अनुकरण या वृत्तीचा मागील भागांत विचार केला. या भागांत दुसरी वृत्ति जी खेळ तिचा आपण विचार करूं.

खेळ हा मुलांना प्रेमळ मातेप्रमाणें शिक्षण देतो. ही प्रेमळ माता मुलाचें मनोरंजन करते व त्याला हसत, खेळत शिक्षण देते. ती चालणें, बोलणें, धावणें, पळणें, उड्या मारणें, लंगडी घालणें, बोटानें व हातानें नेम धरणें, झाडावर चढणें, पोहणें वगैरे बहुविध व उपयुक्त क्रिया कुशलतेनें करण्यास शिकविते व अशा प्रकारें मुलाच्या स्नायूंना इष्ट तें शिक्षण देऊन त्याचें शरीर निकोप व निरोगी बनवितें. लाकूड तासून विटीदांडू तयार करणें, चिंध्यांची बाहुली अगर चेंडू तयार करणें, कागदाचा पतंग करणें, भोवरा फिरविण्या-करितां दोरी वळणें, बाहुलीला कपडे शिवणें, दिवाळीकरितां किल्ला तयार करणें, गणेशचतुर्थीकरितां मखर तयार करणें, पाट्या समान्तर पाडणें, वाटोळ्या व एकमेकींवर बसतील अशा लहानमोठ्या लगोऱ्या बनविणें, इत्यादि अनेक कामें ही प्रेमळ आई मुलांकडून आनंदानें तयार करून घेते व त्यांच्या हातांला व बोटांला वळण लावते. या आईनें सांगितलेलें काम मुलें मोठ्या हौसेनें करितात. त्यांना त्या कामाचा कधींही कंटाळा येत नाहीं. खेळ ही प्रेमळ माता आज्ञापालन, शिस्त, सहकारिता, प्रामाणिकपणा, खरेपणा, उद्योगप्रियता, चिकाटी इत्यादि अनेक गुण मुलांना लावते.

खेळाच्या योगानें मुलाच्या ज्ञानांत किती भर पडते व त्याला उपयुक्त असें शारीरिक बौद्धिक व नैतिक शिक्षण किती मिळतें हें पाहाण्याकरितां आपण एक उदाहरण घेऊं. जनू हा एक ७ वर्षांचा मुलगा आहे. तो वडगांव नांवाच्या एका खेड्यांत राहातो. जनूनें अद्यापि शाळचें दार देखील पाहिलें नाहीं. तो गांवचीं गुरें घेऊन आपल्या थोरल्या भावाबरोबर रानांत जातो. तेथें गुराख्यांच्या मुलां-बरोबर अनेक प्रकारचे खेळ खेळतो. जनूला त्या गांवचा नदीकांठचा प्रदेश, गांवचें रान व कुरणें, गांवच्या शिवारांतील शेतें यांची फार चांगली माहिती आहे. उंबर, जांभूळ, चिंच, आवळी, आंबा, कवठ, बोर, गोंदणी, भोकर,

निंब, वड, वगैरे झाडें त्याच्या पूर्ण परिचयाचीं झालीं आहेत. यांपैकीं प्रत्येक झाडाला फुलें केव्हां येतात, फळें केव्हां येतात व तीं केव्हां पिकतात हें त्याला फार चांगलें माहीत आहे. त्याला झाडावर जलद चढतां येतें. कावळा, चिमणी, सुतार, पोपट, पारवा, होला, तित्तीर, बगळा, करकोचा, टिटवी, भारद्वाज, कोकीळ वगैरे पक्षी हे त्याच्या चांगल्या माहितीचे आहेत. या पक्ष्यांचीं घरटीं कशीं असतात, त्यांत अंडीं किती असतात, या पक्ष्यांचीं पिलें कशीं असतात, याचें त्यानें निरक्षिण केलें आहे. त्याची नजर फार तीक्ष्ण आहे व कानही फार तीक्ष्ण आहेत. रानांतील बरेच किडे त्याच्या माहितीचे आहेत. गाय, बैल, म्हशी, शेळ्या, वांसरें, करडें, वगैरे जनावरांचा त्याला पूर्ण परिचय आहे. त्यांची शरीररचना, त्यांचे स्वभाव व त्यांची वागणूक यांचा त्यानें चांगला अभ्यास केला आहे. त्याला वीसपर्यंत बिनचूक मोजतां येतें, विसापेक्षां वस्तु जास्त असल्यास त्या तो एक विसा व तीन, दोन विसा व चार अशा मोजतो. तो नदींत चांगलें पोहतो. तो धीटही तसाच झाला आहे. तो १०–१५ जनावरें सहज सांभाळतो. एकदा रानांत त्यानें व दोनचार पोरांनीं मिळून दोन हात लांबीचा साप नुसत्या दगडांनीं ठार मारला. गवताचे निरनिराळे प्रकार व त्यांचा उपयोग हा त्याला चांगला माहीत आहे. दगडाचा नेम धरून फळें पाडण्यांत तो फार पटाईत आहे. त्याला कामाचा कंटाळा येत नाहीं व तो सर्व सोबत्यांबरोबर मिळून मिसळून काम कारितो. जनूची जी ही प्रगती झाली आहे तिचें बहुतेक श्रेय खेळालाच दिलें पाहिजे.

ज्या प्राण्यांना पुढील आयुष्यांत निरनिराळ्या परिस्थितीमुळें बहुविध व्यापार करावे लागतात, अशाच प्राण्यांत त्यांच्या बालपणीं खेळाची विशेष आवड दिसून येते. कीटकांत खेळाची ही आवड दिसून येत नाहीं. कोंबडीच्या पिलांनाही खेळ आवडत नाहीं. वांसरें, हरणाचीं पाडसें, लहान कुत्रीं व मांजरें हीं खेळतांना व आनंदानें बागडतांना आपण पहातों. तशींच पक्ष्यांचीं पिलें किलबिल करीत मौजेनें या खांदीवरून त्या खांदीवर उडतांना आपल्या दृष्टीस पडतात. दुसऱ्या प्राण्यापासून आपलें रक्षण करणें, आपलें भक्ष्य मिळविणें वगैरे ज्या गोष्टी मोठेपणीं त्यांना करावयाच्या असतात त्या गोष्टी हे प्राणी लहानपणीं खेळांत शिकतात. खेळाची ही वृत्ति व आवड अशा प्रकारें या प्राण्यांच्या उपयोगी पडते. मनुष्यप्राण्याचें आयुष्य इतर

प्राण्यांच्या आयुष्यापेक्षां अधिक भानगडीचें असतें. त्याला अनेक प्रकारच्या परिस्थितींतून जावयाचें असतें आणि म्हणूनच त्याला शिक्षणाची आवश्यकता असते. या शिक्षणाचा कांहीं भाग त्याला खेळाच्या योगानें मिळतो.

मुलें पांचव्या किंवा सहाव्या महिन्यापासून खेळास सुरवात करितात. पायाचा आंगठा धरून पुन्हा पुन्हा तोंडांत घालणें, वस्तु हातांत धरून ती पाळण्याच्या दांडीवर किंवा भुईवर आपटणें, रंगीत खुळखुळा घेऊन तो डोळ्यांसमोर धरणें व नंतर हालवून वाजविणें, रंगीत कागदावर झेप घालून त्याचे तुकडे तुकडे करणें, वगैरे अगदीं लहान मुलांच्या कृति हा त्यांचा खेळच होय. या कृति करीत असतांना मुलांचे नेत्र, श्रवण, त्वचा वगैरे ज्ञानें-द्रियांना व्यवसाय मिळतो. या खेळाच्याच योगानें मुलांना हळूहळू आपल्या स्नायूंवर ताबा चालवितां येतो; व इच्छेप्रमाणें आपल्या स्नायूंना चलन देतां येते. हा खेळ खेळण्यांत मुलांना फार आनंद वाटतो. मुलें आठ–दहा महि-न्यांचीं झाली कीं तीं 'का का' 'मा मा' 'बा बा' वगैरे शब्द बोलूं लाग-तात. प्रथम या शब्दांचा उच्चार ती साहजिकपणेंच करितात, पण आपले ते शब्द ऐकून व आपणांला शब्दांचा उच्चार करितां येत आहे हें पाहून त्यांना आनंद वाटतो व तेच तेच शब्द तीं पुन्हा बोलतात.

मुलें बसूं लागलीं व रांगूं लागलीं म्हणजे वडील माणसांच्या व मांजर, कुत्रा वगैरे परिचित प्राण्यांच्या कृतींचें अनुकरण करूं लागतात. दुसऱ्याच्या कृतींचें अनुकरण करणें हाच त्यांचा खेळ सुरू होतो. मुलें चालूं लागलीं म्हणजे, तर या प्रकारच्या खेळाला जास्त रंग येतो. वडील माणसांच्या तोंडून ऐकलेला शब्द पुन्हा पुन्हा उच्चारणें, मांजर व कुत्रा यांच्या आवाजाप्रमाणें आवाज काढणें, दादासारखें बसून पुस्तक वाचणें, बाबासारखें पाटावर बसून पूजा करणें व घंटा वाजविणें, ताईसारखें बसून फणी घेऊन वेणी घालणें, हातांत काठी घेऊन बाबाप्रमाणें ऐटींत चालणें इत्यादि अनेक कृति मुलें करूं लागतात. आपल्या भोंवतालच्या मंडळींच्या कृतींचें अनुकरण करण्याचा हा खेळ मुलांना फार आवडतो. या खेळाच्या योगानें मुलांना आपल्या स्नायूं-कडून आपल्या इच्छेप्रमाणें काम करून घेण्याचें शिक्षण मिळतें. उड्या मारणें, पळणें, धावणें, उठणें, बसणें वगैरे क्रिया सहज व झट्कन् करण्यास या खेळांच्या योगानें मुलें शिकतात. हातानें घंटा वाजविणें, तोंडानें भप्भप्

करणें व पायानें चालणें यांसारख्या तीन चार क्रिया एकदम करण्याची याच खेळाच्या योगानें मुलांना संवय लागते. अनुकरणाशिवाय मुलें स्वतंत्रपणेंही एकटेंच बसून खेळ खेळत असतात. १॥ वर्षांच्या एका मुलानें लहान पाट आडवा मांडून त्यावर बाहुली उभी केली. किती तरी वेळ तो ती बाहुली उभी करण्यास झटत होता, पण प्रत्येक वेळीं ती बाहुली खालीं पडे. अखेरीस ती जेव्हां उभी राहिली तेव्हां त्याला फार आनंद झाला. त्यानें आनंदानें टाळ्या वाजविल्या व माईला हाक मारून त्यानें तिला ती बाहुली दाखविली. तीन वर्षांचा एक मुलगा एक मजेदार खेळ खेळण्यांत गुंतला होता. चहाच्या रिकाम्या डब्यांत ठेवलेल्या सुपाऱ्या त्यानें डबा पालथा करून जमिनीवर सांडल्या व नंतर त्या पुन्हा त्यानें डब्यांत घातल्या. हाच प्रकार त्यानें न कंटाळतां तीन वेळ केला.

तिसऱ्या वर्षापासून मूल आपल्या बहिणीच्या अगर भावाच्या खेळांत भाग घेऊं लागतें. याच वेळेपासून मुलाची कल्पनाशक्तीही काम करूं लागते. यामुळें मुलाच्या खेळाचेंही स्वरूप बदलतें. काठीचा घोडा करणें, बाहुलीला बाळ समजून प्रेमानें तिला निजवणें, डाळ्या-चुरमुरे वगैरे पदार्थांना शिरा, पुरी, लाडू वगैरे पक्वान्नें समजून मेजवानीचा थाट उडवणें वगैरे खेळांत मुलांची ही जोरदार कल्पनाशक्ति दिसून येते.

मुलें पांच-सहा वर्षांचीं होऊन शाळेंत जाऊं लागलीं व सोबत्यांत मिळूं-मिसळूं लागलीं कीं त्यांच्या खेळांना निराळेंच वळण लागतें. रुमाल गविणें, दोरीवरून उड्या मारणें, चावरा कुत्रा, कुत्रा व लांडगा वगैरे धांवपळीचे खेळ त्यांना आवडूं लागतात. आपल्या बरोबरीच्या मुलांप्रमाणें आपणांस धांवतां यावें, पळतां यावें, उड्या मारतां याव्या, त्यांच्या बरोबरीनें त्यांच्याप्रमाणें आपणांस सर्व कृति करतां याव्या, या सर्व कृतींत आपण त्यांच्यापेक्षां कमीं असूं नये, इतकेंच नव्हे तर आपण त्यांच्यापेक्षां जास्त सरस असावें अशी इच्छा मुलांना होऊं लागते. मुलांना खेळांतील नियम कळूं लागतात, व त्या नियमाप्रमाणें तीं खेळतात; पण नियम मात्र थोडे असले पाहिजेत. खेळांत फार नियम व भानगडी असल्या, तर तो खेळ मुलांना खेळतांही येत नाहीं व त्यांत त्यांना गोडीही वाटत नाहीं. कांहीं काळानंतर खो खो, लंगडी,

चेंडू दांडू वगैरे ज्यांत दोन पक्ष किंवा दोन बाजू आहेत, असे खेळ मुलांना आवडूं लागतात. मुलें १० । १२ वर्षांचीं झाल्यावर ज्या खेळांत ज्यास्त नियम आहेत, ज्यांत बुद्धिचातुर्य, शारीरिक चापल्य व सामर्थ्य हीं जास्त लागतात असे आट्यापाट्या, क्रिकेट, हॉलीबॉल वगैरे खेळ त्यांना आवडूं लागतात. कोडीं सोडविणें, भेंड्या लावणें हेही एक प्रकारचे खेळच आहेत. १० । १२ वर्षांचीं मुलें झालीं कीं त्यांना या खेळांत मौज वाटूं लागते. दहा-बारा वर्षांच्या आंतील मुलांना पत्ते, सोंगट्या वगैरे बैठे खेळ आवडत नाहींत व त्यांत त्यांना मौजहि वाटत नाहीं.

खेळ हा नेहमीं आनंददायक असा व्यवसाय असतो. ज्या व्यवसायापासून आनंद होत नाहीं तो खेळच नव्हे. मनुष्याला कांहीं तरी कृति करण्याची, रचना करण्याची, नवीन वस्तु निर्माण कण्याची हौस असते. याच आवडीला कृतिप्रेम हें नांव दिलेलें आहे. हें कृतिप्रेम, ही नवनिर्मितीची हौस मनुष्य-समाजाला फार उपकारक झाली आहे. तिच्या योगानें मनुष्यसमाजाची फार सुधारणा झाली आहे. खेळांत या कृतिप्रेमाला फार अवसर सांपडतो. खुळ-खुळा वाजविणाऱ्या बाबूला, बाबा, काका वगैरे शब्द उच्चारणाऱ्या मनीला, नवीन पतगं तयार करून तो उडविणाऱ्या मधूला, दोरीवरून उड्या मार-णाऱ्या लिलीला, क्रिकेटमध्यें टोले देऊन धांवा काढणाऱ्या मनोहरला या कृतिप्रेमामुळेंच आनंद होत असतो. खेळापासून आनंद होण्याला दुसरें कारण स्पर्धेची आवड ही होय. दुसऱ्याची कृति पाहून तिच्यापेक्षां जास्त चांगली कृति करून दाखवावी अशी आवड मनुष्याला फार असते व त्याप्रमाणें प्रयत्न करून त्याला यश आलें कीं त्याला फार आनंद होतो. त्याचप्रमाणें मनुष्याला स्तुतीची फार आवड असते. या स्तुतिप्रियतेलाही खेळांत अवसर असतो. मनुष्याच्या अंतःकरणांत वावरणाऱ्या कृतिप्रेम, स्पर्धा, स्तुतिप्रियता वगैरे सहज प्रवृत्तींना तृप्त होण्याला खेळांत चांगली संधी मिळते; म्हणूनच मनुष्याला, विशेषतः मुलांना खेळांत फार आनंद वाटतो.

आतां खेळापासून शिक्षणदृष्ट्या कोणते फायदे आहेत हें पाहूं. मुलांना आपल्या इच्छेप्रमाणें स्नायूंना चलन देण्याचें सामर्थ्य खेळानें मिळतें. स्नायूचें सामर्थ्य व चपलता वाढविण्याच्या कामीं खेळांचा फार उपयोग होतो. वस्तूंचा

रंग रूप आकार, संख्या, अंतर, मऊपणा अगर कठीणपणा इत्यादि गुणधर्मांचें ज्ञान मुलांना खेळाच्याच योगानें मिळतें. खेळाच्या योगानें मुलांच्या विचार-शक्तीला व कल्पनाशक्तीला चांगलाच व्यवसाय मिळतो. हातीं घेतलेल्या कामांत किती जरी श्रम पडले व त्रास झाला, तरी तो न जुमानतां तें काम शेवटास नेण्याचें शिक्षण खेळानेंच मुलांना मिळतें. पतंग उडविण्याकरितां त्याची तयारी आधीं तीन तास करावी लागते. आट्यापाट्या खेळण्याच्या आधीं जमीन तयार करावी लागते, पाट्या पाडाव्या लागतात व त्यांजवर पाणी घालावें लागतें. खेळांत होणारा त्रास मुलें आनंदानें सोसतात व अशा प्रकारें आयुष्यांत लागणारा एक गुण त्यांच्या आंगीं जडतो. खेळांत मुलांना सारखें लक्ष द्यावें लागतें व मन ताब्यांत ठेवावें लागतें. खेळाचे सर्व नियम लक्षांत ठेवून ते पाळावे लागतात. खेळांत शिस्त असते; ती प्रत्येक गड्याला पाळावी लागते. खेळांत स्वतः झट्कन् विचार करून त्याप्रमाणें कृति करावी लागते. खेळांत प्रतिपक्षावर जय मिळविण्याकरितां पुष्कळ मानसिक व शारी-रिक श्रम करावे लागतात. मुलें स्वतःच्या खुशीनें खेळत असल्यामुळें त्यांना या कृति करण्याचा बिलकूल त्रास वाटत नाहीं. याशिवाय स्वार्थ विसरून आपल्या पक्षांकरितां सर्वांनीं जुटीनें झटणें, अपजय झाला असतां तो आनंदानें स्वीकारणें, प्रतिपक्षाशीं सौजन्यानें वागणें वगैरे किती तरी गोष्टी मुलें खेळांत शिकतात. खेळांत जडलेल्या या चांगल्या संवयींचा मुलांच्या पुढील आयुष्य-क्रमांत फार उपयोग होतो.

खेळाचे शिक्षणदृष्ट्या होणारे हे उपयोग पालकांनीं व शिक्षका. लक्षांत ठेविले पाहिजेत. आईबापांनीं लहान मुलांना खेळण्याची स्वतंत्रता दिली पाहिजे व त्यांना खेळण्याचें साहित्य पुरविलें पाहिजे. सात-आठ महिन्यांचीं मुलें झालीं कीं, रंगीत खुळखुळा, रंगीत चुरवणी वगैरे वस्तु त्यांना दिल्या पाहिजेत. मुलांना जमिनीवर भरपूर रांगूं दिलें पाहिजे. हातांत घेण्याला, आपटण्याला व फेकण्याला योग्य अशा चेंडूसारख्या वस्तु मुलांना पुरविल्या पाहिजेत. त्यांना मोकळेपणानें खेळूं दिलें पाहिजे. वडील माणसांनीं दूर राहावें व मुलें खेळतांना पडणार नाहींत किंवा त्यांना कोणत्याही प्रकारची इजा होणार नाहीं अशी काळजी मात्र घ्यावी. त्यांना सैल व साधे कपडे घालावे म्हणजे मुलांना हालचाल करण्यास प्रतिबंध होत नाहीं व खेळांत मळलेले

कपडे सहज धुतां येतात. लाडालाडानें मुलांना नेहमीं कटीखांद्यावर वागविणें बरोबर नाहीं. मुलें १॥–२ वर्षांचीं झालीं कीं त्यांना आंगणांत खेळूं द्यावें. मुलें तीन-चार वर्षांचीं झालीं कीं लाकडाचे लहान लहान घन, काटकोनाकृति तुकडे, लांब अरुंद पट्ट्या वगैरे साहित्य त्यांना खेळावयास दिलें, तर घरें, पूल, भिंत वगैरे बांधण्याचा खेळ मुलें मोठ्या आनंदानें खेळतात. चार-पांच वर्षांच्या मुलांना ओल्या वाळूचीं घरें, बोगदे, पक्ष्यांचीं घरटीं वगैरे आकृति करण्याचा खेळ फार आवडतो. शाळेंत व घरीं ओली वाळू मुलांना खेळण्याकरितां ठेवावी. वडील माणसांनीं व शिक्षकांनीं मुलांना नदीच्या अगर समुद्राच्या वाळवंटांत घेऊन जावें व त्यांना तेथें यथेच्छ खेळूं द्यावें. ओल्या चिकण मातीचेही अनेक प्रकारचे पदार्थ करण्यांत मुलांना फार गंमत वाटते. भोवरा, पतंग, चेंडूदांडू वगैरे खेळ खेळण्यास पालकांनीं मुलांना उत्तेजन द्यावें. पालकांनीं मुलांच्या खेळांत कधीं कधीं भाग घ्यावा व कधीं कधीं त्यांचे खेळ पाहाण्यास हजर असावें. खेळ हा मुलांचा निष्कारण उपद्व्याप आहे व खेळाचा त्रास नाइलाजास्तव आपण सोसला पाहिजे ही कल्पना पालकांनीं आपल्या मनांतून काढून टाकली पाहिजे. ज्यांना लहाणपणीं मोकळेपणानें खेळण्याची संधी मिळाली नाहीं, ज्यांना समवयस्क मुलांत मिसळण्याचें व खेळण्याचें भाग्य लाधलें नाहीं, त्यांचें शिक्षणदृष्ट्या फार मोठें नुकसान झालें आहे यांत शंका नाहीं. Child Education या सुप्रसिद्ध मासिकाच्या १९३५ च्या जुलै महिन्याच्या अंकांत एक रंगीत चित्र आहे. त्या चित्रांत एका कुटुंबांतील संध्याकाळच्या वेळचा एक देखावा दाखविला आहे. आई खुर्चीवर बसून शिवण शिवीत आहे, पण तिचें सारें लक्ष मुलांच्या खेळाकडे आहे. सहा-सात वर्षांची मुलगी व तिचा चारपांच वर्षांचा धाकटा भाऊ खेळांतील आगगाडी रूळावरून चालवीत आहेत. सर्वांत लहान दीड-दोन वर्षांचा मुलगा बापाला घोडा करून वर ऐटीनें बसला आहे व बाप मुलांना गाडी कशी चालवावी हें सांगत आहे. धाकट्या मुलाची लीला पाहून आईला हसूं येत आहे. अशा प्रकारचा हा देखावा आहे. या चित्रावरून इंग्रजी कुटुंबांत मुलांच्या खेळाला शिक्षणदृष्ट्या किती महत्त्व आहे यांची चांगली कल्पना येते.

शिक्षकानें देखील शिक्षणदृष्ट्या खेळाचें महत्त्व ओळखून वेळापत्रकांत या

विषयाकरितां वेळ राखून ठेविला पाहिजे. शिक्षकाला मुलांच्या खेळाची माहिती पाहिजे व त्याला हे खेळ खेळतां आले पाहिजेत. मुलांच्या वयाला अनुरूप अशा नवीन नवीन खेळांची त्यानें योजना केली पाहिजे. ज्याला खेळांची आवड नाहीं, ज्याला मुलांचे खेळ खेळतां येत नाहीं असला शिक्षक निदान प्राथमिक शाळेला तरी अयोग्य होय.

प्राथमिक शाळेंतील अभ्यासक्रम अगदीं प्रारंभीं तरी खेळाच्या रूपाचा असला पाहिजे. मुलांना खेळाची जी आवड असते तिचा अभ्यासाच्या कामीं उपयोग करून घेतला कीं, मुलांना अभ्यासांत गोडी वाटते व त्यांत त्यांची चांगली प्रगति होते. मुलें जोंपर्यंत लहान आहेत, तोंपर्यंत त्यांचा अभ्यास या खेळाच्याच पद्धतीनें घेतला पाहिजे. मुलांना संख्या, वाचन, लेखन, वाक्यरचना वगैरे विषय शिकवावयाचे असतात. हे विषय शिकवितांना खेळाच्या पद्धतीचा अवलंब केला असतां या विषयांत त्यांची चांगली प्रगती होते असा अनुभव आहे. मुलांना श्रम करण्याचा कंटाळा असतो असें नाहीं. खेळांत त्यांना पुष्कळ जास्त श्रम होतात, पण खेळांत गोडी वाटत असल्यामुळें त्यांना या त्रासाचें व श्रमाचें कांहीं वाटत नाहीं. लहान मुलांना उजळणी करणें, बेरीज-वजाबाकीचीं उदाहरणें करणें, खर्डे गिरविणें, वगैरे व्यवसायांत गोडी वाटत नाहीं, याचें कारण त्यांच्या आंगीं असणाऱ्या कृतिप्रेम, नवनिर्मितीची हौस, स्पर्धा, स्तुतिप्रियता इत्यादि सहज प्रवृत्तींना या व्यवसायांत अवसरच मिळत नाहीं. लहान मुलांना प्रारंभीं तरी हे विषय खेळाच्याच रूपानें शिकवावे म्हणजे त्यांना या विषयांत गोडी वाटेल. कांहीं दिवसांनीं ही खेळाची पद्धति हळूहळू कमी करावी. या संबंधींचें जास्त विवेचन माझ्या 'खेडेगांवची शाळा' या पुस्तकांत केलेलें आहे.

## भाग ६ वा

## स्मरण

मागील भागांत मुलाची मानसिक व शारीरिक प्रगति कशी होते याचा आपण विचार केला. मुलाच्या मानसिक प्रगतीचा विचार करितांना मागील

तीन-चार भागांत मुलाच्या स्मरणशक्तीचा उल्लेख मधून मधून केला आहे. या भागांत स्मरणशक्ति व तिचें कार्य याविषयीं आपण जास्त विचार करूं.

स्मरणशक्ति ही मनाची एक अजब शक्ति आहे. ही स्मरणशक्तीच मनुष्याचें ज्ञान व अनुभव यांचा संग्रह करिते. या संग्रह केलेल्या ज्ञानामुळें व अनुभवामुळें जास्त ज्ञान मिळविण्याचें कार्य सुलभ होतें. मनुष्याच्या जन्मापासून त्याच्या मरणापर्यंत त्याच्या आयुष्याचा प्रवाह एकसारखा अखंड वाहात असतो आणि तो अशा प्रकारें वाहण्यास त्याची स्मरणशक्तीच कारण असते. एकाद्या माणसाची स्मरणशक्ति एक प्रहरभरच नाहींशी झाल्यास केवढा अनर्थ होईल! एक मनुष्य सकाळीं उठला व त्याची स्मरणशक्ति एकाएकीं नाहींशी झाली अशी आपण कल्पना करूं. हा मनुष्य झोंपेंतून उठल्यावर आपण कोण आहों, आपलें नांव काय आहे हें देखील त्यास आठवणार नाहीं. त्याला भाषाही बोलतां येणार नाहीं. भोंवतालचीं माणसेंही त्याला ओळखतां येणार नाहींत. आई, बाप, बहीण, भाऊ, बायका, मुलें इत्यादि प्रेमळ माणसांचा व त्याचा संबंध तुटल्यासारखा होईल. त्यानें आयुष्यभर कष्टानें मिळविलेली विद्या, ज्ञान कला व कौशल्य हीं सर्व त्यास एकदम सोडून जातील. काय करावें हें त्याला सुचणार नाहीं व तो भांबावून जाईल. अशा प्रकारें या स्मृतिहीन माणसाचें आयुष्य एखाद्या जनावरापेक्षां किंवा कीटकापेक्षांही अधिक कष्टप्रद होईल. ईश्वरकृपेनें अशी स्थिति मनुष्यास कधींही प्राप्त होत नाहीं ही किती आनंदाची गोष्ट आहे!

स्मरणशक्तीच्या योगानें, नेत्र, कर्ण, स्पर्श वगैरे ज्ञानेंद्रियांनीं जें ज्ञान मिळतें तें मनांत सांठविलें जातें; व तें वाटेल तेव्हां पुन्हा काढतां येतें. मनांत आलेले विचार व कल्पना याही अशाच प्रकारें सांठवितां येतात; व पुन्हा वाटेल तेव्हां बाहेर काढतां येतात. हा संग्रह कसा केला जातो व मनांत संग्रह केलेलें ज्ञान पुन्हां वाटेल तेव्हां बाहेर कसें काढतां येतें हें एक मोठें गूढ आहे. शास्त्राला देखील याची नीट व स्पष्ट कल्पना आली नाहीं. फोनोग्राफच्या प्लेटीवर ज्याप्रमाणें गाण्याच्या किंवा भाषणाच्या निरनिराळ्या ध्वनींनीं खांचा पडतात व या खांचांतून फोनोग्राफची टांचणी फिरली कीं, हे ध्वनी पुन्हा उमटतात, त्याचप्रमाणें ज्ञानेंद्रियांनीं ग्रहण केलेल्या ज्ञानाची प्रतिमा मेंदूवर उमटतें

व मनाच्या प्रेरणेनें ती प्रतिमा वाटेल तेव्हां पुन्हा समोर उभी राहाते. अशा प्रकारचें स्मरणशक्तीच्या कार्याचें स्थूल स्वरूप आहे. मन प्रथम एकादी गोष्ट ग्रहण करितें, तेव्हां त्या गोष्टीची प्रतिमा मेंदूवर उमटते. ही प्रतिमा जितकी चांगली उमटेल तितकें त्या गोष्टीचें स्मरणही चांगलें राहातें. याच कारणामुळें घाईघाईनें पाहिलेली किंवा ऐकलेली गोष्ट आपणांस चांगली आठवत नाहीं. जी गोष्ट आपणांस कळतच नाहीं तिचें आपणांस ग्रहणच करितां येत नाहीं. यामुळें ती स्पष्टपणें आठवणेंच शक्य नसतें. ज्या गोष्टीची आपणांस भीति वाटते, किंवा जिच्या योगानें आपणांस आनंद होतो अथवा जिच्या योगानें आपणांस दुःख होतें ती गोष्ट आपल्या चांगली स्मरणांत राहाते. ज्या गोष्टीच्या योगानें आपल्या मनांत राग, भीति, आनंद, दुःख इत्यादि मनोविकारांपैकीं एक किंवा जास्त मनोविकार जोरदारपणें उद्भवतात ती गोष्ट आपल्या लक्षांत चांगली राहाते. हा अनुभव सर्वांचाच आहे. कोणत्याहि गोष्टीचें उत्तम ग्रहण होण्यास त्या गोष्टीकडे चांगलें लक्ष दिलें पाहिजे. अर्थातच एखाद्या गोष्टीकडे आपण चांगलें लक्ष दिलें नाहीं, तर त्या गोष्टीचें चांगलें ग्रहण होणार नाहीं, यामुळें तिची प्रतिमाही मेंदूवर स्पष्ट उमटणार नाहीं. प्रतिमाच स्पष्ट उमटली नाहीं, तर त्या गोष्टीचें स्मरणही चांगलें होणार नाहीं हें उघडच आहे. ग्रहण, लक्ष किंवा अवधान यांजवर अवलंबून असतें व स्मरण ग्रहणावर अवलंबून असतें. अवधान, ग्रहण व स्मरण यांचा हा अन्योन्य संबंध लक्षांत ठेविला पाहिजे.

जी गोष्ट आपण नेहमीं किंवा अनेक वेळां नियमितपणें पाहतों व जो आपणांस चांगली कळते, ती आपल्या चांगली स्मरणांत राहाते. जी गोष्ट आपण नेहमीं ऐकतों किंवा नियमितपणें अनेक वेळां ऐकतों व जी आपणांस चांगली कळते, ती गोष्ट आपल्या स्मरणांत चांगली राहाते. ज्ञानेंद्रियांनीं एखाद्या गोष्टीचें उत्तम ग्रहण झालें व तीच गोष्ट नेहमीं अथवा नियमित वेळीं आपल्या ज्ञानेंद्रियांनीं ग्रहण केली कीं तिचें चांगलें स्मरण राहातें. अशाच प्रकारें मुलांच्या नित्याच्या पाहण्यांतील वस्तु व मातृभाषेंतील शब्द मुलांच्या स्मरणांत चांगले राहतात. मूल आपलें पाणी पिण्याचें भांडें नेहमीं पाहातें, या भांड्याला वडील माणसें ‘ लोटी ’ म्हणतात व अशा प्रकारें ‘लोटी’ हा शब्द नेहमीं मुलाच्या कानावर पडतो. यामुळें लोटी ही वस्तु व लोटी हा शब्द

मुलाच्या स्मरणांत पक्का राहतो. तीन वर्षांच्या मुलाला भाषेंतील दोनशेंपर्यंत शब्द कळतात. सवाशें, दिडशें शब्द त्याला बोलतां येतात व निदान तितक्याच वस्तु त्याला ओळखतां येतात. तीन वर्षांचीं मुलें मिश्र अथवा संयुक्त वाक्यांचा उपयोग करितांना पाहून फार मौज वाटते. 'गणू खाऊ खाईल, आतां नाहीं मग' ( गणू आतां खाऊ खाणार नाहीं; तो मग खाऊ खाईल. ) 'बाबा सांग कुठ;' ( बाबा कोठें आहेत तें मला सांग; ) 'आई खाऊ दे, गणू रडतो नाहीं,' 'आई गणूला खाऊ दे म्हणजे तो मग रडणार नाहीं.' असे लहान मुलांचे वाक्यप्रयोग आपण नेहमीं ऐकतों. मिश्रवाक्यांचा उपयोग करण्याला स्मरणशक्तीची किती मदत लागते याची कल्पना सहज येईल. 'दादा जातो, ताई जाते, आई जेवते, भाऊ खेळतो,' इत्यादि वाक्यें मुलें नेहमीं ऐकतात व त्यांत असणारे व्याकरणाचे नियम स्मरणांत ठेवतात. 'आई गेला, दादा आली, ताई खेळतो' अशा प्रकारची चुकीची वाक्यरचना तीन वर्षांचीं मुलें देखील करीत नाहींत. यावरून त्यांची स्मरणशक्ति किती चांगलें काम करते याची कल्पना वाचकांना येईल. पांच-सहा वर्षांचीं मुलें आपली मातृभाषा शुद्ध रीतीनें बोलतांना पाहून आपणांला त्यांचें फार कौतुक वाटतें. प्रौढपणीं परकीय भाषा शिकतांना आपली किती त्रेधा उडते याचा अनुभव आपणां सर्वांस आहेच. 'बाबा बोलली, आई बोलला' असे प्रयोग करितांना किती तरी कानडी लोकांना आपण पहातों.

घरांतील वडील माणसें शुद्ध बोलत असलीं म्हणजे ते शुद्ध उच्चार व ती शुद्ध प्रयोगरचना मुलांच्या स्मरणांत राहातात व तीं सहजच शुद्ध बोलतात. कांहीं आईबापांना आपल्या मुलांशीं प्रेमानें बोबडें बोलण्यांत फार आनंद वाटतो; पण मुलाच्या शिक्षणाच्या दृष्टीनें पाहिलें असतां ही गोष्ट अनिष्ट आहे, हें उघडच आहे. लहान मुलांची स्मरणशक्ति केव्हांपासून कार्य करूं लागते हें नक्की सांगणें फार कठीण आहे. मूल आपल्या आईस ओळखूं लागलें कीं, त्याच्या स्मरणशक्तीचें कार्य उघडपणें दिसूं लागतें. ओळखणें ही क्रिया स्मरणशक्तीच्या मदतीशिवाय होत नाहीं हें मागें आपण पाहिलेंच आहे. तेव्हां चौथ्या पांचव्या महिन्यापासून मुलाच्या स्मरणशक्तीचें कार्य दिसूं लागतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. मुलाचें पहिलें वर्ष संपण्याच्या पूर्वीच तें घरांतील सर्व माणसांना ओळखतें. त्यांचीं नांवें त्याच्या लक्षांत राहतात. तें १५–२० तरी

शब्द बोलतें. टोपी, काठी, दूध, वाटी, पाणी, साखर वगैरे ४०–५० वस्तु तें नांवानें ओळखतें, पहिल्या वर्षी देखील मुलाच्या स्मरणशक्तीचें कार्य कधीं कधीं फार आश्चर्यकारक वाटतें. माझ्या आठ महिन्यांच्या मुलाला मीं आजोळीं धाडलें होतें. तिकडे तो महिनाभर होता. एक महिन्यानें त्याला परत आणण्यास मी त्याच्या गांवीं गेलों. माझ्या मुलानें मला ताबडतोब ओळखलें व तो रांगत रांगत मजकडे आला. एका आठ महिन्यांच्या मुलीची अशीच गोष्ट एका इंग्रजी पुस्तकांत दिली आहे. तिच्या आईनें तिला एकदां शहराच्या बाहेर नेलें. एका बागेच्या फाटकाजवळ त्या मुलीनें एक मेंढी पाहिली. ती एकसारखी बें, बें, करून ओरडत होती. तें तिचें ओरडणें ऐकून त्या मुलीला फार मौज वाटली. यानंतर तीन वारांनीं ती बाई आपल्या मुलीला घेऊन याच फाटकाजवळ आली. तो भाग व तें फाटक पाहून ती मुलगी बें बें असें ओरडूं लागली. यावरून तीन वारांच्या पूर्वी पाहिलेल्या मेंढीचें स्मरण त्या मुलीला झालें हें उघड दिसून आलें.

अगदीं लहान मुलाच्या भोंवतीं जे अनेक पदार्थ पडलेले असतात, ज्या अनेक क्रिया घडतात, त्यांपैकीं पुष्कळांचें या मुलाला ज्ञानच नसतें, यामुळें त्यांचें स्मरण त्याला राहणें शक्य नसतें. कांहीं कांहीं गोष्टींचें मुलाला अगदीं अस्पष्ट ज्ञान होतें, यामुळें त्यांचें स्मरणही अस्पष्टच होतें. ज्यांचें अस्पष्ट ज्ञान झालें आहे अशा गोष्टी स्मरणांत फार वेळ राहात नाहींत. यामुळें मुलांना पुष्कळ गोष्टींचें विस्मरण होतें. लहान मुलांच्या शारीरिक सुखदुःखाशीं ज्यांचा संबंध आहे, अशाच गोष्टींचें ज्ञान मुलांना अधिक होतें व साहजिकपणें अशाच गोष्टींचें स्मरणही त्यांना चांगलें राहातें. जिज्ञासा, खेळण्याची आवड, रचनेची आवड, कृतिप्रेम इत्यादि सहजप्रवृत्तींमुळें व अनुकरण व खेळ इत्यादि स्वाभाविक वृत्तींमुळें मुलाच्या ज्ञानांत कशी भर पडते याचें वर्णन मागील भागांत केलेंच आहे. मुलाला चालतां येऊं लागलें, तें खेळूं लागलें, स्नेहीसोबत्यांत मिसळूं लागलें, अनेक कृति करूं लागलें कीं, मुलाच्या स्मरणशक्तीचें कार्यही जोरांत चालूं लागतें; व स्मरणांत ठेविलेल्या ज्ञानाचा सांठाही वाढूं लागतो. मूल ६ व्या वर्षी शाळेंत जाऊं लागण्याच्या वेळीं त्याच्या स्मरणांत सांठलेला ज्ञानाचा केवढा मोठा संग्रह असतो !

मूल शाळेंत जाऊं लागलें कीं तेथील अभ्यासक्रम, तेथील मुलांचा सह-

वास, अनेक खेळ, हातकाम यामुळें मुलांचें ज्ञान वाढत असतें. त्यामुळें स्मरण-शक्तीचें कार्यक्षेत्रही वाढतें व स्मरणांतील संग्रहही वाढत जातो. पांचव्या वर्षांपासून १४ व्या वर्षांपर्यंत पाठांतर करण्याचें कार्य स्मरणशक्तीच्या जोरावर फार चांगलें होतें. पुढें विचारशक्तीचा जास्त विकास होतो व स्मरणशक्ति तिच्या हाताखालीं काम करूं लागतें; व पाठांतर करणें कठीण वाटूं लागतें.

अवधान व ग्रहण यांच्याशीं अगदीं निकट असलेला स्मरणाचा संबंध न कळल्यामुळें मुलाच्या संबंधानें पालक व शिक्षक यांचा कित्येक वेळां फार गैरसमज होतो. गोपाळरावांचा मधू फार खेळाडू होता. त्याची वृत्तिही फार चंचल असे. आपल्या मुलानें अमर व रूपावली पाठ करावी अशी गोपाळ-रावांची फार इच्छा होती. मुलानें जर या पुस्तकांचें पाठांतर केलें, तर हाय-स्कूलमध्यें त्याचें संस्कृत फार चांगलें होईल असें गोपाळरावांस वाटे. ते दर-रोज सकाळीं मधूला अमर पाठ करावयाला बसवीत. दोन-तीन महिने झाले, तरी मधूला सात-आठ श्लोक बिनचूक पाठ म्हणतां येईनात. गोपाळरावांनीं मधूवर शिक्षेचा प्रयोगहि करून पाहिला, पण त्याचाही कांहीं परिणाम झाला नाहीं. आपल्या मुलाला स्मरणशक्तीच नाहीं, त्याला संस्कृत बिलकुल यावयाचें नाहीं अशी गोपाळरावांची मग खात्री झाली; व अमराच्या मगरमिठींतून मधूची सुटका झाली. मधूला संस्कृताचा जो वीट आला तो मात्र त्याच्या मनांत कायम टिकला. वास्तविक मधूची स्मरणशक्ति दुर्बळ नव्हती. पण त्याला त्या नीरस अमरांत गोडी न वाटल्यामुळें त्याचें त्यांत अवधान लागेना; यामुळें पुढील ग्रहणाचें व स्मरणाचें कार्य होणेंच शक्य नव्हतें.

गोविंदाला सोमवारीं वर्गांत एक कविता म्हणून दाखवावयाची होती. शनिवारीं दुपारीं हातांत पुस्तक घेऊन तो ती कविता पाठ करीत बसला. शेजारीं त्याची बहीण आपल्या बाहुलीशीं खेळत होती. गोविंदा तोंडानें कवि-तेच्या ओळी म्हणे व कांहीं वेळ त्या बाहुलीकडे व कांहीं वेळ रस्त्यांतून जाणाऱ्या लोकांकडे पाही. अर्धा तास झाला, तरी गोविंदाच्या तीन ओळी देखील पाठ झाल्या नाहींत. मग तो आईकडे गेला व म्हणाला, 'आई, माझें डोकें फार मठ्ठ आहे. माझे शिक्षकही असेंच म्हणतात. पहा ही कविता मी एकसारखी अर्धा तास पाठ करीत आहें, तरी तिची एक ओळही नीट

माझ्या डोक्यांत शिरली नाहीं.' आईचें लक्ष गोविंदाच्या अभ्यासाकडे होतेंच. तिनें गोविंदाला आपल्याजवळ बसविलें. तिनें पुस्तक घेऊन ती कविता गोड आवाजांत म्हटली व नंतर ती कविता तिनें गोविंदाला नीट समजावून दिली. मग आईनें ती कविता गोविंदाला गळ्यावर म्हणण्यास शिकाविली. गोविंदाला ती कविता आतां फार आवडली. आईला त्यानें तीन-चार वेळ ती वाचून दाखविली. यानंतर त्याला त्या ओळी भराभर पाठ होऊं लागल्या. गोविंदाला त्या कवितेची जोंपर्यंत गोडी लागली नव्हती, तोंपर्यंत त्या कवितेकडे त्याचें अवधानच नव्हतें; आणि म्हणूनच ती त्याला पाठ होईना.

मुलें चार-पांच वर्षांचीं झालीं कीं, त्यांच्या मनांत गोष्टींची आवड उत्पन्न होते. प्रथत त्यांना कावळा, चिमणी, कुत्रा, मांजर वगैरे परिचित प्राण्यांच्या लहान लहान गोष्टी आवडतात. आणखी एक वर्ष सहा महिने गेले कीं मुलांना यांजपेक्षां जरा मोठ्या अशा गोष्टी आवडूं लागतात. यानंतर गोष्टींची ही आवड मुलांत वाढतच जाते. राजा, राणी, यक्ष, गंधर्व, जादू, मंत्र यांच्या अद्भुत कथा; रामायण व महाभारत यांतील थोर व्यक्तींच्या कथा; भोजराजा, विक्रम, पृथु-राज, शिवाजी वगैरे पराक्रमी राजांच्या कथा, सृष्टकथा वगैरे अनेक प्रकारच्या गोष्टी मुलांना आवडूं लागतात. मुलांना भराभर चांगलें वाचतां येऊं लागलें व भाषा समजूं लागली कीं दुसऱ्याच्या गोष्टी ऐकण्यापेक्षां स्वतांच गोष्टी वाचणें मुलांना जास्त आवडतें. मुलांच्या मनांत गोष्टी ऐकण्याची जी ही स्वाभाविक आवड आहे तिचा त्यांना शिक्षणदृष्ट्या फार उपयोग होतो. अली-कडे सुधारलेल्या देशांतील प्राथमिक शाळांतून खालच्या चार-पांच इयत्तांत गोष्ट या विषयाला जें प्रमुख स्थान मिळालें आहे त्याचें कारण हेंच होय. गोष्टींच्या योगानें मुलांचा शब्दसंग्रह वाढतो व त्यांना चांगली वाक्यरचना करितां येते. यांशिवाय नैतिक शिक्षणदृष्ट्या गोष्टीचे दुसरे अनेक फायदे आहेत. लहान मुलांना प्रारंभीं कांहीं दिवस ऐकलेली गोष्ट फिरून सांगतां येत नाहीं. जोंपर्यंत मुलांना ऐकलेली गोष्ट फिरून स्वतां सांगतां येत नाहीं तोंपर्यंत तीच तीच गोष्ट पुन्हा पुन्हा ऐकण्याचा त्यांना कंटाळा वाटत नाहीं. मुलें गोष्टींतील शब्द, वाक्यरचना व प्रसंग बरोबर लक्षांत ठेवतात व गोष्ट सांगणारानें त्या गोष्टींत थोडा जरी फरक केला, तरी तो त्यांच्या लक्षांत येतो व तो तीं. सांगणाराला दाखवितात. एकदां मी माझी 'चल रे भोपळ्या टुणुक टुणुक' ही गोष्ट ६

वर्षांच्या एका मुलाला सांगत होतों. त्यानें ती गोष्ट ३ वेळां आधीं ऐकिली होती. गोष्टीमध्यें 'मी मुलीच्या एथें जाईन, सात आठ दिवस राहीन' असे शब्द आहेत, त्यांच्या ऐवजीं मीं चुकून मी मुलीच्या एथें जाईन, पांच सहा दिवस राहीन' असें सांगितलें, त्याबरोबर त्या मुलानें मला थांबवून माझी चूक मला दाखविली. ही गोष्ट सुमारें ८०–९० ओळींची आहे, तथापि ती मनोरंजक असल्यामुळें ती त्या मुलाच्या लक्षांत चांगली राहिली. लहानपणीं पाठांतराचें काम लवकर होतें. मातृभाषा चांगली समजणें व बोलावयास येणें हा शिक्षणाचा महत्त्वाचा भाग आहे. गोष्ट मजेची असली म्हणजे मुलें ती लक्षपूर्वक ऐकतात. त्यांच्या ध्यानांत ती नीट आली नाहीं तर तीच गोष्ट मुलें आणखी दोन-तीन वेळां लक्षपूर्वक ऐकतात. नंतर ती गोष्ट हौसेनें मुलें इतरांस सांगतात. यामुळें त्या गोष्टींतील शब्दांची व वाक्यांची पुनरावृत्ति होऊन तीं त्यांच्या स्मरणांत चांगलीं राहतात. गोष्टींच्या योगानें अशा प्रकारें मुलांचा शब्दसंग्रह वाढत जातो व उत्तम वाक्यरचना त्यांना करितां येते. अलीकडे पालक मुलांना गोष्टी मुळींच सांगत नाहींत, कारण मुलांना योग्य अशा गोष्टी त्यांना स्वतःलाच माहीत नसतात. शाळेंत शिक्षकही कशातरी दोन-चार गोष्टी सांगतात. अशा रीतीनें गोष्टींच्या साहाय्यानें मुलांच्या स्मरणशक्तीचा शिक्षणाच्या कामीं जो उपयोग करून घ्यावयास पाहिजे तो पालक व शिक्षक करून घेत नाहींत.

लहान मुलांना गाणीं फार आवडतात. पण हीं गाणीं लहान मुलांच्या वयाला अनुरूप अशीं असलीं पाहिजेत. त्यांतील कल्पना मुलांना समजतील व गोड वाटतील अशा असल्या पाहिजेत. पांच-सहा वर्षांच्या मुलांना, ज्यांत विशेष अर्थ नाहीं, पण अनुप्रास व यमकें भरपूर आहेत अशीं चांदोबा चांदोबा भागलास कां अशीं गाणीं फार आवडतात व तीं त्यांच्या सहज लक्षांत राहतात. हीं गाणीं मुलांना बुद्ध्या शिकवावीं लागत नाहीं. मूल आपल्या भावाच्या, बहिणीच्या अथवा सोबत्याच्या तोंडून गाणें ऐकून तें लक्षांत ठेवितें. पालकांनीं असलीं गाणीं म्हणण्यास मुलांना उत्तेजन द्यावें. यानंतर सोपीं सोपीं मजेदार गाणीं गोड गळ्यावर म्हणण्यास मुलांना शिकविल्यास त्यांत त्यांना गोडी वाटते व तीं सहज त्यांच्या लक्षांत राहतात. गोष्टी व गाणीं यांत मुलांना फार गोडी वाटते. यामुळें मुलांच्या स्मरणशक्तीला बिलकूल ताण

बसत नाहीं. शिक्षणाच्या दृष्टीनें गोष्टी व गाणीं यायोगानें मुलांचा फार फायदा होतो.

स्मरणशक्तीचा विचार करितांना पाठांतर या बाबीचाही विचार केला पाहिजे. पूर्वी जेव्हां छापण्याची कला अस्तित्वांत नव्हती, तेव्हां ज्या विषयांचें अध्ययन करावयाचें त्याचा महत्त्वाचा भाग पाठ करावा लागे. यामुळें प्राचीन काळीं व्याकरण, काव्य, कोश वगैरे विषयांचा कांहीं भाग पांच ते चौदा वर्षांपर्यंतच्या वयांत मुलांकडून पाठ करून घेत. सध्यांही अंक, पाढे वगैरे उजळणी, कोष्टकें, भूगोलाच्या व व्याकरणाच्या व्याख्या, राजे लोकांच्या वंशावळी व सनावळी, कविता वगैरे भाग मुलांकडून शिक्षक व पालक पाठ करून घेतात. पुष्कळ पालकांची व शिक्षकांची अशी समजूत असते कीं, पाठांतरानें मुलांची स्मरणशक्ति वाढते. ही समजूत अगदीं चुकीची आहे असें प्रयोगांवरून शास्त्रज्ञांनीं ठरविलें आहे. पाठांतरानें मुलांची स्मरणशक्ति जर वाढली असती, तर व्याकरण पाठ केलेल्या विद्यार्थ्यांच्या स्मरणांत वनस्पतिशास्त्रांचीं वर्गीकरणें व व्याख्या सहज राहिल्या असत्या ! मुलांना व्याख्या पाठ आल्या कीं, तो विषय मुलांना चांगला येतो अशीही पुष्कळांची समजूत असते; व परीक्षांच्या सध्याच्या पद्धतीमुळें ही चुकीची समजूत शिक्षकांच्या, पालकांच्या व विद्यार्थ्यांच्या मनांत पक्की बिंबते. यामुळें विषय समजो वा न समजो, विद्यार्थी तो पाठ करितात; व शिक्षक व परीक्षक प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें अशा घोकंपट्टीला उत्तेजन देतात.

पाठांतराचा विचार करितांना पहिली गोष्ट ही लक्षांत ठेविली पाहिजे कीं, जें पाठ करावयाचें त्याची अतिशय आवश्यकता आहे कीं काय हें पाहिलें पाहिजे. अंक, पाढे, व्यवहारांतील कोष्टकें हीं प्रत्येकाला मुखोद्गत आलींच पाहिजेत. व्यवहारांत यांच्यावांचून प्रत्येक वेळेला अडेल तेव्हां हीं पाठ करणें अगदीं आवश्यक आहे. मुलांनीं व्याकरण, भूगोल, भूमिति इत्यादि शास्त्रीय विषयांतील कांहीं महत्त्वाच्या व्याख्या पाठ केल्या पाहिजेत, कारण व्याख्येंत अगदीं थोड्या शब्दांत महत्त्वाचें ज्ञान सांठविलेलें असतें. उत्तम कविताही त्यांना पाठ आल्या पाहिजेत, कारण वाटेल त्या वेळीं मनाला आनंद देणारें या कवितांसारखें दुसरें साधन नाहीं. या सर्व गोष्टी जरी खऱ्या आहेत, तरी

उजळणी, व्याख्या, कविता, कोष्टकें वगैरे समजून न घेतां पाठ करणें बरें नाहीं. न समजतां एखादी गोष्ट पाठ करणें याला घोकंपट्टी म्हणतात. पाठांतर आणि घोकंपट्टी यांत फार अंतर आहे. पाठांतर उपयोगी पडतें, तर घोकंपट्टीचा निरर्थक भार वाहावा लागतो. जें पाठ करावयाचें तें चांगलें समजलें, तर तें सहज पाठ होतें. विशेषणाची व्याख्या पाठ करावयाची आहे, तर प्रथम मुलांना विशेषणाचें स्वरूप चांगलें कळलें पाहिजे; त्यांना विशेषणें ओळखतां आलीं पाहिजेत, दिलेल्या नामांच्या मागें योग्य विशेषणें त्यांना घालतां आलीं पाहिजेत. यानंतर मुलांना विशेषणाची व्याख्या सहज पाठ होईल.

कित्येक गोष्टी मुलांना जरी समजल्या नाहींत, तरी भोवतालच्या आनुषंगिक इतर गोष्टींमुळें मुलांना त्यांत गोडी वाटते व त्यांना त्या सहज पाठ होतात. धुळें येथील प्रॅक्टिसिंग स्कूलमधल्या शिशुवर्गातील मुलेंही ५।६ रागांचीं लक्षणगीतें किंवा त्या रागांतील पद्यें सुरावर व ताल देऊन बिनचूक गातात. या पद्यांचा अर्थ त्यांना कळणें शक्य नसतें. तथापि गाण्यांतील मधुर ध्वनीमुळें व गोड रागांमुळें तीं पद्यें मुलांच्या सहज लक्षांत राहातात. राष्ट्रगीतें, प्रार्थनागीतें, रागांवरील पद्यें यांपैकीं कांहीं थोडीं लहान मुलांकडून त्यांना गोडी वाटेल अशा प्रकारें शिकवून पाठ करून घेतलीं पाहिजेत.

आपण साखर पाहिली कीं, तिची गोडी, तिचा रंग, तिचा भाव, तिजपासून होणारे पदार्थ वगैरे साखरेशीं ज्यांचा संबंध आहे अशा कितीतरी गोष्टी आपणांस आठवतात! आपण एखादा सोबती पाहिला, तर तो आपणांस मागें जेथें भेटला होता तें स्थळ, तो वेळ, त्याच्या सहवासांत घातलेला काळ वगैरे गोष्टी चट्कन् आपल्या स्मरणांत येतात. कार्यावरून कारणाची व कर्त्याची, स्थलावरून तेथील माणसांची अगर वस्तूंची, पदार्थावरून त्याच्या गुणधर्माची आपणांस तावडतोब आठवण होते. उलटपक्षीं कारणावरून कार्याची, वस्तूवरून तिच्या स्थलाची, गुणांवरून ते गुण ज्या पदार्थांत आहेत त्यांची आठवण होते. आपण एखादा मनुष्य पाहिला, तर ज्याचा चेहरा या माणसासारखा आहे अशा पूर्वी पाहिलेल्या माणसाची आपणास ताबडतोब आठवण होते. एखादी वस्तु पाहिली कीं तिच्यासारख्या दुसऱ्या वस्तूची आठवण होतेच; पण कधीं कधीं तिच्या अगदीं उलट असणाऱ्या वस्तूंची देखील आठवण होते. दिवसावरून रात्रीची आठवण येते.

उदार मनुष्याची आठवण झाली कीं कंजूष माणसाची कल्पनाही मनांत उभी राहाते. अशा प्रकारें आपल्या मनांतील कल्पना एकटी कधीं आढळत नाहीं. तिचा संबंध तिच्याभोंवतीं असणाऱ्या इतर कल्पनांशीं येतो. एखाद्या कल्पनेशीं संबंध असलेल्या इतर कल्पनांपैकीं एक कल्पना आठवतांच ती मूळ कल्पना आपणांस चटकन् आठवते. शाळेचा संबंध मुलें, शिक्षक, वर्ग वगैरे गोष्टींशीं येतो. मुलें, शिक्षक, किंवा वर्ग ह्यांपैकीं एकाची जरी आठवण झाली, तरी शाळेची आठवण होते. एका कल्पनेचा दुसऱ्या कल्पनेशीं जो संबंध असतो व ज्याच्या योगानें एक कल्पना आठवली कीं, तिच्याशीं संबंध असलेली दुसरी कल्पना आठवते त्याला कल्पनांचें साहचर्य असें म्हणतात. लहान मुलांच्या शिक्षणांत या साहचर्याचा फार उपयोग होतो. जी कल्पना मुलांच्या चांगली स्मरणांत राहावी असें आपणांस वाटतें तिचा दुसऱ्या कल्पनांशीं असलेला संबंध नीटपणें मुलांना दाखविला म्हणजे त्याच्या साहाय्यानें इष्ट कल्पनेचें मुलांना चट्कन् स्मरण होईल. तालुक्यांतील महत्त्वाच्या गांवांची यादी पाठ करून घेण्याऐवजीं शिक्षकानें, त्या तालुक्यांत मुलांबरोबर काल्पनिक सहली केल्या, निरनिराळ्या गांवांची ऐतिहासिक, पौराणिक अथवा इतर माहिती दिली, तर कल्पनासाहचर्याच्या योगानें हे गांव मुलांच्या चांगले लक्षांत राहतील. सिंहगडाच्या लढाईतील तानाजीच्या पराक्रमाचें वर्णन केलें, तर सिंहगड किल्ल्याची माहिती मुलांना चट्कन् आठवते. अशाप्रकारें या कल्पना-साहचर्याचा उपयोग सर्व विषय शिकवितांना करून घेतां येतो. श्लोक, उजळणी वगैरे म्हणतांना शब्दसाहचर्याचा उपयोग होतो. एक श्लोक झाल्याबरोबर दुसरा श्लोक क्रमानें पाठ म्हणण्याचें कार्य अनेक वेळां होतें. यामुळें एखादा श्लोक आठवत नसल्यास त्याच्या मागील श्लोक म्हटला कीं आठवत नसलेला पुढील श्लोक तावडतोब आठवतो. बारा सत्तें किती असें एकाद्या मुलाला विचारलें व त्याला तें आठवलें नाहीं, तर तो बाराएकें बारा असें म्हणण्यास सुरवात करितो व बारासकें बहात्तर हें आठवल्याबरोबर बारासातें चौऱ्यायशीं हें त्याला तेव्हांच आठवतें. याही साहचर्याचा स्मरणाच्या कामीं उपयोग होतो, पण या साहचर्याचा उपयोग जपून केला पाहिजे.

आपण आपल्या बालपणाकडे नजर फेकल्यास आपणांस असें दिसून येईल कीं, आपल्या वयाच्या पहिल्या पांच वर्षांत जे कांहीं प्रसंग घडले त्यांपैकीं क्वचि-

तच एखादा आपणांस आठवतो. आपण मागें पाहिलेंच आहे कीं, ज्या गोष्टींच्या योगानें आपल्या मनांत सुख, दुःख, राग, भीति वगैरे मनोविकार जोरानें उद्भवतात, त्या गोष्टी आपल्या स्मरणांत पुढें बराच काल राहतात, बाकीच्या गोष्टी आपण हळूहळू विसरून जातों. पहिल्या पांच वर्षांतले असले प्रसंग देखील आपणांस क्वचितच आठवतात. मला माझ्या वयाच्या पांचव्या वर्षीं घडलेला एक प्रसंग अद्यापि आठवतो. मी पळींत विस्तव घेऊन फटाकडे उडविण्यास जात होतों. जातांना पळींतील विस्तव माझ्या मनगटावर पडला व त्यामुळें माझें मनगट चरचरून भाजलें. माझ्या पांचव्या वर्षीं घडलेली आणखी एक गोष्ट मला आठवते. तिच्या योगानें माझ्या मनांत कोणतीही भावना उत्पन्न झाली नव्हती. एकदां मी माझ्या आईबरोबर पुराण एकावयास देवळांत गेलों होतों. तेथें पुराणिकानें पुण्याचा रंग पांढरा असतो असें सांगितलें. मला त्या वेळीं पापपुण्याची कांहींच कल्पना नव्हती. पुराण आटोपल्यावर मी बाहेर आलों व बागेंतील झाडावर बसलेला एक करकोचा पाहिला. आईला मीं विचारलें, 'आई, हें पुण्य आहे काय ?' पण आईचें लक्ष माझ्या प्रश्नाकडे नसल्यामुळें तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

अगदीं लहानपणीं सुखदायक, दुःखदायक किंवा भीतिदायक जे प्रसंग घडतात त्यांची आठवण जरी बुजल्यासारखी होते, तरी त्यांतील कित्येकांचा परिणाम मुलांच्या पुढील आयुष्यावर होतो. पुढील आयुष्यांत मनुष्याच्या अंगीं ज्या कांहीं आवडी-नावडी, गुण-दुर्गुण, प्रेम-द्वेष वगैरे मनोविकार दिसून येतात त्याला कांहीं अंशीं बालपणीं घडलेल्या इष्ट अगर अनिष्ट प्रसंगांची बुजलेली अगर जागृत असलेली आठवण असते असें मानसशास्त्राचें मत आहे. मी पांच वर्षांचा असतांना संध्याकाळीं काळोख पडल्यावर चिंचेच्या झाडाखालून जात होतों. एका द्वाड मुलानें, 'तें पहा, चिंचेवर केवढें भूत आहे ! तें तुझीं हाडें कडकड मोडून खाईल' असें ओरडून मला सांगितलें. त्याबरोबर मी भीतीनें घरीं धावत गेलों व कांहीं वेळ बेशुद्ध झालों. त्या प्रसंगाची पुढें मला आठवणही राहिली नाहीं. पण रात्रीं चिंचेच्या झाडाखालून जाण्यास पुढें कित्येक वर्षें मला निष्कारण भीति वाटत असे; व कित्येक वेळां मला स्वप्नांतही चिंचेच्या झाडावर भूत दिसे व भीतीनें मी जागा होई. मी माझ्या वडिलांना हें सांगितलें तेव्हां माझ्या लहानपणीं घडलेली ही हकिगत त्यांनीं

मला सांगितली. लहान मुलाच्या भोंवतालचें घरचें वातावरण प्रेमाचें असावें. तंटे, बखेडे, मारामाऱ्या, भांडण हीं जर कुटुंबांत मुलाच्या लहानपणीं चालू असतील, तर त्या सर्वांच्या त्याच्या मनांतील आठवणी जरी बुजाल्या, तरी त्या आठवणींचा अनिष्ट परिणाम कायमचाच होतो. शाळेंतील शिस्त सौम्य असावी व गुरुजींचें मुलांशीं वर्तन प्रेमळ असावें. सारांश, शाळेंतील व घरच्या आयुष्यांतील आठवणी आनंददायक असल्या म्हणजे मुलांच्या स्वभावावर त्यांचा परिणाम फार चांगला होतो.

स्मरणशक्तीच्या संबंधानें महत्त्वाच्या गोष्टी पुन्हां एकदां सांगून हा लांब-लेला लेख पुरा करूं.

१. स्मरणशक्तीच्या योगानें मनुष्याचें पूर्वज्ञान व अनुभव यांचा संग्रह केला जातो.

२. स्मरणशक्तीच्याच योगानें मनुष्याच्या आयुष्याचा जन्मापासून मरेतों-पर्यंत अखंड प्रवाह वाहतो.

३. स्मरणशक्तीनेंच नवीन ज्ञान मिळविण्याचें कार्य सुलभ होतें.

४. चांगलें स्मरण राहण्यास ग्रहण, उजळणी व साहचर्य या गोष्टी फार उपयोगी पडतात.

५. पाठांतर व घोकंपट्टी यांतील फरक लक्षांत ठेवावा. घोकंपट्टीला शिक्ष-कानें व पालकानें उत्तेजन देऊं नये.

६. पाठांतरानें स्मरणशक्तीचा विकास होतो हें म्हणणें चुकीचें आहे.

७. साधीं व लहान प्रार्थनागीतें, राष्ट्रगीत व मुलांना आवडणारीं गोड गाणीं हीं मुलांना सहज पाठ होतात.

८. मुलाच्या बाळपणींच्या शाळेंतील व घरच्या आयुष्यांतील आठवणी आनंददायक असाव्या.

# भाग ७ वा

## कल्पनाशक्ति

'डोळे, कान, त्वचा, नाक व जीभ या पांच ज्ञानेंद्रियांच्या योगानें जें जें ज्ञान आपणांस मिळतें त्याचा ठसा आपल्या मेंदूवर उमटतो आणि मग त्या ज्ञानाची प्रतिमा अगर स्मृतिचित्र आपल्या मनासमोर आपणांला वाटेल तेव्हां आणतां येतें. मनाच्या ज्या शक्तीमुळें हें कार्य घडतें तिला स्मृति अथवा स्मरणशक्ति असें म्हणतात. आपल्या मनांत जे विचार येतात, ज्या कल्पना आपल्या मनांत खेळत असतात व सुखदुःखादि ज्या भावना आपणांस होतात त्यांचेंही स्मरण आपणांस स्मरणशक्तीमुळें होतें.' हें सर्व आपण मागील भागांत पाहिलेंच आहे. आतां आपण या भागांत कल्पनाशक्तीचा विचार करूं.

जरी मीं हिमालयपर्वत पाहिला नाहीं, तरी सह्य, विंध्य व सात पुडा हे पर्वत मीं पाहिले आहेत. त्यांचीं स्मृतिचित्रें मला वाटेल तेव्हां माझ्या मना-समोर उभीं करितां येतात. त्याचप्रमाणें नदी, धबधबा, पिंजलेला पांढरा शुभ्र कापूस, कठीण झालेला बर्फ, झाडी, हरण, वाघ हीं मीं पाहिलीं आहेत, यांच्या प्रतिमा अगर स्मृतिचित्रें माझी स्मरणशक्ति माझ्या मनासमोर वाटेल तेव्हां उभी करिते. मी हिमालयाचें वर्णन भूगोलांतून वाचीत आहें. हिमालयावर होणारा हिमाचा वर्षाव, त्यावरलि बर्फाचे शिलाखंड, त्यांतून निघणाऱ्या हिमनद्या, नद्यांचे धबधबे, देवदाराची झाडी, कस्तुरीमृग हीं मीं पाहिलेलीं नाहींत. पण पूर्वी पर्वत, नद्या, धबधबे, झाडी, पिंजलेला कापूस इत्यादि ज्या गोष्टी मीं पाहिल्या आहेत,त्यांच्या प्रतिमा वाचीत असलेल्या बरहुकूम एकत्र करून मी माझ्या दृष्टीपुढें हिमालयाचें चित्र आणितों. खऱ्या हिमालयाच्या प्रत्यक्ष दर्शनानें माझ्या मेंदूवर जी त्याची प्रतिमा उमटेल, तितकें स्पष्ट व यथार्थ जरी मीं हें बनविलेलें चित्र नाहीं, तरी माझ्या भूगोलाच्या अभ्यासाला व विचाराला हें वर्णनाबरहुकूम जुन्या प्रतिमांच्या साहाय्यानें तयार केलेलें चित्र बरेंच उपयोगीं पडेल.

मराठी चवथी इयत्ता शिकत असलेल्या मुलाला महाराष्ट्राचा इतिहास वाचावयाचा असतो. या मुलानें शिवाजी महाराज, त्यांचे सरदार, त्याकाळचा समाज हीं पाहिलेली नसतात. पण सध्यांचे मावळे लोक, सध्यांचें खेडेगांव, जुनीं शस्त्रें, एखादा जुना किल्ला इत्यादि गोष्टी पाहिलेल्या असतात व त्यांच्या प्रतिमा त्याच्या मेंदूवर उमटलेल्या असतात. तें मूल इतिहास वाचीत असतांना त्याची स्मरणशक्ति त्याला जरूर त्या प्रतिमा त्याच्या मनासमोर उभ्या करिते. या प्रतिमांच्या अगर स्मृतिचित्रांच्या साहाय्यानें तें मूल वाचीत असलेल्या वर्णनाबरहुकूम महाराजांचें, त्यांच्या सरदारांचें व तत्कालीन समाजाचें चित्र तयार करितें व या अशा चित्रांमुळेंच त्याला महाराष्ट्राच्या इतिहासाचा अभ्यास करितां येतो. असें चित्र जर त्याला काढतां आलें नाहीं, तर त्याला इतिहास मुळींच कळणार नाहीं.

ज्ञानेंद्रियांनीं मिळविलेल्या ज्ञानाच्या ज्या प्रतिमा मेंदूवर उमटलेल्या असतात, त्यांतील ज्या जरूर असतील त्या आपली स्मरणशक्ति मनापुढें आणून उभ्या करिते व आपली कल्पनाशक्ति, आपण वाचीत असलेल्या अगर ऐकत असलेल्या वर्णनाबरहुकूम नवीन प्रतिमा किंवा कल्पनाचित्र तयार करित. कधीं कधीं मनुष्याची कल्पनाशक्ति स्मरणशक्तीनें पुरविलेल्या प्रतिमांच्या साहाय्यानें अगदीं नवीनच एखादी प्रतिमा तयार करिते. बाणकवीनें सार्वभौम राजा हर्ष याचें वैभव व ऐश्वर्य पाहिलें. राजश्रीप्रमाणें सकलगुणसंपन्न विद्वान् व धार्मिक अशी राजकन्या पाहिली. त्यानें अनेक सुदर स्थळें पाहिलीं. या सर्वांच्या स्मृतिचित्रांच्या साहाय्यानें त्यानें आपल्या कादंबरींतील गंधर्वनगरें व कादंबरी आणि महाश्वेता यांच्यासारखीं पात्रें निर्माण केलीं. रविवर्मा, ठाकोरसिंग यांजसारखे चित्रकार, म्हात्रे व फडके यांजसारखे मूर्तिकार किंवा रवींद्रनाथ टागोरसारखे कवि आपल्या स्मृतिचित्रांच्या साहाय्यानें आपल्या अपूर्व कल्पनशक्तीच्या जोरावर चित्रें, मूर्ति किंवा काव्यें निर्माण करीत असतात.

मनुष्याला कल्पनाशक्ति नसती, तर स्वतांच्या ज्ञानेंद्रियांनीं मिळविलेल्या ज्ञानाशिवाय दुसरें कोणतेंही ज्ञान त्याला मिळालें नसतें. इतिहास, भूगोल, काव्य, कला, व शास्त्रें हीं सर्व कळण्यास कल्पनाशक्तीचीच जरूर आहे. मनुष्याला कल्पनाशक्ति नसती, तर शास्त्रें व कला यांचा उदयच झाला नसता,

मग प्रगति तर दूरच राहिली. दुसऱ्याच्या सुखदुःखाची जाणीव कल्पनाशक्ती-नेंच होते. प्रवासांत, लग्नकार्यादि समारंभांत अगर एखाद्या संकटाच्या वेळीं वेळेवर आपणांस जेवावयास मिळत नाहीं व भूकेनें आपला जीव तळमळत असतो; एखादा गरीब भिकारी जेव्हां भुकेलेला आपण पाहातों, तेव्हां आपल्या पूर्व अनुभवांच्या साहाय्यानें, आपली कल्पनाशक्ति त्याला होणाऱ्या दुःखाचें चित्र आपल्या मनापुढें उभें करिते, मग आपण त्या माणसाला मदत करितों. अशा प्रकारें दुसऱ्याबद्दल सहानुभूति उत्पन्न होण्याला कल्पनाशक्तीची जरूर लागते. दुसऱ्याच्या दुःखाचें चित्र आपल्या दृष्टीपुढें उभें राहिलें नाहीं, तर आपणाला त्याजबद्दल सहानुभूति वाटणार नाहीं व आपण त्याला मदतही करणार नाहीं. सहानुभूति उत्पन्न होण्याला कल्पनाशक्ति अवश्य लागते, म्हणून नैतिक आचरणाला कल्पनाशक्तीची मदत पाहिजे हें उघडच आहे.

वरील विवेचनावरून कल्पनाशक्ति ही मनुष्याच्या बौद्धिक व नैतिक प्रगतीला किती अवश्य आहे याची कल्पना होईल. इतर प्राण्यांना कल्पनाशक्ति अगदींच कमी असते. यामुळें भविष्यकालाची किंवा भूतकालाची त्यांना जाणीवच नसते. आपला मुलगा १०-१५ वर्षांनीं मोठा होईल, तेव्हां त्याला सुखासमाधानानें कसें राहातां येईल याचें चित्र आपल्या कल्पनाशक्तीनें बाप काढतो व मुलांकरितां आजपासून पैसे मिळविण्यास सुरुवात करितो. मनुष्येतर सर्व प्राण्यांची धडपड वर्तमान काळाकरितां चाललेली असते. भूक लागली कीं भक्ष्य शोधावें, तहान लागली कीं पाणी शोधावें, असा त्यांचा क्रम असतो. त्या क्षणीं त्यांच्याभोंवतीं जी परिस्थिति असते तिनें त्यांचा आयुष्यक्रम जखडलेला असतो. मनुष्य आपल्या कल्पनाशक्तीच्या जोरावर भविष्य काळाकडे किंवा भूतकाळाकडे पाहूं शकतो. मनुष्येतर प्राण्यांना ही गोष्ट शक्य नसते.

कल्पनाशक्तीचें स्वरूप व तिचें कार्य याजबद्दल वर थोडक्यांत विवेचन केलें आहे. मुलांत तिचा उदय केव्हां होतो व मुलाच्या वाढीबरोबर तिचा विकास कसा होतो व तिचें स्वरूप कसें बदलत जातें हें आतां पाहूं.

ज्ञानेंद्रियांनीं उत्तम प्रकारें ज्ञान मिळवून त्या ज्ञानाची स्पष्ट प्रतिमा मेंदूवर उमटल्याशिवाय त्या ज्ञानाचें पुन्हा स्मरण होणें शक्य नाहीं. अशा अनेक स्पष्ट प्रतिमा स्मरणशक्तीनें मनासमोर उभ्या केल्याशिवाय या प्रतिमांच्या साहा-

य्यानें कल्पनाशक्तीला, ऐकत असलेल्या किंवा वाचीत असलेल्या वर्णनाबर-हुकूम प्रसंगाचें, वस्तूचें किंवा प्राण्याचें चित्र काढतां येणार नाहीं. यावरून कल्पनाशक्तीचें कार्य चालण्याला मुख्य पुढील तीन गोष्टी लागतात हें स्पष्ट होईल. पहिली गोष्ट ज्ञानेंद्रियांनीं उत्तम प्रकारें ज्ञान मिळविलें पाहिजे. दुसरी गोष्ट या ज्ञानाच्या स्पष्ट प्रतिमा मेंदूवर उमटल्या पाहिजेत. तिसरी गोष्ट स्मरणशक्तीनें यांपैकीं ज्या पाहिजेत त्या प्रतिमा झट्कन् मनासमोर उभ्या केल्या पाहिजेत. या तिन्ही गोष्टी उत्तम प्रकारें झाल्या, तरच कल्पनाशक्ति आपलें कार्य करूं शकते. ज्या लहान मुलाला खाऊचें ज्ञान नाहीं, त्याला आई तुला खाऊ देईल असें सांगितलें, तर या प्रसंगाचें चित्र त्याच्या कल्पनाशक्तीला रेखाटतांच येणार नाहीं. 'समुद्रानें चोहोंबाजूंनीं वेढलेल्या प्रदेशास बेट असें म्हणतात,' ही व्याख्या मुलानें वाचली, पण जर त्यानें यापूर्वी समुद्रच पाहिला नसेल व प्रदेश म्हणजे काय याचें ज्ञान जर त्याला नसेल, तर त्याची कल्पनाशक्ति बेटाचें चित्र काढूं शकणार नाहीं व त्या मुलाला ही व्याख्या मुळींच कळणार नाहीं. मुलाचीं ज्ञानेंद्रियें जेव्हां थोडेंफार ज्ञान मिळवतील जेव्हां या ज्ञानाच्या प्रतिमा त्याच्या मेंदूवर उमटतील, यांपैकीं जरूर त्या प्रतिमा त्याला मनापुढें उभ्या करितां येतील, तेव्हांच त्याच्या कल्पनाशक्तीच्या कार्याला प्रारंभ होईल. अर्थातच मूल सातआठ महिन्यांचें होईपर्यंत त्याच्या कल्पनाशक्तीचें कार्य आपणांस दिसून येत नाहीं. लहाना वसंत सातआठ महिन्यांचा होता. त्याला पाळण्यांत निजवून आई शेजारच्या खोलींत काम करीत होती. कांहीं वेळानें वसंताची झोप संपली व डोळे उघडून स्वारी पाहूं लागली. थोड्या वेळानें त्याला भूक लागली व त्यानें रडण्यास सुरुवात केली. त्याच्या आईनें त्याचें रडणें ऐकलें व शेजारच्या खोलींतून ती म्हणाली, 'बाळाची झोप झाली का? थांब बरं, मी हात धुऊन आलेंच.' आईचा आवाज ऐकून वसंताचें रडें थांबलें व तो दरवाजाकडे पाहूं लागला. आईचा आवाज ऐकिल्याबरोबर, आई आतां येईल, आपणास उचलून घेईल व पोटाशीं धरून पाजील इत्यादि गोष्टींचें चित्र—अर्थातच हें अस्पष्ट होतें—वसंताच्या कल्पना-शक्तीनें तयार केलें व तो रडण्याचा थांबला. माझी लहान मुलगी जेव्हां एक वर्षाची होती, तेव्हां ती 'गो गो' ( खाऊ घे ) म्हणून माझ्या हातांत आपली चिमुकली मूठ ठेवीत असे व मला 'गो गो खा,' म्हणून सांगत असे. तिचा

हा लटुपुटीचा खेळ कल्पनाशक्तीच्या मदतीशिवाय खेळणें शक्य नव्हतें. शरद एक वर्षाचा होता. एक दिवस दुपारीं त्याची आई त्याला निजवून शेजारच्या रमाबाईकडे गेली. तिनें शरदच्या नऊ वर्षांच्या बहिणीस शरदजवळ बसविलें होतें. अर्ध्या तासानें शरद जागा झाला व 'आई' म्हणून रडण्यास त्यानें सुरुवात केली. बहिणीनें त्याला कडेवर घेतलें व म्हणाली, 'आई आतां येईल. मग शरूला खाऊ देईल. शरू मला थोडा खाऊ देशीलना?' या तिच्या सांगण्यानें शरदचें रडें थांबलें. बहिणीनें सांगितलेल्या गोष्टीचें शरदच्या कल्पनाशक्तीनें आनंददायक चित्र रेखाटलें, म्हणूनच तो गप्प बसला.

डॉक्टर सली यांनीं आपल्या एका पुस्तकांत एका अडीच वर्षांच्या मुलाच्या कल्पनाशक्तीची मजेदार गोष्ट दिली आहे. हा मुलगा व त्याची थोरली बहीण आपल्या आईबापांबरोबर शेजारच्या समुद्रकांठच्या गावीं गेलीं होतीं. हीं दोघें वाळवंटांत किनाऱ्यावर उभीं राहून जाणाऱ्या बोटी पहात असत. बोटींतील माणसें दूर दूर जातांना दिसत व कांहीं वेळानें तीं नाहींशीं होत. आपल्या गांवीं हीं मुलें पुन्हा परत आल्यावर एके दिवशीं तीं खोलींत खेळत होतीं. भावाला बहीण म्हणाली, "आपण खेळ खेळूं. मी बोटींत बसून गांवाला जातें. तूं आतां किनाऱ्यावर उभा रहा." धाकट्या भावाला बहिणीचें हें सर्व बोलणें कळलें. मग तो लांब टेबलाचे पलीकडे जाऊन उभा राहिला. बहीण म्हणाली, 'भाऊ, मी गांवाला दूर जातें.' मग ती हळूहळू मागें सरत गेली. भावाच्या कल्पनाशक्तीनें उत्तम कल्पनाचित्र तयार केलें व आपली बहीण खरोखरीच लांब जाणार व आपणापासून दूर होणार असें त्यास वाटलें. आपली बहीण दूर जाणार या कल्पनेनें त्याला फार दुःख झालें व तो ओक्साबोक्सीं रडूं लागला.

कल्पनाशक्तीला व्यवसाय देऊन तिचा विकास करणारा खेळासारखा दुसरा शिक्षक नाहीं. काठीला घोडा समजून तिचा घोडा करणें व या घोड्यावर दौडत जाणें; एकमेकांच्या कपड्यांचीं टोकें धरून आगगाडी तयार करणें; बाहुलीला बाळ समजून तिला न्हाऊं घालणें, दूध पाजणें व थोपटणें; डाळ्याचुरमुऱ्याला वरणभात, लाडू समजून मेजवानींचा थाट उडविणें; आई, बाप, बहीण, भाऊ बनून संसाराचें नाटक करणें वगैरे मुलांच्या खेळांतील प्रकार पाहिले म्हणजे खेळांच्या योगानें मुलाच्या कल्पनाशक्तीला किती व्यवसाय

मिळतो, हें चांगलें कळतें. प्रारंभीं दोन तीन वर्षें खेळांत लहान मुलांची कल्पनाशक्ति वडील मुलांच्या सांगण्याबरहुकूम काम करीत असते. 'बाबू, तूं माऊ हो, मग मी तुला खाऊ देईन;' असें वडील बहिणीनें सांगतांच अडीच वर्षांचा बाबू गुडघे व हात टेकून मांजर बनला. ताईनें त्याच्यापुढें कागदावर पेढ्याचा तुकडा ठेवला व तो या मांजरानें खाल्ला. सहा सात वर्षांचें मूल झालें म्हणजे तें स्वतंत्रपणें खेळ खेळूं लागतें. प्रत्येक खेळांत खेळाडूला कल्पनाशक्तीची जरूर असते. क्रिकेट, खो खो, आट्यापाट्या, व्हालीबॉल इत्यादि खेळांतही आपला प्रतिपक्षी पुढें कसा वागेल याचें चित्र खेळाडूला काढावें लागतें व त्याप्रमाणें त्याला वागावें लागतें. सोंगट्या, बुद्धिबळें, गंजीफा, पत्ते वगैरे बैठ्या खेळांतही कल्पनाशक्तीला काम करावें लागतें. जो खेळाडू आपल्या कल्पनाशक्तीनें पुढील डाव नीट लक्षांत आणतो तोच डाव जिंकतो.

खेळांत आपल्या कल्पनाशक्तीनें निर्माण केलेल्या प्रसंगांत मुलें अगदीं तल्लीन होतात. सात वर्षांची सुधाताई खेळांत आई बनते. दोन वर्षांचा प्रभाकर तिचें बाळ बनतो. सुधा त्याला चमच्यानें दूध पाजते. तो सुधाचे मांडीवर डोकें ठेऊन झोप आल्याचें सोंग करितो. सुधा त्याला थोपटते व गाणें म्हणते व हळूच त्याला सतरंजीवर निजवते. अशा प्रकारें अगदीं शांतपणें हें संसाराचें नाटक चालतें. आठ वर्षांचा विनायक शिक्षक बनतो. त्याची धाकटी बहीण पांच वर्षांची गुलाब व दुसरी दोन वर्षांची बहीण छबू या त्याच्या विद्यार्थिनी होतात. लागलीच प्रार्थना होऊन अभ्यासाला सुरवात होते. छोटी छबू पाटीवर रेघा काढण्यांत गुंग होते. पांच मिनिटांत शाळा पुरी होऊन लागलींच आगगाडीचा खेळ सुरू होतो. अशा प्रकारें खेळांत मुलांच्या कल्पनाशक्तीचा व्यवसाय सारखा सुरू असतो. शिक्षणदृष्ट्या खेळाचे फायदे किती होतात याचें वर्णन मागें केलेंच आहे; म्हणून पुन्हा त्या गोष्टींचे येथें विवेचन करीत नाहीं.

गोष्टीमुळेंही मुलांच्या कल्पनाशक्तीला व्यवसाय मिळतो. गोष्टीच्या योगानें मुलांचा शब्दसंग्रह वाढतो, आपले विचार सुसंबद्ध रीतीनें सांगण्याची संवय मुलांना लागते. हे फायदे तर होतातच; पण गोष्टींच्या योगानें मुलांच्या कल्पनाशक्तीला फार चांगला व्यवसाय मिळतो हा गोष्टींचा सर्वांत मोठा फायदा आहे. मुलें ३, ३॥ वर्षांचीं झालीं म्हणजे त्यांना परिचित असलेल्या प्राण्यांच्या व प्रसंगाच्या गोष्टी समजूं लागतात. माझी धाकटी मुलगी ३॥ वर्षांची

असतांना मीं तिला पुढील गोष्ट सांगितली. 'एक माऊ होती. ती गेली चुलीपाशीं. चुलीवर दुधाचें भांडें होतें. तें दूध माऊनें पाहिलें, माऊनें दूध खाल्लें. आई तिथें आली. तिनें माऊला काठी मारली. मग माऊ म्यांव म्यांव करून पळाली.' माझी ही गोष्ट मुलीला चांगली कळली असें तिच्या मुद्रेवरून मला दिसलें. मीं तिला म्हटलें, 'बाळ, हीच गोष्ट मला सांग पाहूं' तिनें पुढें दिल्याप्रमाणें ही गोष्ट मला सांगितली. ती म्हणाली, 'माऊ बुभू [दूध] आली. बुभू खाल्ली. आई काठी मा. माऊ म्याव म्याव, पळून गेली.' ही गोष्ट सांगतांना तिनें जे हावभाव केले त्यांजवरून तो सर्व देखावा तिच्या दृष्टीसमोर दिसत होता असें वाटलें.

अगदीं लहान मुलांना सांगावयाच्या गोष्टी अगदीं साध्या असाव्या. इसापनीतींतील गोष्टी अगर नैतिक कथा या वयांत मुलांना कळत नाहींत. अलीकडे लहान मुलांना पालकांनीं संध्याकाळीं गोष्टी सांगण्याची जुनी पद्धति आपल्या इकडे नाहींशी झाली आहे. पालक व शिक्षक यांच्या जवळ लहान मुलांना योग्य अशा गोष्टींचा संग्रहही नसतो. इंग्रजी, फ्रेंच, जर्मन वगैरे यूरोपीयन भाषांत लहान मुलांना योग्य अशा गोष्टींचीं कितीतरी पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत व होत आहेत. लहान मुलांकरितां गोष्टी लिहिणें हें काम फार कठीण आहे; व तें फारच थोड्यांना साधतें. मुलांत अगदीं मिळून मिसळून शिक्षणाचें काम केल्याशिवाय ही कला कोणालाही साधावयाची नाहीं

मुलांना गोष्ट सांगतांना भाषा अगदीं सोपी असावी. अगदीं लहान मुलांना धांवपळीच्या व ज्यांत पुन्हा पुन्हा तींच तींच वाक्यें येतात अशा गोष्टी फार आवडतात. मुलें जसजशीं मोठीं होतात, तसतशी त्यांच्या गोष्टींची आवडही बदलते. पशुपक्ष्यांच्या गोष्टी, अद्भुत कथा, सृष्टकथा, थोरपुरुषांच्या आख्यायिका, त्यांच्या चरित्रांतील अद्भुत प्रसंग, रामायण व महाभारतांतील गोष्टी, ऐतिहासिक गोष्टी इत्यादींची आवड मुलांना हळूहळू लागते. ज्यांत तात्पर्य प्रामुख्यानें दिलें आहे व ज्यांत नीत्युपदेशाचें पुराण आहे अशा गोष्टी मुलांना सहसा आवडत नाहींत.

गोष्ट ऐकल्यानंतर ती जर मनोरंजक असेल, तर ती मुलांच्या मनांत सारखी खेळत असते. त्या गोष्टींतील पात्रें आपण बनून त्यांजप्रमाणें आपण कृति करावी असें मुलांना वाटतें. 'राजपुत्र व प्रधानपुत्र शिकारीस गेले.

तेथें त्यांची व त्यांच्या सैन्याची चुकामुक झाली. मग ते घोर रानांत भटकूं लागले. तेथें त्यांच्यावर संकटें आलीं. त्यांतून ते शौर्यानें पार पडले. त्यांनीं वाघ, सिंह वगैरे प्राण्यांची शिकार केली व शेंकडों रानटी लोकांशीं युद्ध केलें व त्यांचा पराभव करून आनंदानें ते घरीं आले' ही गोष्ट दुपारीं ऐकल्या-वर रघुनाथ व गोविंदा हे दोघे भाऊ, राजपुत्र व प्रधानपुत्र बनले. त्यांनीं काठ्यांचीं शस्त्रें केलीं. टेबलाचा त्यांनीं डोंगर केला व त्याजवर ते चढून बसले. काल्पनिक जनावरांची त्यांनीं तेथून शिकार केली व खालीं उतरून त्यांनीं रानटी लोकांशीं युद्ध केलें व त्यांची दाणादाण केली. या खेळांत ते दोघे इतके रंगले कीं, आईनें जेवणाकरितां मारलेल्या हाका त्यांना बिलकूल ऐकूं आल्या नाहींत. काल्पनिक अद्भुतकथा ऐकण्याची गोडी मुलें १०।१२ वर्षांचीं झालीं कीं कमी होते व त्यांना ऐतिहासिक कथा आवडूं लागतात. तथापि अद्भुतकथांबद्दलची मुलांची आवड अगदींच नाहींशी होत नाहीं.

गोष्टींच्या योगानें मुलांची कल्पना कशी काम करते, आपल्या कल्पना-शक्तीनें काढलेल्या कल्पनाचित्रांत मुलें कशीं रंगतात व भोंवतालच्या परिस्थि-तीचा त्यांना कसा विसर पडतो याचें सुंदर वर्णन प्रसिद्ध रशियन तत्त्ववेत्ता काउंट टॉलस्टॉय यांनीं आपल्या ग्रंथांत एके ठिकाणीं केलें आहे. खेडेगांवांतील जनतेंत विद्येचा प्रसार व्हावा म्हणून काउंटसाहेब एका खेडेगांवांत जाऊन राहिले व तेथें त्यांनीं लहान मुलांकरितां एक शाळा चालविली. हळूहळू मुलांचें त्यांच्यावर फार प्रेम जडलें. एकदां संध्याकाळीं पांच वाजतां त्यांनीं आपल्या मुलांना रशियांतील थोर पुरुषांच्या गोष्टी सांगण्यास सुरवात केली. लवकरच मुलें व शिक्षक उभयतांही त्या गोष्टींत रंगून गेलीं. वेळ कसा जात होता याचें भान त्यांना राहिलें नाहीं. गोष्टीच्या भरांत मुलें आपली जागा सोडून हळूहळू शिक्षकाच्या भोंवतीं जमलीं. एक लहान मुलगा शिक्षकाच्या मांडीवर बसला व बाकीचीं मुलेंही शिक्षकाच्या अगदीं जवळ बसलीं. अंधार पडला, तरी त्याचें भान त्यांना राहिलें नाहीं. अखेर मुलांचे पालक मुलें घरीं आलीं नाहींत म्हणून त्यांना पाहण्यास कंदील घेऊन शाळेंत आले व मग शिक्षक व शिष्य यांची समाधि मोडली.

# भाग आठवा

## कल्पनाशक्ति ( पुढें चालू )

शिक्षकांनीं व पालकांनीं मुलांना भुतें–पिशाचें, राक्षस, ब्रह्मसंबंध, वेताळ वगैरेंच्या भयंकर कथा कधींही सांगू नये. मुलांनीं या गोष्टी ऐकल्या कीं, रात्रीं त्यांना फार भीति वाटते. मुलें आपण ऐकिलेल्या गोष्टींतील भुतांचीं चित्रें आपल्या कल्पनाशक्तीनें तयार करतात व रात्रींच्या अंधारांत त्या चित्रांप्रमाणें आकृति त्यांना दिसूं लागतात. या भीतीमुळें मुलांची फार त्रेधा उडते. या भीतीमुळें कितीतरी मुलें तोंडावर पांघरूण घेऊन निजतात व घामाघूम होतात. वडील माणसांना आपल्या या भीतीबद्दल मुलें कधींही बोलत नाहींत, कारण वडील माणसें आपणांला रागावतील अशी त्यांना धास्ती वाटते. मुलांना ही भुतांखेतांची भीति लहानपणीं जडली कीं, ती त्यांना जन्मभर चिकटते. अशा भीतीनें मुलें फार नेभळट बनतात व रात्रीं अंधारांत जाण्यास थरकांप भितात. आपल्या इकडे वडील माणसें लहान मुलांस बुवाची भीति घालतात, हें देखील वाईटच आहे. बुवाची भेसूर अशी काल्पनिक मूर्ति मुलांना अंधारांत दिसते. कांहीं कांहीं मुलें या भीतीनें बेशुद्ध पडतात व कांहींच्या प्रकृतीवर या भीतीचा फार अपायकारक परिणाम होतो. अशा प्रकारची अपायकारक भीति आपल्या मुलांना वाटूं नये म्हणून सुधारलेल्या देशांतील लोक फार जपतात. गडीमाणसांनीं आपल्या मुलांना भीतिदायक गोष्टी सांगूं नये, याबद्दल पालक फार काळजी घेतात. यामुळें इंग्लंड, अमेरिका वगैरे देशांतील लहान मुलें फार धीट असतात. आपल्या स्वतांच्या स्वतंत्र खोलींत रात्रीं एकटें निजण्यास तीनचार वर्षांचीं देखील मुलें तिकडे कधीं भीत नाहींत.

अद्भुतकथांत कितीएक वेळां राक्षसांचा उल्लेख येतो. ‘राक्षसांना लांब लांब दाढा असतात, त्यांना सिंहासारखीं नखें असतात, असें वर्णन न करतां राक्षस हे माणसांपेक्षां बळकट असतात व ते फार दुष्ट असतात, एवढेंच राक्षसांचें वर्णन केल्यास मुलांच्या मनांत त्यांच्याबद्दल भीति उत्पन्न होणार नाहीं. कल्पनाशक्तीला, खेळ आणि गोष्टी याप्रमाणेंच किंबहुना यांहूनही जास्त व्यवसाय देणारें तिसरें साधन चित्रकला व हातकाम हें होय. कागदाच्या निरनिराळ्या आकृति बनविणें, कामट्या व काड्या यांच्या साह्यानें अनेक नमुने करणें,

मातीच्या निरनिराळ्या वस्तु बनविणें इत्यादि व्यवसायांत मुलांना फार आनंद वाटतो. गोष्टी व हातकाम यांचा संबंध जोडून घ्यावा. गोष्टींतील कोणताही एखादा प्रसंग घेऊन मुलांनीं त्यांचीं चित्रें काढावीं अगर गोष्टींत ज्याचा संबंध आला आहे अशा प्राण्याचें अथवा पदार्थाचें चित्र काढावें अगर मातीचा नमुना तयार करावा. चित्रकला व हातकाम यांत मुलांना पुष्कळ स्वातंत्र्य मिळालें पाहिजे. शिक्षकानें कृति करावी व मुलांनीं त्याच्या मागोमाग त्याच्या कृतीची नक्कल करावी हें खरें हातकाम अगर ही खरी चित्रकला नव्हे. अशा यांत्रिक शिक्षणपद्धतीनें मुलांच्या कल्पनाशक्तीला बिलकूल व्यवसाय मिळत नाहीं. 'मेक्यानोचे खेळ' मुलांच्या कल्पनाशक्तीला व्यवसाय देण्यास फार उपयोगी पडतात. सात आठ रुपयांचा मेक्यानोचा सेट घेतला, तर एकाच वेळीं चार मुलांना भरपूर काम देतां येतें. आपल्या कल्पनांना आपल्या बोटांनीं दृश्य स्वरूप देण्यांत मुलांना फार आनंद वाटतो. मुलांना हातानें आपल्या कल्पना व्यक्त करण्यास भरपूर संधि देणें हें मुलांच्या कल्पनाशक्तीचा विकास करण्याला अत्यंत आवश्यक आहे, हें शिक्षकांनीं व पालकांनीं निरंतर लक्षांत ठेवावें. मुलांना खेळणीं व हातकामाला भरपूर साहित्य दिलें पाहिजे. हीं खेळणीं व हें साहित्य अगदीं साधें असावें. भारी किंमतीचीं खेळणीं व बाहुल्या यांनीं मुलांच्या कल्पनाशक्तीला कार्य करण्यास अवसर मिळत नाहीं. मुलांना भारीं किंमतीचीं नवीं नवीं खेळणीं नेहमीं देऊं नये. मुलीला आज एक बाहुली दिली, तर लागलींच पंधरा दिवसांनीं दुसरी जास्त किंमतीची बाहुली देणें हें शिक्षणदृष्ट्या चांगलें नव्हे. बाहुलीचे कपडे आयते विकत न आणतां मुलीनें तयार करावे हे अधिक चांगलें. कपडे मळतील म्हणून मुलाला मातकाम न करूं देणें हेंही शिक्षणदृष्ट्या वाईट आहे. मुलांचीं बोटें हें मानसिक शिक्षणाचें मोठें साधन आहे. या साधनाचा उपयोग शक्य तितका करून घेतला पाहिजे.

शाळेंत व घरीं कृतिपर गाणीं मुलांना शिकवावीं. मुलांना गाण्याचा अर्थ पूर्णपणें कळला व त्यांना भरपूर स्वातंत्र्य दिलें, तरच मुलें गाण्यांतील अभिनय बरोबर करितात. अशा प्रकारें साभिनय म्हणावयाचीं गाणीं फारच थोड्या घरीं व शाळांत मुलांना शिकवितात. कित्येक शाळेंत मुलें गातांना केवळ यांत्रिक हालचाल करितात; यामुळें या मुलांना गाण्यांतील भाव मुळींच कळत नाहीं. हें प्रेक्षकाच्या ताबडतोब लक्षांत येतें. मुलांना योग्य अशीं लहान लहान नाटकें अली-

कडे बऱ्याच लेखकांनीं लिहिलीं आहेत. या नाटकांचा प्रयोग करण्यांत मुलांना फार आनंद वाटतो व त्यांच्या कल्पनाशक्तीला चांगला व्यवसाय मिळतो.

कल्पनाशक्ति ही विचारशक्तीची थोरली बहीण आहे. मनुष्य आपल्या भोंवतालीं पसरलेल्या विश्वाचें व त्यांतील चमत्कारांचें कोडें समजावून घेण्याचा प्रयत्न करीत असतो. मनुष्यसमाजाच्या ज्ञानाची ज्यावेळीं फारशी प्रगति झाली नव्हती त्यावेळीं मनुष्य आपल्या कल्पनाशक्तीवर भर देऊन जगाचें कोडें सोडविण्याचा यत्न करीत असे. मुलाची स्थितिही समाजाच्या बाल्यावस्थेप्रमाणेंच असते. त्याजजवळ ज्ञानाचा व अनुभवाचा साठा कमी असल्यामुळें त्याच्या भोवतालीं असणाऱ्या अनेक गोष्टींचा तो आपल्या कल्पनेनें उलगडा करीत असतो. जसजसा ज्ञानाचा व अनुभवाचा साठा वाढत जातो तसतशी विचारशक्ति जास्त काम करूं लागते व कल्पनाशक्ति विचारशक्तीच्या हाताखालीं काम करूं लागते.

लहान मुलास सजीव व निर्जीव यांतील फरक कळत नाहीं. यामुळें आपणाला ज्याप्रमाणें सुख किंवा दुःख होतें, त्याचप्रमाणें निर्जीव वस्तूसही सुख किंवा दुःख होतें असें त्याला वाटतें. मुलाच्या या विचारसरणीच्या अनेक गोष्टी इंग्लिश पुस्तकांत दिलेल्या आहेत. काचेच्या तावदानावर भुंगा एकसारखा गुंग गुंग करीत होता. तें एका तीन वर्षांच्या मुलानें पाहिलें व तो आपल्या आईला म्हणाला, 'आई, हा भुंगा खाऊ मागत आहे. याला थोडा खाऊ दे.' एका इंग्लिश ग्रंथकर्त्रीनें आपल्या लहानपणाचा एक मजेदार अनुभव दिला आहे. ती म्हणते, 'मी जेव्हां चार पांच वर्षांची होतें, तेव्हां बागेंतील वाळूचे खडे एकाच जागीं पडलेले पाहून मला फार वाईट वाटत असे. त्यांना थंडी वाजत असेल, त्यांना ऊन लागत असेल व एकाच जागीं पडल्यामुळें त्यांना निरनिराळी मौजही पहावयास सांपडत नसेल असें मला वाटे. मी नेहमीं बागेंतील कांहीं खडे उचलीत असें व ते चांगल्या जागीं ठेवीत असें. आतां या खड्यांना नवीन गमंत प्रहावयास सांपडेल असें मला वाटे व मनाला समाधान वाटे.' दुसऱ्या एका ग्रंथकर्त्रीनें असाच मौजेचा आपला लहानपणचा अनुभव सांगितला आहे. ती म्हणते, 'मी पांचसहा वर्षांची होतें तेव्हां मला झाडाखालीं पडलेलीं वाळलेलीं पानें पाहून फार वाईट वाटे व त्या पानांची फार

दया येई. मला वाटे बिचारीं पानें ! त्यांना किती थंड वाजत असेल ! मी त्यांपैकीं कांहीं पानें उचलून घरीं आणीत असें व ती उबेंत ठेवीत असें.'

लहान मुलाच्या बाहुलीला अगर घोड्याला कोणीं धक्का लावला किंवा पाडलें, तर त्याला फार वाईट वाटतें. आपण पडलों, किंवा आपणाला कोणीं पाडलें, तर ज्याप्रमाणें आपणाला दुःख होतें, त्याचप्रमाणें आपल्या बाहुलीला अगर घोड्याला दुःख होतें असें मुलाला वाटतें. मूल मोठें झालें म्हणजे त्याला बाहुली किंवा घोडा निर्जीव आहे, म्हणून बाहुली पडली किंवा घोडा पडला, तरी त्याला कांहीं दुःख होत नाहीं हें चांगलें कळूं लागतें. तथापि कोणीं बाहुलीला अगर घोड्याला मारलें, तर मुलाला वाईट वाटतें, कारण त्याचें त्या खेळण्यावर फार प्रेम असतें. आपल्या बाहुलीचे वडील माणसांनीं लाड करावे अशी लहान मुलीची फार इच्छा असते. माझी मुलगी सात वर्षांची आहे. तिची एक आवडती बाहुली आहे. तिचें नांव चमेली. माझी मुलगी मुंबईस कॉलेजमध्यें अभ्यास करणाऱ्या आपल्या भावाला मधून मधून पत्रें लिहिते व प्रत्येक पत्रांत 'चमेली खुशाल आहे, ती फार दांडगाई करते', वगैरे मजकूर तीं आपल्या पत्रांत लिहिण्यास विसरत नाहीं. गेल्या आठवड्यांत तिला तिच्या भावाचें एक पत्र आलें. त्यांत 'थंडी फार आहे, चमेलीला चांगले कपडे घालावे' असा मजकूर होता. तो वाचून माझ्या मुलीला फार आनंद झाला; व तो मजकूर घरांतील प्रत्येक मनुष्यास तिनें वाचून दाखविला. कल्पनेनें चालविलेल्या मुलांच्या खेळांची शिक्षणदृष्ट्या फार फायदे होतात, हें वडील मंडळीनें लक्षांत ठेविलें पाहिजे.

मुलें आपल्या भोंवतालच्या वडील मंडळीपेक्षां शरीरानें व मनानें दुबळीं असतात. या दुबळेपणाची जाणीव मुलांना असते. आपल्या कल्पनाशक्तीच्या जोरावर अनेकप्रकारचे खेळ खेळून मनाला वाटणारी कमीपणाची रुखरुख तीं काढून टाकतात. सात वर्षांचा रघू झोपाळ्यावर बसतो. तो मुलांना झोपाळ्यावर बसवितो व आपण मोटारवाला होऊन मोटार चालवितो, त्यावेळेस त्याला किती धन्यता व ऐट वाटत असते ! मनांत दाबून ठेवलेले मनोविकार बाहेर काढून मन शांत करण्याला कल्पनेनें चालविलेले हे खेळ पुष्कळ वेळां उपयोगीं पडतात. गणूचा शिक्षक फार मारका होता. त्यानें गणूला सकाळीं

एक छडी दिली होती. दुपारीं सुटी होती. गणू व त्याचा सोबती रामू मिळून खेळूं लागले. गणू एका वर्गाचा शिक्षक झाला व रामू दुसऱ्या वर्गाचा मास्तर बनला. त्यांनीं ओसरीच्या खांबांना विद्यार्थी बनविलें. गणूनें आवळीची एक छडी तयार केली व त्या छडीनें या विद्यार्थ्यांना यथेच्छ बडविलें. मग त्याच्या मनाला शांतता वाटली व तो त्यांना चाराचा पाढा शिकवूं लागला. गणूच्या मनांत कोंडून ठेविलेल्या रागाच्या मनोविकाराला बाहेर काढून तें शांत व स्वच्छ करण्याचे कामीं या खेळाचा उपयोग झाला.

लहान मुलें पुष्कळ वेळां खोटें बोलतांना आढळतात. या त्यांच्या खोटें बोलण्याचीं दोन कारणें संभवतात. वडील माणसें आपल्या अपराधाबद्दल आपणांस क्षमा करणार नाहींत व आपणांस तीं शिक्षा करतील, असें जेव्हां मुलांना वाटतें, तेव्हां खोटें बोलण्याचा त्यांना मोह होतो व तीं शिक्षा टाळण्याकरितां खोटें बोलतात. कित्येक वेळां मुलांना खरें आणि काल्पनिक यांतील भेद न कळल्यामुळें तीं खोटें बोलतात. अगदीं लहानपणीं खोटें बोलणें हें वाईट आहे हेंच मुलांना कळत नाहीं; व आपला हेतु साध्य करण्याकरितां आपण कल्पनेनें कांही रचून वडील माणसांस अगर सोबत्यांस सांगितलें, तर त्यांत आपण कांहीं अपराध करितों याची जाणीवही मुलांना नसते. यामुळें पुष्कळ वेळां लहान मुलें खोटें बोलतात. शिक्षकांनीं व पालकांनीं मुलाच्या खोटें बोलण्याचे बाबतींत फार काळजी घेतली पाहिजे. मूल खोटें कां बोलतें हें पालकानें किंवा शिक्षकानें काळजीपूर्वक पाहिलें पाहिजे. घरची व शाळेंतील शिस्त इतक्या प्रेमाची पाहिजे कीं, मुलाच्या हातून अपराध घडला, तर न भितां त्यानें तो कबूल केला पाहिजे. आईबाप जर प्रेमळ असले, तर आपला अपराध त्यांचेजवळून लपवून ठेवण्याचा मोह मुलांना कधींच होत नाहीं. तसेंच, आपला शिक्षक प्रेमळ व न्यायी आहे अशी मुलांची खात्री असली, म्हणजे मुलें आपला अपराध लपविण्याकरितां शिक्षकाला कधींही खोटें सांगत नाहींत. कित्येक वेळां मुलें झालेल्या हकिगतींत आपल्या कल्पनेनें जास्त भर घालतात. परंतु यांत त्यांचा फस-विण्याचा हेतु नसतो. तथापि मुलांची ही वृत्ति देखील चांगली नाहीं. अतिशयोक्तीची ही खोड पालकानें मुलांतून घालविली पाहिजे. अगदीं लहान मुलांनीं जर कांहीं खोटें सांगितलें, तर तो मोठा गुन्हा आहे असें

पालकांनीं मानूं नये. मात्र मुलांना खोटें बोलण्याची संवय लागणार नाहीं व त्यांना सत्याचीच आवड लागेल, याबद्दलची काळजी पालकांनीं घेतली पाहिजे. अगदीं लहानपणीं देखील मुलें आपला हेतु साधण्याकरितां आपल्या कल्पनेनें हकीकत जुळवून कशी सांगतात हें पुढील गोष्टीवरून लक्षांत येईल. एका चार वर्षांच्या मुलाला आईनें सांगितलें कीं, ' बाळ, तूं पानांतली सगळी चपाती संपवलीस म्हणजे मी तुला द्राक्षें देईन. ' मुलाला चपाती नको होतीं, त्याला द्राक्षें पाहिजे होती. आईचें लक्ष आपणाकडे नाहीं असें पाहून पानांतील चपाती त्यानें खिडकीच्या बाहेर फेकली व तो आईला म्हणाला ' आई, दारीं गरीब चिमणी आहे. तिला भूक लागली. तिनें मजजवळ चपाती मागितली. मीं तिला थोडी चपाती दिली. माझी चपाती संपली. आतां मला द्राक्षें दे. ' अर्थातच आईच्या लक्षांत आपल्या हुशार चिरंजिवाची युक्ति ताबडतोब आली.

मानवी सुधारणेला व सुखाला कल्पनाशक्तीची फार मदत झाली आहे. मुलांच्या कल्पनाशक्तीचा योग्य विकास झाल्याशिवाय त्यांचें आयुष्य सुखदायक होणार नाहीं, व त्यांची बौद्धिक व नैतिक प्रगति होणार नाहीं. याजकरितां मुलांच्या कल्पनाशक्तीला इष्ट व भरपूर व्यवसाय देऊन तिची जोपासना करणें व तिला योग्य वळण देणें हें पालकांचें व शिक्षकांचें कर्तव्य आहे. मुलाला लहानपणापासून त्याला समजतील, आवडतील अशा मनो-रंजक गोष्टी सांगितल्या पाहिजेत. त्याला वाचतां येऊं लागलें कीं, त्याच्या वयाला व बुद्धीला अनुरूप अशीं मनोरंजक पुस्तकें त्याला वाचावयास दिलीं पाहिजेत. मुलांना खेळ खेळण्यास भरपूर संधि दिली पाहिजे. बाहुल्या करणें, बाहुल्यांना कपडे शिवणें, मातीच्या चुली व बोळकीं तयार करणें, भातुकली खेळणें वगैरे व्यवसाय करण्यास मुलींना उत्तेजन दिलें पाहिजे. गाड्या करणें, बैल करणें, पतंग तयार करून उडविणें, वगैरे व्यवसाय करण्यास मुलांना प्रोत्साहन दिलें पाहिजे. खेळाच्या योगानें मुलांच्या बुद्धीवर व आचरणावर जे इष्ट व हितकर परिणाम होतात त्यांचें वर्णन पूर्वींच एका स्वतंत्र लेखांत केलें आहे. संभाषणें, हावभावयुक्त गाणीं, लहान लहान मुलांना योग्य अशीं नाटकें, यांच्या योगानेंही मुलांच्या कल्पनाशक्तीला भरपूर व्यवसाय मिळतो, हातकाम, मातकाम, व चित्रकला हीं मुलांना उद्योगाची

आवड लावतात, त्यांचें मनोरंजन करितात व स्वतःच्या कल्पनांना दृश्य स्वरूप कसें द्यावें हेंही शिकवितात. यांच्या योगानें मुलांच्या कल्पनाशक्तीला इष्ट व हितकर असें वळण लागतें. घरीं व शाळेंत मुलांना 'मेक्यानो' चे खेळ खेळण्यास भरपूर संधि द्यावी. मुलांच्या कल्पनाशक्तीला विधायक असें कार्य शिकविण्यास 'मेक्यानो' सारखें दुसरें साधन नाहीं. गाडी, मोटार, नांगर, बाक, खुर्ची वगैरे वस्तु व पूल, इमारत, यंत्रें, वगैरे अनेक आकृति या मेक्यानोच्या साहित्यानें मुलें तयार करितात. स्वतांच्या कल्पनाशक्तीनें तयार केलेल्या या आकृति पाहून मुलांना फार समाधान वाटतें व त्यांचें हस्तकौशल्य वाढतें.

सध्यां आपल्या इकडे घरीं व शाळेंत, मुलांच्या कल्पनाशक्तीला योग्य असें शिक्षण मिळत नाहीं. पालक आपल्या मुलांना खेळाचें साहित्य पुरवीत नाहींत व त्यांना खेळावयास उत्तेजन देत नाहींत. उलट पक्षीं पालक मुलांच्या खेळांना प्रतिबंध करीत असतात. घरीं खेळावयास जागा नाहीं, शाळेंत क्रीडांगण नाहीं अशीच स्थिति बहुतेक मुलांची असते. मुलांच्या डोक्यांत ज्ञान कोंबण्याचा अनिवार मोह पालक व शिक्षक या दोघांनाही असतो, म्हणून अंक, पाढे, निमकी, पावकी वगैरे उजळणी घोकणें, खर्डे लिहिणें हेंच खरें शिक्षण असा त्यांचा ग्रह होतो. यामुळें खेळ, गोष्टी, हातकाम वगैरेंचें महत्त्व पालक व शिक्षक या दोघांनाही वाटत नाहीं व मुलाच्या कल्पनाशक्तीची जोपासना करून तिला योग्य वळण देण्याचें काम त्यांच्या हातून होत नाहीं. यामुळें मुलाचें बौद्धिक व नैतिक शिक्षणाच्या दृष्टीनें फार नुकसान होतें.

कल्पनाशक्तीचें कार्य नेहमीं विचार शक्तीच्या धोरणानें चाललें पाहिजे. कल्पनाशक्तीला वाटेल तशी स्वैर भडकूं देणें इष्ट नसतें. तिच्यावर नेहमीं विचारशक्तीचा ताबा असला पाहिजे. शिल्पकार, चित्रकार, शास्त्रज्ञ, यंत्रकार, कवि व कादंबरीकार या सर्वांना उत्तम कल्पनाशक्ति असते, पण त्यांची कल्पनाशक्ति त्यांच्या विचारशक्तीच्या हाताखालीं काम करीत असते. यामुळेंच या सर्वांच्या कल्पनाशक्तीनें त्यांच्या हातून विधायक व समाजाला उपयुक्त अशी बहुमोल कामगिरी होते. कित्येक लोक आपल्या कल्पनाशक्तीला वाटेल तशी बहकूं देतात. तिच्यावर त्यांच्या विचार-

शक्तीचा ताबा बिलकूल नसतो. यामुळें त्यांच्या कल्पनाशक्तीचा दुरुपयोग होऊन त्यांचें व पर्यायानें समाजाचेंही नुकसान होतें. नुसत्या कल्पनाशक्तीच्या खेळांत मनुष्य गुंग होऊन बसला, तर त्याच्या हातून कांहींच कार्य घडत नाहीं व तो व्यवहारांत अत्यंत मूर्ख ठरतो. अशा प्रकारच्या माणसाच्या गमतीच्या गोष्टी सर्व भाषांच्या वाङ्मयांत सांपडतात. आपल्या मुलांना आळसांत अशा प्रकारचीं निरर्थक कल्पनेचीं जाळीं विणण्याची व मनोराज्य करण्याची संवय लागूं नये याजबद्दल पालक व शिक्षक यांनीं चांगली काळजी घेतली पाहिजे. कल्पनाशक्तीसंबंधानें सातव्या व आठव्या भागांत जें विवेचन केलें आहे त्यांतील महत्त्वाचा भाग थोडक्यांत सांगून हा भाग पुरा करूं.

१ मनुष्याची कल्पनाशक्ति ही मानवी समाजाच्या प्रगतीला फार उपकारक झाली आहे.

२ पूर्व ज्ञान, अनुभव व उत्तम स्मरणशक्ति यांजवर कल्पनाशक्ति अवलंबून असते.

३ कल्पनाशक्तीच्या योगानें ऐकत असलेल्या अगर वाचीत असलेल्या वर्णनाबरहुकूम मनाला चित्र बनवितां येतें. या चित्राच्या योगानें नवीन ज्ञान मिळविणें सोपें होतें.

४ पूर्व स्मृतिचित्रांच्या साहाय्यानें व विचारशक्तीच्या तंत्रानें काम करून कल्पनाशक्ति कधीं कधीं अगदीं नवीन कल्पनाचित्र तयार करते. अशा प्रकारची विधायक कल्पनाशक्ति कवि, चित्रकार, कादंबरीकार, शास्त्रज्ञ, शिल्पी यांना विशेष लागते.

५ मनुष्य आपल्या पूर्व सुखदुःखांच्या अनुभवामुळें आपल्या कल्पनाशक्तीच्या साहाय्यानें दुसऱ्याच्या सुखदुःखांचें चित्र आपल्या डोळ्यांपुढें उभें करितो. यामुळें दुसऱ्याबद्दल त्याच्या मनांत सहानुभूति उत्पन्न होते. अशाप्रकारचें चित्र उभें करणाऱ्या कल्पनाशक्तीला नैतिक कल्पनाशक्ति म्हणतात. सदाचाराला ही नैतिक कल्पनाशक्ति फार अवश्य लागते.

६ मुलाची कल्पनाशक्ति ९ व्या किंवा १० व्या महिन्यापासून जागृत होते व दुसऱ्या वर्षापासून ती जोरानें काम करूं लागते.

७ मूल सुमारें बारा वर्षांचें होईपर्यंत त्याची कल्पनाशक्ति फार जोरांत असते.

८ गोष्टी, खेळ, हातकाम व चित्रकला यांनीं, मुलांच्या लहानपणीं त्यांच्या कल्पनाशक्तीला भरपूर व्यवसाय मिळतो व तिला इष्ट वळण लागतें.

९ मुलांनीं निरर्थक कल्पना करीत बसणें किंवा मनोराज्यांत गुंग होणें हें चांगलें नाहीं. मुलाची कल्पनाशक्ति विधायक असली पाहिजे. तिनें कार्य केलें पाहिजे.

१० मुलांना जीं खेळणीं घ्यावयाचीं तीं अगदीं साधीं व थोडीं असावीं. साध्या खेळण्यांनीं मुलाच्या कल्पनाशक्तीला जास्त व्यवसाय मिळतो.

## भाग नववा.

## विचारशक्ति.

मागील दोन लेखांत कल्पनाशक्तीचा उदय मुलांत कसा होतो, तिची वाढ कशी होते, ती आपलें कार्य कसें करते व तिची जोपासना करण्याकरितां पालकांनीं कोणते उपाय योजावे याचा आपण विचार केला. या भागांत मुलांच्या विचारशक्तीचें विवेचन करूं.

मनुष्याला या जगांत त्याच्या विचारशक्तीमुळेंच महत्त्वाचें स्थान मिळालें आहे. या विचारशक्तीमुळेंच त्यानें आपल्यापेक्षां अत्यंत बळकट अशा पशूंवर आपलें वर्चस्व स्थापन केलें आहे. या विचारशक्तीमुळेंच त्यानें आपली इतकी सुधारणा केली आहे. अर्थातच मुलांच्या विचारशक्तीची जोपासना करणें व तिला योग्य व आवश्यक व्यवसाय देणें हें शिक्षकाचें व पालकाचें महत्त्वाचें काम आहे. पूर्व ज्ञानाचा सांठा व अनुभव यांजवर विचारशक्तीचें कार्य अवलंबून असतें. जितका पूर्व ज्ञानाचा सांठा जास्त व अनुभव जास्त तितकें विचारशक्तीचें कार्य जास्त चांगलें होतें.

दोन वस्तूंमध्यें अगर वस्तु आणि गुण यांजमध्यें संबंध आहे किंवा नाहीं हें सांगणें हा विचाराचा पहिला प्रकार होय. ‘हा आंबा आहे, हें मोगरीचें फूल

नाहीं,' 'हा आंबा पिवळा आहे' 'हा आंबा आंबट नाहीं' हीं सर्व वाक्यें वस्तु वस्तूंमधील अगर वस्तु आणि गुण यांजमधील संबंध दाखवितात. 'हा आंबा आहे' या वाक्यांत किंवा विधानांत हें फळ व आंबा यांचेमधील संबंध दाखविला आहे. हें मोगरीचें फूल नाहीं या वाक्यांत हें फूल व मोगरीचें फूल यांत संबंध नाहीं ही गोष्ट दाखविली आहे. 'हा आंबा पिवळा आहे' या वाक्यांत या आंब्याचा, पिवळेपणा या गुणाशीं असणारा संबंध दाखविला आहे. 'हा आंबा आंबट नाहीं' या वाक्यांत या फळाचा व आंबटपणा या गुणाचा कांहीं संबंध नाहीं हें दाखविलें आहे. अशा प्रकारें वस्तु वस्तूंमधील अगर वस्तु व गुण यांमधील संबंध दाखविणाऱ्या वाक्याला अगर विधानाला निर्णय म्हणतात. निर्णय ही विचाराची पहिली पायरी आहे. शास्त्राच्या अभ्यासानें, स्वताच्या अनुभवानें अगर वडील मंडळीच्या सांगण्यावरून कांहीं नियम अगर निर्णय आपणांला कळतात. पाण्याला उष्णता लावली असतां, पाण्याची वाफ होते ही गोष्ट अगर हा नियम आपणांला नेहमींच्या अनुभवानें कळतो आणि या ज्ञानाच्या अगर अनुभवाच्या साहाय्यानेंच सध्यां चुलीवर ठेविलेल्या पाण्याची वाफ लवकर होईल हें आपण सांगतों. माहीत असलेला नियम अगर सिद्धान्त एखाद्या गोष्टीला लावून त्याजवरून अनुमान काढणें हा विचाराचा दुसरा प्रकार होय. या प्रकाराच्या अनुमानाला अवगामी अनुमान असें म्हणतात. आपण आकाशांत ढग आलेले व उकडत असलेलें पाहातों व यानंतर थोड्याच वेळानें पाऊस आलेलाही पाहतों. असें जेव्हां आपण सात आठ वेळां पाहतों तेव्हां ढग येणें, उकडणें व पाऊस पडणें यांतील असणारा संबंध आपल्या लक्षांत येतो व ढग आले व उकडूं लागलें कीं, कांहीं वेळानें पाऊस येतो हें अनुमान आपण काढतों. दुधाच्या खालीं जाळ लावला कीं, दूध उतूं येतें ही गोष्ट अनेकवेळां पाहिल्यानें आपण जाळानें दूध उतूं जातें हें अनुमान काढतों. शास्त्रज्ञ लोक अनेक प्रयोग करून अशाच प्रकारें अनुमान काढतात. अनेक उदाहरणें पाहून त्यांत असणारा सामान्य नियम अनुमानानें शोधून काढण्याचे पद्धतीस उद्गामी अनुमानपद्धति म्हणतात. मनुष्याच्या विचा-रसरणींत निर्णय, उद्गामी व अवगामी अनुमान हे तिन्ही प्रकार असतात. मनुष्याचा अनुभव चुकीचा असला किंवा भरपूर अनुभव त्याला नसला, तर

त्याची विचारसरणी चुकते व त्याचे निर्णय व अनुमानें चुकतात. एखाद्या मनुष्याला काठेवाडी गाईची माहिती नाहीं असें आपण समजूं, या मनुष्यानें एखादी गाय पाहिली व ही गाय काठेवाडी आहे असा निर्णय दिला, तर तो चुकीचा असण्याचा फार संभव असतो. कित्येक वेळां आपण एखादा सिद्धान्त खरा आहे असें मानतों व तो एखाद्या गोष्टीला लावून पाहातों. 'अ' या मनुष्याला वडगांवच्या दोन तीन माणसांनीं व्यवहारांत बुडविलें, यामुळें 'अ' नें वडगांवचे लोक लबाड असतात, असा सिद्धांत बांधला. एके दिवशीं त्याला वडगांवचा 'ब' हा गृहस्थ भेटला व "अ" नें तो लबाड आहे असें ठरविलें. अर्थातच 'अ' चें हें अनुमान चुकीचें ठरण्याचा फार संभव आहे. कारण त्यानें थोड्याशा उदाहरणांवरून वडगांवचे सर्व लोक लबाड असतात असा जो सिद्धांत बांधला तोच चुकीचा होता.

दररोजच्या व्यवहारांत आपल्या विचारशक्तीचें कार्य फार झराझर चाललेलें असतें. कित्येक वेळां, आपण विचार करितों ही गोष्ट देखील आपल्या लक्षांत येत नाहीं. मला स्टेशनवर जावयाचें आहे. आगगाडी ९॥ वाजतां येते. स्टेशनवर जाण्यास टांगे आहेत व मोटारीही आहेत. गाडीला सुटण्यास फक्त १० मिनिटेंच आहेत. हें पाहिल्या बरोबर मी चट्कन् मोटारींत बसेन व स्टेशनवर जाईन.

लवकर जाण्यास मोटारीनें गेलें पाहिजे.<br>
मला लवकर जावयाचें आहे.<br>
म्हणून मी मोटारीनें गेलें पाहिजे.

अशा प्रकारें स्पष्टपणें, सावकाश व पायऱ्या पायऱ्यांनीं मी विचार करीत बसत नाहीं. व्यवहारांतील दररोजच्या गोष्टी आपण विचारानें भराभर ठरवीत असतों, पण एखादी महत्त्वाची गोष्ट ठरविण्यास आपणाला फार वेळ लागतो. शास्त्रज्ञ लोकांना शास्त्राचे नवीन सिद्धांत किंवा निर्णय ठरविण्यास वर्षेंच्या वर्षें लागतात. पृथ्वीच्या आंगीं आकर्षणशक्ति आहे हें ठरविण्यास न्यूटनला सर्व आयुष्य घालवावें लागलें. मनुष्याचा विचारशक्तीच्या कार्याचें वर थोडेंसें दिग्दर्शन केलें आहे, यावरून त्या कार्याची स्थूल कल्पना लक्षांत येईल. आतां आपण मुलाच्या विचारशक्तीचें विवेचन करूं.

मुलांची विचारशक्ति आपलें कार्य केव्हांपासून करूं लागते हें सांगणें फार कठीण आहे. ज्ञान आणि पूर्व अनुभव यांच्या शिवाय विचारशक्तीचें कार्य होऊं शकणार नाहीं हें उघडच आहे. मुलें नऊ दहा महिन्यांचीं झालीं व थोडें फार बोलूं लागलीं कीं, त्यांच्या विचारशक्तीचें कार्य उघड व स्पष्ट दिसूं लागतें. पण त्याच्याही पूर्वी कांहीं दिवस मुलांच्या विचारशक्तीचें कार्य थोडें फार चालूच असतें. मूल तीन महिन्यांचें झालें कीं, तें आपल्या आईला ओळखतें. मूल चार पांच महिन्यांचें झालें कीं, तें आपल्या बापाला, बहिणीला व भावाला ओळखूं लागतें. सात महिन्यांच्या मुलाला 'माऊ' म्हटलें कीं, तें मांजराकडे पाहूं लागतें व पोपट म्हटलें कीं त्याची दृष्टि पोपटाच्या पिंजऱ्याकडे वळते. सात आठ महिन्यांच्या मुलानें खडीसाखर पाहिली, तर तें ती मागूं लागतें व त्याला ती दिली नाहीं, तर तें रडूं लागतें. मुलांच्या या सर्व कृतींवरून त्यांची विचारशक्ति कार्य करूं लागली आहे हें उघड दिसतें. अर्थातच हें कार्य अगदीं साधें असतें. कुत्रा, मांजर, पोपट, गाय हीं देखील, माणसें ओळखतात व खाण्याचा पदार्थ पहातांच तो आपणांस देण्याकरितां मालकाच्या जवळ लाडीगोडी करूं लागतात. तेव्हां लहान मुलांच्या विचारशक्तीचें आरंभीचें कार्य पशुपक्ष्यांच्या कार्यापेक्षां जास्त नसतें. मुलांना बोलतां येऊं लागलें, व त्यांना भाषा थोडीबहुत कळूं लागली कीं, त्यांच्या विचारशक्तीचें कार्य वाढतें व तें अधिक स्पष्टपणें दिसूं लागतें. मुलें बोलूं लागलीं कीं, आरंभीं तीं आपले विचार एक एक शब्दांत बोलून दाखवीत असतात. गाय पाहिल्या बरोबर दहा महिन्यांचा मधू 'हम्मा,' असें बोलतो. हम्मा या त्याच्या एकाच शब्दाचा अर्थ 'ही हम्मा आहे' ही गाय आहे, असा असतो. अर्थातच हा मधूचा निर्णय झाला. याचप्रमाणें 'ताई' या शब्दानें ही माझी बहीण आहे असें मधू सांगतो आणि म्हणूनच 'ताई' हा एकच शब्द मधूचा निर्णय दाखवितो. मधूचा एकच शब्द 'शी' हा 'पुढें असलेला पदार्थ घाणेरडा आहे' एवढा अर्थ दाखवितो, आणि म्हणूनच 'शी' या शब्दानें मधूचा निर्णय दाखविला जातो. दहा बारा महिन्यांचीं मुलें अशा प्रकारें आपला निर्णय एक एक शब्दांतच देत असतात. मुलांना जास्त चांगलें बोलतां येऊं लागलें कीं, तीं जास्त शब्दांचा उपयोग करूं लागतात व त्यांच्या निर्णयांत एकापेक्षां जास्त शब्द येतात.

बोलूं लागण्याच्या पूर्वी देखील मुलें थोडें फार अनुमान करूं लागतात. अशीं अनुमानाचीं कांहीं उदाहरणें मागील एका लेखांत दिलीं आहेत. परकें मनुष्य सहा महिन्यांच्या मुलाला घेऊं लागलें, तर तें त्याच्या जवळ जात नाहीं, पण आईच्याकडे तें प्रेमानें झेप घालून जातें. या कृतींत देखील मुलाची अनुमानशक्ति दिसून येते. मुलांना बोलतां येऊं लागलें कीं, मुलांच्या अनुमानाचीं अनेक उदाहरणें आपल्या दृष्टीस पडतात. आईनें दीड वर्षाच्या शांतीला लाडू खाऊं दिला नाहीं तेव्हां ती 'आई शी' असें म्हणाली. लहान शांतीच्या विचाराच्या सर्व पायऱ्या स्पष्टपणें मांडल्या, तर त्या पुढें दिल्याप्रमाणें होतात.

जो कोणी मला गोड पदार्थ खाऊं देत नाहीं तो वाईट असतो.

आई मला गोड पदार्थ खाऊं देत नाहीं; म्हणून ती वाईट आहे.

वर दिलेलें उदाहरण अवगामी अनुमानाचें आहे. एक इंग्लिश ग्रंथकार आपल्या २॥ वर्षाच्या मुलीस पुस्तकांतून चित्रें दाखवीत असे. या पुस्तकाचे तीन भाग होते. या तिन्ही भागांतून तिनें चित्रें पाहिलीं. पुढें कांहीं दिवसांनीं तिनें बापाला एक तांबडें पुस्तक आणून दिलें व त्यांतून चित्रें दाखविण्यास ती बापाला सांगूं लागली. हें मुलाच्या उद्गामी अनुमान पद्धतीचें उदाहरण झालें.

वस्तु, जनावरें, माणसें यांबद्दलचें लहान मुलांचें ज्ञान फार अस्पष्ट व थोडें असतें. मूल वस्तूचा आकार, रंग, रूप, वास वगैरे सर्व गुणांकडे लक्ष देत नाहीं. ज्या गुणाकडे मुलाचें लक्ष जातें तेवढाच गुण त्याच्या स्मरणांत राहतो. आंब्याचा रंग व गोडी मुलाच्या लक्षांत राहाते, पण त्याचा आकार त्याच्या लक्षांत रहात नाहीं, यामुळें नारिंग पाहिलें असतां, मूल चुकीनें त्याला आंबा म्हणतें. एका अडीच वर्षाच्या मुलानें पांढरी मेंढी पाहिली व तो भो भो (कुत्रा) आहे असें म्हणाला. या मुलानें पांढऱ्या मेंढ्या पाहिल्या नव्हत्या व त्याचे घरीं एक पांढरा कुत्रा होता. मेंढीचा आकार व रंग एवढेंच पाहून त्यानें आपला निर्णय दिला व त्यामुळें तो चुकीचा ठरला. जसजशी मुलांची निरीक्षणशक्ति वाढत जाते व त्याच्या अनुभवांत व ज्ञानांत भर पडत जाते तसतसे मुलाचे निर्णय व अनुमानें हीं बरोबर ठरतात. लहान मुलाचे मनोविकार फार तीव्र असतात. या मनोविकारांचा पगडा त्याच्या विचारशक्तीवर तेव्हांच बसतो व

यामुळें त्याचीं अनुमानें फार चुकतात. आईनें आपणास लाडू खाऊं दिला नाहीं, म्हणून ती वाईट आहे असें अनुमान मुलीनें काढलें. या ठिकाणीं मुलीच्या मनांत उत्पन्न झालेला राग या मनोविकाराचा जोर दिसून येतो. मोठीं माणसेंही मनोविकारांना वश होऊन नेहमीं चुकीचीं अनुमानें काढीत असतात. परकी लोकांविषयीं, परक्या जातीविषयीं दिलेले निर्णय व अनुमानें मनोविकाराच्या योगानें नेहमींच चुकतात. वर वडगांवच्या 'ब' या गृहस्थाविषयीं 'अ' नें जें चुकीचें अनुमान केलें आहे तें याच प्रकारचें आहे.

सृष्टींतील गोष्टी नियमबद्ध असतात. ठरलेलें कारण घडलें कीं त्याचें कार्य त्याच्या पाठोपाठ घडावयाचेंच असा सृष्टीचा नियम असतो. दररोज सूर्य उगवतो व दिवस होतो. सूर्य ठरलेल्या वेळीं मावळतो व रात्र होते, या गोष्टी एकसारख्या नियमितपणें होत असतात. सकाळ झाली कीं घरांतील मंडळी उठतात व कामाला लागतात. रात्र झाली कीं घरांतील मंडळी काम आटोपून निजतात. याही गोष्टी नियमितपणें होत असतात. या गोष्टी मूल पाहातें व यांतील कार्यकारण संबंध त्याच्या लक्षांत येतो. अशा प्रकारें कार्यकारण संबंध हळूहळू मुलाच्या लक्षांत येऊन त्याची विचारशक्ति वाढत जाते. मूल अगदीं लहान असतें व त्याला रांगतांही येत नाहीं, तेव्हां पासून तें सभोंवतालच्या गोष्टी पहात असतें. मूल बसूं लागलें व रांगूं लागलें कीं त्याची निरीक्षणशक्ति वाढते व स्वतांच्या कृतींनीं व निरीक्षणानें तें आपल्या ज्ञानांत व अनुभवांत भर घालूं लागतें. यामुळें त्याची विचारशक्तिही वाढत जाते. ताईनें झाडलें व ती पाट मांडूं लागली कीं दोन वर्षांचा बाबू आपली ताटली मागून घेतो व पाटावर येऊन जेवावयास बसतो. बाबा बाजारांतून आलेले पाहतांच त्यांच्या-जवळ खाऊ मागण्याकरितां बाबूराव हजर होतात. संध्याकाळीं बाबा आफिसांतून आले व त्यांनीं हातपाय धुतले कीं, आतां चहा येणार हें समजून बाबूरावची स्वारी चहाची वाट पहात बसते. घरांतील गोष्टी नित्यनेमानें होत असल्यामुळें एक गोष्ट घडली कीं, आतां तिच्यापुढें काय होणार याचें अनुमान बाबूला काढतां येतें. लहान मुलांच्यावर सारखी नजर ठेवली, तर लहान मूल एक दिवसांत किती तरी अनुमानें व निर्णय काढीत असतें याची कल्पना होईल. एखादी साधी गोष्ट करण्यांत देखील कित्येक वेळां त्यास पुष्कळच विचार करावा लागतो. लहान प्रभाकर २॥

वर्षांचा होता. घरांत आंबे आणलेले होते. ते एका शिंक्यांत उंचावर ठेवले होते. प्रभाकरानें दादाला 'मला आंबा दे' म्हणून सांगितलें. दादानें त्याला कडेवर घेतलें व शिंक्यावरील आंबा घेण्यास सांगितलें, तरी पण प्रभाकराला आंबा घेतां येईना. मग प्रभाकर खालीं उतरला. बराच वेळ त्यानें विचार केला व कोपऱ्यांत उभी असलेली काठी तो घेऊन आला. ती काठी उंच होती. तिनें त्यानें ते आंबे ढोसले. त्याजबरोबर शिंक्यांतून एक आंबा खालीं पडला. मग प्रभाकराचा आनंद काय विचारावा! लहान सहान कृतींत देखील मुलाला किती विचार करावा लागतो हें वरील गोष्टीवरून सहज लक्षांत येईल.

मुलें फार खेळाडू असतात व तीं बिलकूल विचार करीत नाहींत अशी वडील माणसांची दृढ कल्पना असते. पण मूल नेहमीं भोंवतालच्या सृष्टीकडे व त्याच्या सभोंवती घरांत व बाहेर घडत असलेल्या गोष्टींकडे लक्षपूर्वक पाहात असतें; व या सर्वांचा तें विचार करीत असतें. त्याचें निरीक्षण व विचार हीं नेहमींच चालू असतात. भोंवतीं घडणाऱ्या सृष्टचमत्कारांचें व सृष्टीचें आणि सभोंवतीं घडणाऱ्या व्यवहाराचें त्याला ज्ञान मिळावयाचें असतें. त्याच्या चिमुकल्या विचारशक्तीनें जीं सोडवितां येत नाहींत अशीं सृष्टीचीं अनेक कोडीं व असे भोंवतालचे अनेक चमत्कार तें पाहत असतें. या सर्वांबद्दल त्याच्या मनांत फार कुतूहल वाटत असतें. हें आपलें कुतूहल तृप्त व्हावें म्हणूनच मुलें वडील माणसांना प्रश्न विचारीत असतात. मुलें साधारणपणें तीन वर्षांचीं झालीं कीं त्यांना आपला प्रश्न दुसऱ्याला कळविण्याइतकें बोलतां येतें व या कालापासून मुलें आपल्या वडील माणसांना सारखे प्रश्न विचारीत असतात. आपल्या ज्ञानांत भर पडावी व जी गोष्ट आपणांस माहीत नाहीं ती माहीत व्हावी हाच हे प्रश्न विचारण्याचा हेतु असतो. सूर्य कोठें जातो, त्याचें घर कोठें आहे, चंद्राचें घर कोठें आहे, वारा कां वाहतो, या कुत्र्याचें नांव काय, त्याच्या बापाचें नांव काय, त्याचें घर कोठें आहे असे अनेक प्रकारचे प्रश्न लहान मुलें आपल्या वडील माणसांना विचारीत असतात. अर्थातच अशा प्रकारच्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें देणें फार कठीण असतें. कित्येक वेळां वडील माणसें या प्रश्नांनीं त्रासून जातात; व मुलांवर रागावतात व त्याला गप्प बस-वितात. आपणाला ज्याप्रमाणें घर आहे, त्याच प्रमाणेंच चंद्र, सूर्य, तारे, जनावरें

व किडे यांना देखील घर आहे अशी मुलांची समजूत असते. आपणांला ज्याप्रमाणें नांव आहे त्याचप्रमाणेंच पशु, पक्षी व कीटक यांनाही नांव असलें पाहिजे असें मुलांना वाटतें. आपली जी स्थिति आहे त्याचप्रमाणें सजीव प्राणी व निर्जीव पदार्थ यांचीही स्थिति असते अशी मुलांची दृढ समजूत असते, यामुळेंच मुलें वडील माणसांना चमत्कारिक वाटणारे प्रश्न विचारीत असतात.

मुलांना वस्तूंचा उपयोग व कृतींचा हेतु कळून घेण्याची फार उत्कट इच्छा असते. प्रत्येक गोष्ट कांहीं तरी विशिष्ट हेतूमुळेंच घडते अशी मुलांची कल्पना असते. यामुळेंच सूर्य कां उगवतो, तो कां मावळतो, तो आभाळांत कशाला चालतो, टोपी कशाला घालतात असे प्रश्न ते विचारूं लागतात. अशा प्रश्नांचीं उत्तरें देतां देतां वडील माणसांना पुरेपुरेसें होतें. एखाद्या प्रश्नाचें उत्तर दिलें तरी तेवढ्यानेंच मुलाचें समाधान होत नाहीं. सूर्य कां उगवतो असें मुलानें विचारलें कीं आपणांला उजेड देण्याकरितां असें आपण उत्तर देतों. पण एवढ्यानें मुलाचें समाधान होत नाहीं. लगेच तें विचारतें. 'उजेड कशाला पाहिजे ?' यानंतर आणखी एखादा प्रश्न मूल विचारील. अशा प्रकारें त्याच्या प्रश्नांची सांखळी कोठपर्यंत लांबेल हें सांगतां येत नाहीं. कित्येक वेळां लहानशा उत्तरानेंही त्याचें समाधान होतें. जमीन कठीण कां लागते, असा प्रश्न एका लहान मुलानें आपल्या दाईस विचारला व याचें उत्तर जमीन कठीण असते असें तिनें दिलें व या योगानें त्या मुलाचें समाधान झालेंसें दिसलें. हें कशाला, तें कशाला, अशा प्रश्नांचा हेतु देखील दिसणाऱ्या क्रियेचा हेतु विचारावा हाच असतो.

पदार्थ कशाचा केला आहे, तो कसा केला आहे व कोणीं केला आहे हें जाणण्याची मुलांना उत्कट इच्छा असते. पांचव्या वर्षापासून मुलें हे प्रश्न विचारूं लागतात. सर्व वस्तु कोणीं तरी हातानेंच केलेल्या असतात अशी मुलांची समजूत असते; आणि म्हणूनच तीं वर सांगितलेले प्रश्न विचारीत असतात. तत्त्ववेत्यांप्रमाणें कार्याचें कारण, साधनें व कला समजण्याची बालकांना उत्कट इच्छा असते. जसजशीं मुलें मोठीं होत जातात तसतशीं वडील माणसांनीं दिलेल्या उत्तरांचा तीं जास्त काळजीपूर्वक विचार करूं लागतात. वडीलांचें उत्तर त्यांना समजलें व अशा प्रकारें त्यांची जिज्ञासा तृप्त झाली कीं त्यांना फार आनंद होतो.

मुलें पांच सहा वर्षांचीं झालीं कीं भोंवतालची सृष्टि जाणण्याविषयीं त्यांना फार तीव्र जिज्ञासा वाटूं लागते. हीं झाडें कशीं झालीं, हा डोंगर कसा झाला, हा सूर्य दररोज कोठून येतो व कोठें जातो, तो कसा चालतो, तो पडत कां नाहीं इत्यादि अनेक गोष्टींचा विचार मुलें करीत असतात. आपली जिज्ञासा तृप्त न झाल्यामुळें पुष्कळ वेळां मुलांना निराश व्हावें लागतें. अशा प्रकारें निराश झाल्यावर एक लहान मुलगी आपल्या आईला म्हणाली, 'आई, जर सगळ्या वस्तु आपणांला माहीत नाहींत व कळत नाहींत, तर देव एवढ्या वस्तु करितो कशाला'? जन्म, मृत्यु, ईश्वर वगैरेविषयीं देखील लहान मुलांच्या डोक्यांत विचार चालू असतात. यांविषयीं मुलें वडील माणसांना प्रश्न विचारतात, पण वडील माणसांनाही या प्रश्नांची त्यांना समजेल व त्यांचें समाधान होईल अशा रीतीनें, उत्तरें देणें कठीण पडतें. मुलांची विचारशक्ति गहन विषयांतही कशी धावत असते हें दाखविण्यासाठीं प्रोफेसर सली यांनीं कांहीं मजेदार उदाहरणें आपल्या पुस्तकांत दिलीं आहेत. एका कुटुंबाच्या ओळखीचा एक गृहस्थ मरण पावला. तेव्हां तो कोठें गेला असें त्या कुटुंबांतील लहान मुलानें आपल्या आईस विचारलें. आईनें सांगितलें, 'तो देवाबरोबर राहण्यास गेला आहे. मनुष्यें मेलीं कीं देवाच्या बरोबर राहतात.' यानंतर सात आठ दिवसांनीं तो मुलगा व त्याची आई एका खोलींत बसलीं होतीं. मुलाच्या डोक्यांत एक विचार आला व तो आईला म्हणाला, 'आई मागें वारलेला तो गृहस्थ आपल्या या खोलींत आहे,' हें ऐकतांच आई चपापली, व म्हणाली 'छे! असें कसें होईल? तो एथें कसा येईल?' यावर त्या मुलानें उत्तर दिलें, 'आई, तूं मला नेहमीं सांगतेस कीं देव सर्व ठिकाणीं आहे व तो या खोलींतही आहे. तो परवां वारलेला मनुष्य देवाबरोबर राहण्यास गेला असें तूं मला सांगितलेंस. देव जर या खोलींत आहे, तर तो मनुष्यही देवाबरोबर या खोलींत असला पाहिजे. आपल्या चिरंजीवाचा हा तर्क पाहून त्याला काय उत्तर द्यावें हें तिला सुचेना. एका मुलानें आईला विचारलें, 'आई, अंड्यापासून कोंबडी होते, तर पहिली कोंबडी कशापासून झाली'? शून्यापासून हें विश्व परमेश्वरानें उत्पन्न केलें असें खिस्ती धर्मग्रंथांत सांगितलें आहे. बापानें हें वाचल्यानंतर त्याच्या लहान मुलानें ही गप्प आहे असें आपलें स्पष्ट मत दिलें, कारण वस्तु करावयास साहित्य पाहिजेच ही त्याची दृढ समजूत होती.

लहान मुलांना आपले आईबाप व वडील माणसें सर्वज्ञ आहेत असें वाटतें; आणि म्हणूनच मोठ्या श्रद्धेनें तीं त्यांना प्रश्न विचारीत असतात; व आपली जिज्ञासा तृप्त करून घेण्याचा प्रयत्न करतात. मुलें अगदीं लहान असतात तोंपर्यंत वडील माणसांनीं सांगितलेल्या सर्व गोष्टी त्यांना खऱ्या वाटतात. आकाशांत मेघगर्जना होत असतांना, हें काय म्हणून असें लहान मुलें आपल्या वडिलांना विचारतात व म्हातारी आभाळांत हरभरे दळीत आहे व तिच्या जात्याचा हा आवाज आहे असें मुलांना सांगितलें, तर त्यांचें समाधान होतें. पण कांहीं दिवसांनीं मुलांची विचारशक्ति वाढते व वडिलांनीं दिलेलें हें उत्तर त्यांना पटत नाहीं. आपलीं वडील माणसें आपणाला कांहीं तरी थापा मारतात असा मुलांचा समज होतो. या समजाचा परिणाम मुलांवर फार अनिष्ट होतो. एवढ्याकरितां मुलांना कांहीं तरी थापा मारून त्यांना गप्प करण्याचा प्रयत्न वडील माणसांनीं करूं नये. मुलांना समजेल अशा प्रकारें त्यांच्या प्रश्नाचें उत्तर देण्याचा प्रयत्न करावा. आपणांस प्रश्नाचें उत्तर देतां येत नसल्यास मी तुला उद्यां सांगेन असें सांगावें व जरूर ती माहिती मिळवून दुसऱ्या दिवशीं ती मुलास द्यावी. मुलाला न समजण्यासारखी गोष्ट असल्यास, 'बाळ, मी तुला कांहीं दिवसांनीं तूं मोठा झाल्यावर तुला सांगेन' असेंही सांगण्यास हरकत नाहीं.

परमेश्वरानें जिज्ञासा ही स्वाभाविक प्रवृत्ति मुलांत त्यांच्या कल्याणाकरितांच ठेविलेली आहे. या जिज्ञासेमुळें भोंवतीं पसरलेल्या सृष्टीबद्दल, भोंवतीं दिसणाऱ्या वस्तूंबद्दल किंवा प्राण्यांबद्दल व भोंवतीं घडणाऱ्या कृतींबद्दल ज्ञान मिळविण्याचा मूल प्रयत्न करतें. हें ज्ञान मिळविण्याचा सोपा उपाय म्हणजे आपल्या वडील माणसांजवळ चौकशी करणें हा होय. याकरितांच वडील माणसांनीं मुलांच्या प्रश्नांचा विचार करून समाधानकारक उत्तरें द्यावीं व अशाप्रकारें त्यांची जिज्ञासा तृप्त करावी व त्यांच्या ज्ञानांत भर घालून त्यांच्या विचारशक्तीची वाढ करावी. जें ज्ञान मुलांना स्वतांच्या प्रयत्नानें सहज मिळवितां येईल तें ज्ञान त्यांनाच प्रयत्न करून मिळविण्यास उत्तेजन द्यावें. मुलांना थोडासा मार्ग किंवा दिशा दाखविली कीं, पुष्कळ वेळां मुलें आपल्या स्वतांच्या प्रयत्नानें ज्ञान मिळवितात व या योगानें त्यांना फार संतोष वाटतो. मुलांच्या जिज्ञासेसंबंधानें पुढील एका लेखांत जास्त विवेचन करावयाचें असल्यामुळें तिजसंबंधानें एथें जास्त कांहीं लिहिण्याची

आवश्यकता नाहीं. मुलांची जिज्ञासा नेहमीं इष्ट व हितकारक नसते. कित्येक वेळां मुलें उगीच कांहींतरी प्रश्न विचारीत असतात. 'आई, या मांजराला मांजरच कां म्हणतात,' 'साखर गोड कां लागते,' 'चिंच गोड कां लागत नाहीं,' अशा प्रकारचे प्रश्न कित्येक वेळां मुलें विनाकारण विचारीत असतात. अशा प्रकारच्या प्रश्नांना उत्तर न देणें हेंच बरें. दुसऱ्या माणसांच्या खाजगी आयुष्यक्रमाविषयीं मुलांनीं जिज्ञासेमुळें कांहीं प्रश्न विचारले, तर त्यांचें उत्तर वडील माणसांनीं देऊं नये. अशा वेळीं मुलांची फाजील जिज्ञासा तृप्त न करितां ती दाबून टाकणें हेंच बरें असतें.

## भाग १० वा

## विचारशक्ति.

( पुढें चालू. )

मुलाच्या अंगी जिज्ञासा व कृतिप्रेम या दोन सहजप्रवृत्ति असतात. त्यांच्या प्रेरणेमुळें मूल आपल्या ज्ञानांत भर घालीत असतें व आपली विचारशक्ति वाढवीत असतें. लहान मुलांना ज्ञान मिळवून देण्याचे कामीं व त्यांच्या विचारशक्तीची वाढ करण्याचे कामीं पालक व शिक्षक यांची फार मदत लागते. मूल सात आठ महिन्यांचें झालें कीं, हातांत एखादें खेळणें घेऊन त्याच्याशीं खेळण्याचा त्याला फार नाद लागतो. हातांत खेळणें घ्यावयाचें, तें तोंडांत घालून त्याची चव पाहावयाची, तें पाळण्याच्या दांडीवर अथवा भुईवर आपटून त्याचा आवाज कसा निघतो हें पाहावयाचें असा एकसारखा त्याचा क्रम चाललेला असतो. मूल आपल्या या निरानिराळ्या कृतीनींच पदार्थांचें ज्ञान मिळवीत असतें. ज्यांच्या योगानें मुलाला अपाय होणार नाहीं अशीं मौजेचीं रंगीबेरंगी खेळणीं मुलाच्या हातांत दिलीं, तर त्याच्या ज्ञान मिळविण्याच्या कार्यांत त्याला मदत केल्यासारखें होतें. लहान मूल रांगूं लागलें कीं, त्याला खेळण्याचा जास्त नाद लागतो. तें चालूं लागलें कीं, त्याची खेळाची आवड जास्तच वाढते. दोनतीन वर्षांच्या वयाच्या मुलाला अनेक पदार्थ घेऊन खेळण्याची फार हौस असते. सुधारलेल्या देशांत आईबाप मुलाच्या खेळाच्या या वृत्तीची फार जोपासना करितात. या देशांतील श्रीमंत व मध्यम प्रतीच्या गृह-

स्थांच्या घरीं मुलांना खेळण्याकरितां एक स्वतंत्र जागा असते. या ठिकाणीं मुलें आनंदानें खेळत असतात. या वयांत सोबत्यांच्या बरोबर किंवा एकटेंच खेळत असतांना वस्तु मांडणें, वस्तु एकावर एक रचणें, वस्तु आपटून अगर काठीनें वाजविणें, शिटी वाजविणें, निरनिराळ्या वस्तु निरीक्षण करणें व वस्तु ओळखणें वगैरे अनेक गोष्टी मूल करतें व आपल्या ज्ञानांत भर घालतें. हे खेळ खेळत असतांना मुलाच्या विचारशक्तीला कितीतरी काम मिळतें !

मुलांचा दोन ते पांच वर्षे वयाचा काळ, ज्ञान मिळविण्याच्या दृष्टीनें व विचारशक्तीचा विकास होण्याच्या दृष्टीनें फार महत्त्वाचा असतो. सुधारलेल्या देशांत मुलांच्या या वयाचा शिक्षणदृष्ट्या उत्तम उपयोग व्हावा म्हणून, बालसंवर्धनशाळा ( Nursery Schools ) आणि बालोद्यानशाळा ( Kindergarten Schools ) यांची योजना केलेली असते. बालसंवर्धन शाळेंत गरीब आईबाप आपलीं दोन वर्षांपासून पांच वर्षें वयापर्यंतचीं मुलें घालतात. आईबाप सकाळीं कामावर जातांना आठ नऊ वाजतां आपलीं मुलें शाळेंत आणून पोंहचवितात. या शाळांतून मुलांच्या शौचमुखमार्जनाची, त्यांच्या स्नानाची, त्यांचे कपडे स्वच्छ करण्याची सर्व व्यवस्था असते. येथील शिक्षकिणी फार प्रेमळ असतात. त्या आपल्या स्वतांच्या मुलांप्रमाणें या शाळेंतील मुलांना वागवितात. शाळेच्या भोंवतीं सुंदर बाग असते. त्यांत मुलांच्या आवडीचे पशुपक्षी ठेवलेले असतात. एका शाळेंत ५० ते १५० पर्यंत मुलें असतात. मुलें शाळेंत आलीं कीं, मुलांचें तोंड धुणें, त्यांना स्नान घालणें वगैरे गोष्टी शाळेंतील शिक्षकिणी करितात. या शाळेंत मुलांना खेळण्याकरितां मौजेचीं अनेक खेळणीं ठेवलेलीं असतात. तीं घेऊन मुलें आनंदानें खेळतात. तीं बागेंत हिंडतात, पशुपक्ष्यांना खाऊ घालतात, बागेंतील वाळूंत घरें अगर किल्ले बांधतात. हीं मुलें एकमेकांशीं भांडत नाहींत अगर खोड्याही करीत नाहींत. मध्यंतरी मुलांना ताजें दूध व बिस्किटें देतात. दुपारच्या वेळीं मुलांची निजण्याची व्यवस्थाही शाळेंत केलेली असते. लहान लहान दिवाणखान्यांतून चिमुकल्या पलंगांच्या रांगा लावलेल्या असतात. यांजवर लहान लहान स्वच्छ गाद्या व त्यांजवर पांढरे शुभ्र पलंगपोस पसरलेले असतात. या पलंगावर हीं लहान लहान मुलें अगदीं शांतपणें पडलेलीं अगर झोंपलेलीं पाहून मनाला फार आनंद वाटतो. या शाळांतून अभ्यासक्रम नसतो. लिहिणें, वाचणें अंक वगैरे विषय

या शाळांतून घेत नाहींत. परंतु या शाळेंत मुलांना अनेक खेळ खेळण्याला, पांखरें, कीटक, पशु पक्षी यांचें निरीक्षण करण्याला, मातकाम व अगदीं साधें व सोपें हातकाम करण्याला, पशुपक्ष्यांची निगा करण्याला पुष्कळ संधि असते. यामुळें सहज खेळत असतांना किंवा मौजेनें काम करीत असतांना, अथवा मौज पहातांना मुलांच्या ज्ञानांत कितीतरी भर पडते व मुलांना विचार करण्याला कितीतरी संधि मिळते. बालोद्यान शाळांच्या अभ्यासक्रमाची व शिक्षणपद्धतीची माहिती या लेखांत देण्याची आवश्यकता नाहीं. कारण, बालोद्यान पद्धतीची साधारण माहिती प्रत्येक ट्रेन्ड शिक्षकाला असतेच. नर्सरीस्कूल्स व किंडरगार्टन स्कूल्स या दोन प्रकारच्या शाळांमुळें, घरीं खेळण्यास स्वतंत्र जागा असल्यामुळें व आईबाप मुलांच्या शिक्षणाकडे लक्ष पुरवीत असल्यामुळें, सुधारलेल्या देशांतील मुलांच्या दोन ते पांच या वर्षांतील वयाचा, बौद्धिक शिक्षणाच्या दृष्टीनें फार चांगला उपयोग केला जातो. आपल्या इकडे अशी स्थिति येईल तो सुदिन.

जरी आपल्या देशांत बालसंवर्धनशाळा व बालोद्यान शाळा नाहींत, तरी देखील आईबापांनीं मनांत आणल्यास त्यांना आपल्या लहान मुलांच्या ज्ञानोपार्जनाच्या कामीं व मुलांच्या विचारशक्तीचा विकास करण्याच्या कामीं खरोखरच पुष्कळ काम करतां येईल. पण आपल्या इकडील शेंकडा ९९ आईबाप आपलें पवित्र कर्तव्यकर्म करण्याची अगदीं हेळसांड करितात असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. लहान मुलांना संध्याकाळीं समुद्रकिनाऱ्यावर अथवा नदीच्या कांठीं, बागेंत, शेतांत किंवा टेंकडीवर नेलें, तर त्यांना फार आनंद वाटतो. भोंवतालचें नवीन जग पाहून त्यांना फार आश्चर्य वाटतें व त्यांची जिज्ञासा जागृत होते. तीं भोंवतालच्या सृष्टीचें निरीक्षण करतात व आपल्या वडील माणसाला अनेक प्रश्न करून आपल्या ज्ञानांत भर घालतात. शहरांत राहणाऱ्या कितीतरी मुलांनीं सूर्योदयाची किंवा सूर्यास्ताची शोभा देखील पाहिलेली नसते. बागा, शेतें, माळी, शेतकरी, बागेंत व शेतांत होणारे पदार्थ त्यांचें त्यांना बिलकुल ज्ञान नसतें. गद्य, पद्य, गोष्टी, भूगोल इतिहास वगैरे अनेक विषयांत वर सांगितलेलीं स्थळें, माणसें व पदार्थ यांचे उल्लेख अनेक वेळां येतात. ज्या गोष्टी मुलांनीं पाहिल्याच नाहींत त्यांचा विचार तरी मुलांनीं कसा करावयाचा ? संध्याकाळच्या वेळीं आईबापांनीं जर आपल्या लहान

मुलांना समुद्रकांठीं अगर नदीच्या कांठीं खेळावयास नेलें, तर मुलें वाळूंत खेळतात व आपली करमणूक करून घेतात. अनेक प्रकारचे व निरनिराळ्या रंगांचे खडे तीं गोळा करितात. शिंपा व शंख गोळा करण्यांत तर मुलांना फारच आनंद वाटतो. वाळूंत घरें करण्यांत मुलांना फार मौज वाटते. ओल्या वाळूंत घरें व किल्ले बांधणें, बोगेद करणें वगैरे व्यवसाय करण्यांत मुलें अगदीं गढून जातात. हें काम करीत असतांना त्यांना वेळेचेंही भान राहात नाहीं. मासे, बेडूक, खेकडे वगैरे प्राण्यांचें निरीक्षण करण्यांत त्यांना मौज वाटते. या प्राण्यांच्या आयुष्यक्रमाविषयीं व त्यांच्या शरीररचनेबद्दल कितीतरी ज्ञान मुलांना अनायासें मिळतें. मुलांना बागेंत अथवा शेतांत फिरावयास नेले म्हणजे निरनिराळीं पिकें, वनस्पति, पांखरें, कीटक व फुलपांखरें यांसंबंधानें सहजच त्यांना पुष्कळसें ज्ञान मिळतें. मुलांना मधून मधून प्राणिसंग्रहांत नेल्यानें त्यांना मौज वाटते व त्यांना पशुपक्ष्यांची माहिती होते. बाजार, देऊळ यात्रा इत्यादि ठिकाणें मुलांना अवश्य दाखवावीं. मुलें या ठिकाणच्या सर्व गोष्टी लक्षपूर्वक पहातात व त्यासंबंधानें माहिती आपल्या आईबापांना विचारतात. आपल्या इकडे लहान मुलांना स्वतः बाहेर नेण्याची व त्यांना भरपूर खेळ खेळावयास देण्याची व सृष्टिशोभा दाखविण्याची पद्धति सुशिक्षित आईबापांत देखील दिसून येत नाहीं. पुष्कळ सुशिक्षित व विद्वान् गृहस्थ आपला दिवसाचा व्यवसाय संपवून घरीं आले कीं, लगेच चहा घेऊन क्रीडांगणावर किंवा क्लबांत खेळण्यासाठीं बाहेर पडतात. टेनिस, ब्रिज, गप्पा वगैरे झाल्यावर ही मंडळी ९ वाजतां रात्रीं घरीं येतात. कांहीं गृहस्थ आपणांपैकीं कोणाच्या तरी येथें जमून चहाचिवड्यावर हात मारून पत्ते खेळतात व खेळांत आणि गप्पांत संध्याकाळीं दोन तीन तास घालवितात. यामुळें मुलाला बाहेर घेऊन जाण्यास त्यांना सवडच होत नाहीं. आईला घरच्या कामामुळें मुलाला घेऊन संध्याकाळीं कोठेंच बाहेर जातां येत नाहीं. फार झालें तर मुलाला घेऊन ती जवळच्या एखाद्या सोबतिणीकडे जाते. आठ पंधरा दिवसांनीं ती एखाद्या देवळांत जाते, पण ती नेहमीं धांदलींत असावयाची, अर्थात् मुलाच्या शिक्षणदृष्ट्या अशा बाहेर नेण्याचा विशेषसा फायदा नसतो. वडिलांच्या आळसामुळें व स्वतःच्या करमणुकीकडेच लक्ष देण्याच्या त्यांच्या प्रवृत्तीमुळें मुलाचें फार नुकसान होतें.

मागें खेळाच्या संबंधानें लिहितांना खेळाच्या योगानें शिक्षणदृष्ट्या मुलाचा किती फायदा होतो याचें वर्णन केलेंच आहे. तेव्हां त्याची येथें पुनरुक्ति करण्याची आवश्यकता नाहीं. अलीकडे शहरांतील वसती जास्त वाढत चालल्यामुळें मध्यमस्थितींतील कुटुंबाला देखील आपला सर्व संसार लहान लहान दोन तीन खोल्यांतून करावा लागतो. यामुळें मुलांना खेळण्यास शहरांत जागाच मिळत नाहीं. याचा परिणाम मुलाच्या मनावर व शरिरावरही दिसून येत आहे. खेडेगांवांतील मुलें या बाबतींत फार सुखी असतात. त्यांना गांवांत किंवा गांवाबाहेर वाटेल तिकडे हिंडतां येतें. अंगणांत किंवा रस्त्यावर वाटेल तितकी खेळावयास जागा असते, यामुळें त्यांना खेळावयास व अशा प्रकारें आपल्या हातापायांचा उपयोग करण्यास भरपूर संधी मिळते. खेडेगांवांतील मुलें स्वतः पतंग तयार करतात. खेळावयास लागणारा विटीदांडू स्वतःच तावडतोब तयार करितात. लहान लहान मुलें देखील कौलांच्या गाड्या तयार करतात. चेंडू व लगोऱ्या तयार करण्यांत या मुलांना फार आनंद वाटतो व अर्ध्या तासाच्या आंत सर्व मुलें झटून चेंडू व लगोऱ्या तयार करतात. या कामांत मोठ्या मुलांना लहान मुलें आनंदानें मदत करीत असतात. खेळ खेळल्यामुळें व खेळाचें साहित्य स्वतःच तयार केल्यामुळें या मुलांच्या हाताला चांगलें वळण लागतें व त्यांच्या शक्तीला चांगला व्यवसाय मिळतो.

मुलांना मेक्यानोचा खेळ फार आवडतो. मेक्यानोची लहान पेटी ४।५ रुपयांलाही मिळते. या पेटींतील साहित्य घेऊन मुलांना बाक, स्टूल, खुर्ची, टेबल, पूल, पाळणा, नांगर, शिडी, पलंग, गाडी, मोटार वगैरे कितीतरी जिन्नस तयार करितां येतात. चाकें, पट्ट्या इत्यादि भाग नेमके जेथल्या तेथें बसवून स्क्रू फिरवून ते भाग घट्ट बसविण्यास चातुर्य लागतें व विचार करावा लागतो. सुधारलेल्या देशांत ४-५ वर्षांचीं मुलेंही मेक्यानोचा चांगला उपयोग करितात. पालकांनीं मातीचे निरनिराळे पदार्थ करण्यास लहान मुलांना उत्तेजन द्यावें. शहरांतील मुलांना ओल्या मातीला हात लावण्याची संधीच मिळत नाहीं. खेड्यांतील मुलें ओल्या मातीचे अनेक निरनिराळे पदार्थ तयार करीत असतात. भाद्रपदांत खेड्यांतील मुलें गणपती करण्यांत गढून जातात. श्रावणांत पोळ्याकरितां तीं बैल करीत असतात. चांगली माती

मिळाली व मोकळी जागा सांपडली, तर शहरांतीलही मुलें मातीचे चूल, बोळकीं, जातें, पाटा, वरवंटा, भोवरा, चेंडू, केळें, आंबा वगैरे खेळांतील पदार्थ तयार करतात. पाटीवर व कागदावर चित्रें काढण्यासही मुलांना उत्ते-जन द्यावें. कोणत्याही वस्तूचें चित्र काढतांना त्या वस्तूचें काळजीपूर्वक निरी-क्षण करावें लागतें. यामुळें चित्र काढतांना, मुलांना स्वाभाविकपणें वस्तूचे सर्व भाग काळजीपूर्वक पाहाण्याची संवय लागते. हातानें निरनिराळे व्यवसाय केल्यानें मुलाची विचारशक्ति कशी वाढते, याजबद्दलचें विवेचन मागील एका भागांत केलेंच आहे.

लहान मुलांच्या शिक्षणांत गोष्टींचें फार महत्त्व आहे. गोष्टींच्या योगानें मुलांचें मनोरंजन होतें, त्यांच्या कल्पनाशक्तीला व विचारशक्तीला चांगलाच व्यवसाय मिळतो; व मुलांच्या शब्दसंग्रहांत भरपूर नवीन भर पडते. गोष्टींच्या योगानें मुलांची भाषा सुधारते व त्यांना आपले विचार व कल्पना सुसंगत रीतीनें सांगण्याची संवय लागते. गोष्टींच्या योगानें उत्तम नीतिशिक्ष-णही मुलांना मिळतें. मुलांना शिक्षण देण्याचे कामीं गोष्टींचा उपयोग वडील माणसें आपल्या या देशांत प्राचीन काळापासून करीत आहेत. संध्याकाळीं दिवे लागल्यावर मुलांना आपल्या भोवतीं जमवून, आजोबा किंवा आजी त्यांना सुंदर गोष्टी सांगत असत. परंतु अलीकडे मुलांना गोष्ट सांगण्याची ही पद्धति व कला आपल्या कुटुंबांतून नाहींशी होत चालली आहे हें बरें नव्हे.

वडील माणसांनीं लहान मुलांना शब्दाचा अर्थ बरोबर कळतो कीं नाहीं, याजकडे नेहमीं लक्ष दिलें पाहिजे. नवीन शब्द आला कीं, तो मुलांना नीट समजावून दिला पाहिजे. मुलाला शब्दाचा अर्थ बरोबर समजला म्हणजे तें त्या शब्दाचा न चुकतां उपयोग करतें व त्याच्या विचारसरणींत किंवा अनु-मानांत चूक राहण्याचा संभव कमी होतो. शब्दाचा अर्थ बरोबर न कळल्या-मुळें, मुलांच्या अनुमानांत पुष्कळ वेळां फार हास्यास्पद चुका होतात. मी ठाण्यास असतांना माझ्या शेजारीं एक गृहस्थ राहत असत. त्यांना एक पांच वर्षांचा मुलगा होता. तो फार चपळ व गोड स्वभावाचा होता. तो एक दिवस मजकडे आला व मला सांगूं लागला, 'आज आमच्या मामाची मुलगी येणार आहे. तिला मोठी शेपूट आहे.' हा मुलगा काय म्हणतो हें मला मुळींच कळेना. संध्याकाळीं त्या मुलाच्या वडिलांना ती हकीकत मीं

सांगितली. ते म्हणाले, 'अहो, माझे मेहुणे वाद्रें गांवांत राहतात. तेथून त्यांची मुलगी आज यावयाची होती. आमच्या मधूला वाटलें कीं, वांद्रयाची मुलगी येणार. अर्थातच तिला वांदराप्रमाणें लांब व मोठी शेंपूट असलीच पाहिजे.' हें ऐकून मधूचें अनुमान कां चुकलें याचा मला उलगडा झाला. एका इंग्लिश पुस्तकांत अशीच एक मजेची गोष्ट दिली आहे. एका गृहस्थानें आपल्या मुलाला 'रविवार आला कीं मी तुला गांवाला नेईन' असें सांगितलें. मुलगा रविवारची एकसारखी वाट पाहूं लागला, पण तो कांहीं लवकर येईना; तेव्हां मुलानें बापाला विचारलें, 'बाबा रविवार लवकर कां येत नाहीं, तो दमला काय ?' येणें या शब्दाचा अर्थ न कळल्यामुळें या मुलाचें अनुमान चुकलें. एवढ्याकरितां आईबापांनीं व शिक्षकांनीं मुलांना नवीन शब्द बरोबर कळला कीं नाहीं याजकडे लक्ष द्यावें व मुलांनीं शब्दाच्या योजनेंत चूक केली, तर ती त्यांना समजावून द्यावी.

मूल शाळेंत जाण्यापूर्वी आईबापांनीं त्याच्या ज्ञानांत भर घालण्याकरितां व त्याच्या विचारशक्तीला योग्य व्यवसाय देण्याकरितां काय करावें याचें थोडेंसें विवेचन येथवर केलें; आतां लहान मुलाच्या शिक्षकानें आपल्या बाल विद्यार्थ्यां-करितां काय करावें हें पाहूं. मूल शाळेंत आल्यावर प्रारंभीं कांहीं काळ त्याचा अभ्यासक्रम खेळाच्या रूपाचा असावा. गाणीं, गोष्टी, हातकाम, चित्रकला खेळ हे विषय त्याच्या अभ्यासक्रमांत अवश्य असले पाहिजेत. अंक, लेखन व वाचन शिकविण्याची पद्धति मनोरंजक असावी. हे विषय शिकत असतांना मुलांना खेळाच्या स्वरूपाचे अनेक मनोरंजक व्यवसाय देतां येतील. नमुन्या-करितां अशा कांहीं खेळांचें वर्णन पूर्वी केलेंच आहे. दुर्दैवानें आपल्या इकडील शेंकडा नव्याण्णव शाळांतून लहान मुलांनाही शिकविण्यांत केवळ यांत्रिक पद्धतीचा उपयोग केला जातो. अर्थातच या पाठांत मुलांना कांहींच मौज वाटत नाहीं. शाळेंत त्यांना हौसेनें करण्याजोगें मनोरंजक असें कामच मिळत नाहीं. या कामीं खेड्यांतून व शहरांतून काम करणारे शिक्षक सर्वच सारखे असतात. उदासीन किंवा अज्ञान पालक आणि अज्ञान किंवा असंतुष्ट शिक्षक यांच्या ताब्यांत लहान मुलें सांपडल्यामुळें, आपल्या देशांतील लक्षावधि उत्तम मुलांच्या बुद्धीच्या विकासाला अडथळा येत आहे. शाळेंतील अभ्यास-क्रमांत शिक्षकानें सांगावें व मुलांनीं घोकावें असा प्रकार सतत चालल्यावर,

मुलांचें ज्ञान वाढलें नाहीं व त्यांच्या स्वाभाविक विचारशक्तीचा विकास झाला नाहीं, तर आश्चर्य कोणतें ? शिक्षकांनीं लहान मुलांना बरोबर घेऊन सहलीला नेलें, तर मुलांना फार आनंद वाटतो. नवीन ज्ञान मिळवून देण्याच्या कामीं व त्यांच्या विचारशक्तीला व्यवसाय देण्याच्या कामीं या सहली फार उपयोगीं पडतात.

आतांपर्यंत लहान मुलांच्या विचारशक्तीसंबंधानें जें विवेचन केलें त्याजवरून पुढील गोष्टी वाचकांच्या लक्षांत येतील.

१ मुलांच्या विचारशक्तीचें कार्य अगदीं लहानपणापासून सुरू होतें.

२ आईबापांनीं मुलाच्या अगदीं लहानपणापासून त्याच्या विचारशक्तीच्या विकासाकडे लक्ष द्यावें.

३ मुलांना निरनिराळीं खेळणीं पुरवावीं. त्यांना निरनिराळ्या वस्तु, पशुपक्षी व कीटक दाखवावे.

४ आईबापांनीं मुलाला संध्याकाळीं नदीचे तीरावर न्यावें व त्यांना वाळूंत खेळूं द्यावें. मुलाला मधून मधून शेतांत व बागेंत घेऊन जावें.

५ मुलांना खेळावयास उत्तेजन द्यावें व खेळाचें साहित्य स्वतः तयार करण्यास त्यांना उत्तेजन द्यावें.

६ मुलांना मातकाम व इतर हातकाम करण्यास आणि चित्रें काढण्यास उत्तेजन द्यावें. ज्या आईबापांस शक्य असेल त्यांनीं मुलांना मेक्यानोची पेटी विकत घेऊन द्यावी.

७ मुलांच्या प्रश्नांचीं काळजीपूर्वक उत्तरें द्यावीं व शक्य तर मुलांना स्वतांच विचार करून प्रश्नांचें उत्तर शोधून काढण्यास उत्तेजन द्यावें.

८ मुलांशीं बोलतांना सोप्या भाषेचा उपयोग करावा. नवीन शब्द मुलांना नीट समजावून सांगावे.

९ मुलांचीं अनुमानें व निर्णय अनेक वेळां चुकतात. कारण त्यांच्या पूर्वज्ञानाचा सांठा व अनुभव हे फार कमी असतात. त्यांच्या भावना फार तीव्र असतात व त्यांना भाषाही समजत नाहीं.

१० मुलांना शक्य तेथें स्वतांच्या प्रयत्नानें ज्ञान मिळविण्यास मदत करावी व अशाप्रकारें ज्ञान मिळविलें कीं तें चिरकाल टिकतें व मुलांना प्रयत्न करून यश मिळविल्यानें फार आनंद वाटतो.

# भाग ११

## अवधान ( लक्ष )

कोणत्याही गोष्टीचें ज्ञान होण्यास तिजकडे लक्ष द्यावें लागतें. लक्ष—यालाच अवधान म्हणतात—नसेल, तर त्या गोष्टीचें आपणांस ज्ञानच होणार नाहीं. ज्ञान हें सर्वस्वीं अवधानावर अवलंबून असतें. मागील भागांतून अवधानाचा उल्लेख बऱ्याच वेळीं केलेला आहे. अवधानाचें स्वरूप व त्याचें महत्त्व यांचा या भागांत विचार करूं.

धाकटी विमल दोरीवरून उड्या मारण्यांत गुंग झाली होती. एकाच डावांत न चुकतां शंभर उड्या मारण्याचा तिचा हेतु होता. इतक्यांत आईनें तिला हाक मारली व 'विमल जेवावयास चल' असें सांगून ती निघून गेली. विमलचें सारें लक्ष खेळाकडे असल्यामुळें आई काय म्हणाली हेंच तिला नीटसें कळलें नाहीं व म्हणून ती जेवावयास गेली नाहीं.

आज शाळेला सुटी होती. गणू आज पतंग उडविण्याकरितां सोबत्यांच्या बरोबर मैदानांत जाणार होता. रंगित पातळ कागदाचा पतंग करण्यांत तो गढून गेला होता. त्याची आई ओसरीवर तेलाचें भांडें घेऊन आली व ती गणूला म्हणाली, 'गणू, घरांतील तेल संपलें आहे. हें भांडें घे व वाण्याकडून शेरभर तेल घेऊन ये.' आईनें तें भांडें गणूच्या जवळ कोनाड्यांत ठेवलें व ती कामाकरितां घरांत निघून गेली. गणूनें 'जातों' म्हणून म्हटलें व तो पतंग करण्यांत गुंग झाला. पतंग तयार झाल्यावर तो आपला पतंग घेऊन मैदानांत पळत गेला. आईनें ठेवलेलें तेलाचें भांडें कोनाड्यांत तसेंच पडून राहिलें.

वर्गांत शिक्षक इतिहास शिकवीत होते. ते आपल्याकडून पाठ शक्य तितका मनोरंजक करण्याचा प्रयत्न करीत होते. वसंत हा वर्गांतील हुशार मुलगा होता. तो नेहमीं चांगलीं उत्तरें देत असे. पाठ झाल्यावर शिक्षकानें वसंताला कांहीं प्रश्न विचारले. पण त्याला एकाही प्रश्नाचें उत्तर देतां येईना. तें पाहून

शिक्षकांना वसंताचा फार राग आला. वसंताचें आज धड्याकडे मुळींच लक्ष नव्हतें. त्याचा मामा आज संध्याकाळीं मुंबईहून यावयाचा होता व तो त्याला सायकल घेऊन येणार होता. त्या सायकलीचा विचार एकसारखा वसंताच्या मनांत घोळत होता. यामुळें शिक्षक काय सांगतात याजकडे त्याचें लक्ष मुळींच नव्हतें.

मनुष्याचें अवधान—लक्ष जर एखाद्या गोष्टीकडे नसलें, तर त्या गोष्टीचें ज्ञान त्याला होत नाहीं हें वरील तीन उदाहरणांवरून लक्षांत येईल. कोणत्याही गोष्टीचें ज्ञान होण्याला त्या गोष्टीकडे लक्ष पाहिजे. लक्ष जर नसेल, तर त्या गोष्टीचें ज्ञान होणार नाहीं. आपण पुस्तक वाचण्यांत जर गढून गेलों, तर दुसऱ्या माणसानें मारलेली हाक देखील आपणांस ऐकूं येत नाहीं.

आपण वर जीं तीन उदाहरणें घेतलीं आहेत त्यांजवरून आपल्या लक्षांत येईल कीं, ज्या विषयाची गोडी मुलाला वाटते त्याच विपयाकडे मुलाचें अवधान लागतें. विमलला उड्या मारण्याची आवड होती, यामुळें तिला त्या कामांत गोडी वाटत होती व तिकडे तिचें अवधान लागलेलें होतें. गणूला पतंग उडविण्याची आवड होती, म्हणून त्याला पतंग करण्यांत गोडी वाटत होती व त्या कामाकडे त्याचें अवधान लागलेलें होतें. वसंतला सायकलवर बसण्याची आवड होती, म्हणून सायकलच्या विचारांत त्याला गोडी वाटत होती व तिकडे त्याचें अवधान लागलेलें होतें. या तीन मुलांना आपआपल्या विषयाची कां आवड वाटत होती याचा विचार करूं. विमलला आपल्या सोबतिणींपेक्षां उड्या मारण्यांत जास्त कौशल्य मिळवावयाचें होतें. तिला आपलें हें चातुर्य वडील माणसांना दाखवावयाचें होतें. अर्थातच विमलची आवड स्पर्धा व स्वतांचा मोठेपणा मिरविण्याची सहजप्रवृत्ति या दोन सहजप्रवृत्तींमुळें उत्पन्न झाली होती. शिवाय मुलांमध्यें प्रबळ असणारी कृतिप्रेम ही सहजप्रवृत्ति व खेळाची आवड ही स्वाभाविक वृत्ति याही विमलच्या आवडीला कारण झाल्या होत्या. गणू व वसंत यांच्या आवडीच्या बुडाशीं याच सहजप्रवृत्ति व स्वाभाविक वृत्ति होत्या असें विचार केला असतां दिसेल. मुलांची आवड ही त्यांच्या सहजप्रवृत्तींवर व स्वाभाविक वृत्तींवर अवलंबून असते.

शाळेंत शिक्षक मुलांना अंक लिहावयास सांगतो. मुलांचें लक्ष या कामाकडे लागत नाहीं. कारण अंक लिहिण्यांत त्यांना बिलकुल गोडी वाटत नाहीं.

तीं लवकरच टिवल्या बावल्या करूं लागतात. मुलांना अंक काढण्यांत गोडी का वाटत नाहीं, याचें कारण या कामांत त्यांच्या कोणत्याही सहजप्रवृत्तीचा अगर स्वाभाविक वृत्तीचा उपयोग करून घेतलेला नसतो. मुलाचें लक्ष जर एखाद्या विषयाकडे वेधून घ्यावयाचें असेल, तर त्याच्या सहजप्रवृत्तींचा व स्वाभाविक वृत्तींचा अवश्य उपयोग करून घेतला पाहिजे. एका इंग्लिश पुस्तकांत पुढील गोष्ट दिली आहे. एका शेतकऱ्यानें एक लहानसें शेत विकत घेतलें. या शेतांत लहान लहान दगड खूप पसरलेले होते. शेतकऱ्यानें दगड गोळा करून फेंकून देण्याचें काम आपल्या मुलाला सांगितलें. थोड्याच वेळानें या मुलाचे १५।२० सोबती त्याजबरोबर खेळावयास आले व कोणता खेळ आतां खेळावयाचा याचा विचार सुरू झाला. शेतकऱ्याचा मुलगा फार हुशार होता; तो म्हणाला, 'गड्यांनो, आपण एक नवा खेळ खेळूं या. प्रत्येक जणानें दहा दगड आणावे व त्या समोर दूर दिसणाऱ्या मोठ्या दगडाचा नेम धरून त्याजकडे आपला दगड फेकावा. ज्याचे जास्त दगड त्या दगडाला लागतील तो डाव जिंकील'. सर्व मुलांनीं दगड गोळा केले व नेम धरून समोरील दगडाकडे गोळा केलेल्या दगडांचा मारा सुरू केला. पुन्हा दगड गोळा करावे, पुन्हा दगड फेकावे असा त्यांचा क्रम एकसारखा सुरू होता. कांहीं वेळानें शेतांतील दगडही संपले व मुलांचा खेळही संपला.

मुलांना शेतांतील दगड वेचून ते दूर फेकून देण्याचें काम जर सांगितलें असतें, तर तें त्यांना कंटाळवाणें झालें असतें व त्यांत त्यांचें लक्ष लागतेंना. कारण, त्या कामांत त्यांच्या कृतिप्रेम, स्पर्धा वगैरे सहजप्रवृत्तीचा किंवा खेळांची आवड या स्वाभाविक वृत्तीच्या कार्याला जागाच नव्हती. शिक्षकाला किंवा पालकाला जेव्हां मुलांकडून एखादें कार्य करून घ्यावयाचें असेल, तेव्हां त्यानें त्या कार्यांत मुलांच्या सहजप्रवृत्तींचा व स्वाभाविक वृत्तींचा उपयोग करून घेतला पाहिजे. असें केलें, तरच मुलांचें अवधान त्या कार्याकडे लागतें.

लहान मुलांना शिक्षण देतांना पालकांनीं व शिक्षकांनीं त्यांच्या सहजप्रवृत्तींचा व स्वाभाविक वृत्तींचा उपयोग करून घेतला पाहिजे. याशिवाय मुलांचें अवधान आकर्षण करून घेणेंच शक्य नाहीं. म्याडम मांटेसरी यांच्या शाळेंतील चार पांच वर्षांचीं मुलें आपणांला आवडेल तें शिक्षणसाहित्य घेऊन अर्धा

पाऊण तास एकसारखें लक्ष लावून काम करीत असतात व स्वप्रयत्नानें नवीन ज्ञान मिळवीत असतात. म्याडम मांटेसरी यांचें साहित्यच अशाप्रकारें केलेले असतें कीं, त्याचा उपयोग करीत असतांना मुलांच्या जिज्ञासा, कृतिप्रेम, मोठेपणा दाखविण्याची इच्छा या व इतर सहजप्रवृत्तींचा भरपूर उपयोग केला जातो. यामुळें हें साहित्य घेऊन काम करीत असतांना मुलांना अतिशय गोडी वाटते व त्यांचें अवधान त्या साहित्याकडे लागतें. चार पांच वर्षांच्या मुलांची प्रवर्तकशक्ति अत्यंत दुबळी असते यामुळें बुद्ध्या होऊन एखाद्या कामाकडे आपलें अवधान लावणें त्यांना शक्य नसतें. या कारणामुळेंच पांच ते आठ वर्षांपर्यंतच्या मुलांचा अभ्यासक्रम खेळाच्या रूपाचा असावा. अभ्यासाला खेळाचें रूप कसें देतां येईल व मुलांच्या सहजप्रवृत्तींचा व स्वाभाविक वृत्ति जी खेळाची आवड तिचा शिक्षणाचे कामी कसा उपयोग करून घेतां येईल हें खेळ, कृतिप्रेम वगैरे भाग लिहितांना स्पष्ट केलें आहेच. या सहज-प्रवृत्तींच्या प्रेरणेनें मुलांना आपल्या कामांत गोडी वाटते व तीं त्या कामाकडे लक्ष देतात.

लहान मुलांचें लक्ष एखाद्या कामांत लागलेलें असेल किंवा तें एखाद्या गोष्टीकडे लागलेलें असेल, तेथून तें काढून दुसरीकडे नेण्यास पालकाला व शिक्षकाला फार त्रास पडतो. मुलाची प्रवर्तकशक्ति अगदीं दुबळी असल्यामुळें त्याला आत्मसंयमन करितां येत नाहीं व आकर्षक गोष्टींवरून आपलें अवधान काढून घेतां येत नाहीं. यामुळें शिक्षकाला व वडील माणसांना कधीं कधीं मुलांचा फार राग येतो व तीं हट्टी व खोडकर आहेत असा त्यांचा समज होतो. चार वर्षांची बनी आपल्या बाहुलीला दूध पाजीत होती. जेवावयाचीं पानें मांडलीं होतीं. आईनें तिला दोनदां जेवावयास बोलाविलें, पण बनी आपल्या कामांत गढून गेली होती, तिचें आईकडे लक्षच गेलें नाहीं.

अखेरीस बनीचा दादा उठला. त्यानें बनूची बाहुली रागानें उचलली व कपाटावर ठेवून दिली व बनीला ओढीत नेऊन पाटावर बसाविलें. अर्थातच बनीला दादाचें करणें आवडलें नाहीं. ती जेवली तर नाहींच, पण तिनें मोठा गळा काढून हातपाय आपटण्यास सुरुवात केली. त्या गडबडींत तिचा पाय लागून दादाचा तांब्या सांडला व त्याच्या अन्नांत पाणीच पाणी झालें.

बनीच्या आरडण्याओरडण्यानें सर्वांचेंच जेवण थांबलें व अन्न गार झालें. अखेर आईनें जेव्हां तिची बाहुली काढून दिली व बनीनें आपल्या बाळाला दूध पाजलें, तेव्हां ती जेवावयास आली व सर्वांचें जेवण शांतपणें सुरू झालें.

लहान मुलांचें लक्ष एका गोष्टीवरून दुसऱ्या गोष्टीकडे नेण्याचें काम शांतपणें व चातुर्यानें केलें पाहिजे. दहा वर्षांचा राजाराम गणेशचतुर्थीला गणपति करण्याचे कामांत गढून गेला होता. त्याचे वडील शिवरामभाऊ तेथें आले. ते राजारामाला म्हणाले, 'राजा, तुझा गणपति बरा दिसतो आहे रे. बरें पण आतां हें आटपून ठेव व जरा मला मदत करावयाला ये. मला आज फार काम आहे. तुझी मदत मला पाहिजे. दुपारीं तूं खुशाल गणपति करीत बस.' राजानें हळू हळू आपलें सामान आटोपलें व हात धुऊन तो बापाच्या मदतीस गेला. शाळेंत एक विषय संपवून दुसरा विषय घेतांना देखील शिक्षकाला एका विषयांतून मुलांचें लक्ष काढून दुसऱ्या विषयाकडे लावण्याचें काम फार चातुर्यानें करावें लागतें. आज आपण या विषयाचा कोणता भाग शिकलों, त्यांत महत्त्वाच्या गोष्टी कोणत्या आहेत, या सर्व गोष्टी मुलांकडून काढून घेऊन नंतर 'हा पाठ पुरे झाला, आतां आपण नवीन पाठाला सुरुवात करूं' अशी प्रस्तावना करून, पूर्वीच्या विषयांतून मुलांचें लक्ष काढून घेऊन तें नवीन विषयांकडे लावावें लागतें.

मुलें जसजशीं मोठीं होतात, तसतशी त्यांची विचारशक्ति वाढत जाते. त्यांच्या सहजप्रवृत्तींना योग्य व शिक्षणदृष्ट्या हितकारक असें वळण शिक्षक व पालक देत असतात. अशा प्रकारें त्यांच्या सहजप्रवृत्तींचें उच्चीकरण करण्याचें कार्य चाललें असतें. हें कार्य पालक व शिक्षक कसें करतात याचें विवेचन सहजप्रवृत्तींचें शिक्षण' या भागांत केलें आहे. मुलांची विचारशक्ति वाढली कीं, मुलें एखादा हेतु मनांत धरून कार्य करूं लागतात. त्या कार्याची सिद्धि कांहीं काळानें जरी व्हावयाची असली, तरी त्या कार्याकरितां लागणाऱ्या अवश्य गोष्टी मुलें न कंटाळतां लक्षपूर्वक करितात. आजपासून एक महिन्यानें परीक्षा व्हावयाची आहे, 'परीक्षेंत आपण पास झालें पाहिजे, आपण वरच्या इयत्तेंत गेलें पाहिजे' असा हेतु मनांत धरून मुलें परीक्षेच्यापूर्वी एक महिन्यापासून लक्षपूर्वक अभ्यास करूं लागतात. शाळेच्या समारंभाकरितां त्रासदायक कामेंहि मुलें लक्ष लावून आठ पंधरा दिवस एकसारखीं

करीत असतात. सारांश, मुलांची कल्पनाशक्ति व विचारशक्ति वाढली कीं कांहीं दिवसांनीं होणाऱ्या इष्ट कार्याकरितांही तीं मनापासून झटतात व तें कार्य साध्य करण्याकरितां ज्या ज्या गोष्टी कराव्या लागतात तिकडे अवधान देतात.

अवधानाचे दोन प्रकार असतात. एक ऐच्छिक अवधान व दुसरें अनैच्छिक अवधान. प्रयत्न करून, प्रवर्तकशक्तीच्या जोरावर जें अवधान दिलें जातें तें ऐच्छिक अवधान. विषय मनोरंजक असल्यामुळें व त्या विषयांत गोडी वाटत असल्यास जें अवधान सहज दिलें जातें, ज्याला प्रवर्तकशक्तीची फारच थोडी जरूर लागते तें अनैच्छिक अवधान होय. लहान मुलांचें अवधान पहिल्या प्रकारचें असतें. मुलांची प्रवर्तकशक्ति दुबळी असल्यामुळें त्यांना बुद्धया होऊन आपलें लक्ष एखाद्या गोष्टीकडे देतां येत नाहीं. मुलें जसजशीं मोठीं होत जातात, तसतशी त्यांची विचारशक्ति वाढते, त्यांना बरें वाईट कळूं लागतें व त्यांचा स्वाभिमान वाढत जातो. प्रेम, आदर, सहानुभूति वगैरे उच्च मनोवृत्तिही हळू हळू त्यांच्या अंतःकरणांत विकास पावत असतात. यामुळें आपल्या प्रवर्तकशक्तीचा उपयोग करून त्यांना न आवडणाऱ्या गोष्टीकडेहि तीं लक्ष देण्यास शिकतात.

रविवारीं दुपारीं वत्सलेला तिच्या मैत्रणीनें खेळावयास बोलाविलें होतें. वर्गांतील १०–१२ मैत्रिणी तेथें जमणार होत्या. त्या बागेंत जाणार होत्या. तेथें खेळ खेळून व फराळ करून त्या संध्याकाळीं परत येणार होत्या. सकाळीं दहा वाजतां वत्सलेच्या थोरल्या बहिणीच्या सासरची मंडळी तिच्या एथें पाहुणी आली. आई वत्सलेला म्हणाली, 'ताई, तूं आज खेळावयास जाऊं नको. तूं जर मला मदत केली नाहींस, तर माझी फजीती उडेल.' वत्सलेनें खेळावयास जाण्याचा बेत रहित केला व ती लक्षपूर्वक आपल्या आईला मदत करूं लागली. आईच्या प्रेमामुळें व आईला मदत करणें हें आपलें काम आहे हें तिला कळत असल्यामुळें ती घरीं राहिली व तिनें आईनें सांगितलेलें सर्व काम मन लावून केलें. वत्सलेला चौदावें वर्ष लागलें होतें. तिची विचारशक्ति वाढली होती, तिला बरें वाईट कळत होतें, तिला स्वतांचा व स्वतांच्या कुटुंबाचा अभिमान होता. तिची प्रवर्तकशक्ति वाढली होती, यामुळें तिला आपलें सर्व लक्ष बुद्धया होऊन घरच्या कामाकडे देतां आलें.

मनुष्याला ऐच्छिक व अनैच्छिक दोन्हीं प्रकारच्या अवधानाची जरूर असते. मोठीं माणसें नेहमीं ऐच्छिक अवधानाचाच उपयोग करितात असेंहि नाहीं. बँकेंतील कारकूनही आपले बहुतेक काम अनैच्छिक अवधानाचें साहाय्यानें करीत असतो. संध्याकाळीं कंटाळा आला किंवा हिशेब फारच भानगडीचे असले, तरच त्याला आपल्या ऐच्छिक अवधानाचा उपयोग करावा लागतो.

एखाद्या गोष्टीकडे अनैच्छिक अवधान लावणें म्हणजे स्वस्थ बसणें, कोणतेंही मानसिक कार्य न करणें, मानसिक व शारीरिक विश्रांति घेणें असें नाहीं. मूल खेळत असतांना त्याचें विचाराचें कार्य सुरू असतें. त्याचें शरीरही कार्य करीत असतें. एखाद्या वेळीं एखादा नवशिक्या शिक्षक आपला पाठ आकर्षक करण्याकरितां जादुगाराप्रमाणें खूप साहित्याचा उपयोग करितो. मुलें त्याजकडे आश्चर्यानें पाहात असतात. पण तीं या पाठासंबंधानें बिलकूल विचार करीत नसतात. आश्चर्यचकित होऊन एखाद्या गोष्टीकडे नुसती नजर लावून बसणें म्हणजे अवधान नव्हे.

ऐच्छिक अगर अनैच्छिक असो, मुलांना आपलें अवधान एकसारखें एखाद्या गोष्टीकडे लावतां येत नाहीं. कांहीं वेळ अवधान दिल्यावर मूल कंटाळून जातें. त्याच्या मेंदूला थकवा येतो. मग त्याचें अवधान कमी कमी होत जातें. एवढ्याचकरितां लहान मुलाचे वर्गांत २०।२५ मिनिटांचा पाठ ठेवावा लागतो. विषयांत बदल झाला म्हणजे मुलांना आनंद वाटतो व त्यांचें अवधान या नवीन पाठाकडे लागतें. असे दोन पाठ झाल्यावर आलेला मानसिक थकवा घालविण्याकरितां त्यांना उघड्या हवेंत खेळण्यास धाडणें अवश्य असतें. खेळल्यानें त्यांचें रुधिराभिसरण जोरानें सुरू होतें. मुलांना हुशारी वाटते व त्यांचा थकवा नाहींसा होतो. मुलें ७।८ वर्षांचीं होईपर्यंत त्यांना तीन पाठ झाल्यावर दुपारीं दोन वाजतां अर्धा तास पूर्ण विश्रांति मिळणें अवश्य असतें. यावेळीं त्यांनीं शांतपणें निजून राहाणें फार चांगलें. या योगानें त्यांची प्रकृति चांगली राहाते.

ज्याप्रमाणें आवडीमुळें एखाद्या विषयाकडे अवधान लागतें, त्याप्रमाणें भीतीमुळेंही, भीति उत्पन्न करण्याऱ्या विषयाकडे लक्ष लागतें. शिक्षकाच्या

किंवा पालकाच्या भीतीनें मुलें न आवडणाऱ्या गोष्टीकडेही अवधान देतात. भीतीमुळें हें त्यांचें अवधान त्या विषयाकडे ओढलें जातें. पण या अवधानामुळें मुलाचा फारसा फायदा होत नाहीं. उलटपक्षीं ज्या विषयाकडे किंवा कामाकडे मुलांना लक्ष द्यावें लागतें त्याचा तिटकारा त्यांच्या मनांत उत्पन्न होतो.

शाळेंत शिक्षकानें आपल्या पाठाकडे मुलांचें लक्ष वेधून घेण्याकरितां प्रयत्न केला पाहिजे. त्यानें तो पाठ मनोरंजक केला पाहिजे. आपल्या पाठांत त्यानें मुलांची जिज्ञासा जागृत केली पाहिजे. स्वतां भाराभर न बोलतां मुलांना विचार करून प्रश्नांचीं उत्तरें देण्यास उत्तेजन दिलें पाहिजे. चित्रें, आकृति, नमुने वगैरे साहित्याचा भरपूर उपयोग केला पाहिजे. विशेषतः मुलांना मिळविलेल्या ज्ञानाचा उपयोग करण्याची भरपूर संधि दिली पाहिजे.

आतां या भागांतील महत्त्वाच्या गोष्टी थोडक्यांत पाहून हा भाग पुरा करूं.

मनाची सर्व शक्ति एकवटून एखाद्या गोष्टीकडे लक्ष लावणें यालाच अवधान म्हणतात.

अवधानाचे दोन प्रकार आहेत. पहिला अनैच्छिक व दुसरा ऐच्छिक.

विषयाची अगर कामाची गोडी वाटल्यामुळें जें अवधान सहज त्या विषयाकडे अगर कामाकडे ओढलें जातें, व तेथें तें राखण्यास विशेषसा प्रयत्न करावा लागत नाहीं तें अनैच्छिक अवधान होय. एखाद्या विषयाची अगर कामाची आवड नसतांना, किंवा आवड असून कंटाळा आला असतांही प्रवर्तक शक्तीच्या जोरानें जें अवधान त्या विषयाकडे किंवा कामाकडे लावलें जातें तें ऐच्छिक अवधान होय.

मुलाचें अवधान अनैच्छिक असतें. तें त्याच्या सहजप्रवृत्तींच्या किंवा स्वाभाविक वृत्तींच्या प्रेरणेनें विषयाकडे आकर्षलें जातें.

एवढ्याचकरितां मुलांना शिकवितांना त्यांच्या कृतिप्रेम, जिज्ञासा, स्तुतिप्रियता वगैरे सहजप्रवृत्तींचा व खेळ वगैरे स्वाभाविक वृत्तींचा उपयोग करून घ्यावा लागतो. एवढ्याचकरितां मुलांचा अभ्यासक्रम खेळाच्या रूपाचा असावा लागतो.

मुलांची विचारशक्ति वाढली कीं, त्यांना इष्टहेतु मनांत धरून काम करण्याची सवय लागते. त्यांची प्रवर्तकशक्ति वाढते. मग इष्ट हेतु साधण्याकरितां त्रासदायक किंवा न आवडणाऱ्या कामाकडेही तीं लक्ष देतात.

पूर्ण अवधान दिल्याशिवाय कोणत्याही गोष्टीचें स्पष्ट ज्ञान होत नाहीं.

## भाग १२ वा.

## सहजप्रवृत्ति.

मुलाच्या जन्मापासून ७ वर्षेपर्यंत त्याचा मानसिक व शारीरिक विकास कसा होत जातो याचें विवेचन आतांपर्यंत केलें आहे. हें विवेचन करीत असतांना स्पर्धा, स्तुतिप्रियता वगैरे मुलांतील सहजप्रवृत्तींमुळें त्याच्या शरीराचा व मनाचा विकास होण्यास कशी मदत होते, त्याचप्रमाणें खेळ, अनुकरण इत्यादि मुलांतील स्वभाविक वृत्तिहि या कार्यांत कसें साहाय्य करितात हें दाखविलें आहे. सहजप्रवृत्ति व स्वभाविकवृत्ति यांजवर स्वतंत्र लेख लिहिल्याशिवाय त्यांचें स्वरूप व त्यांच्या कार्याचें महत्त्व यांची स्पष्ट कल्पना येणार नाहीं, म्हणून या भागांत सहजप्रवृत्तींचा सामान्य विचार केला आहे. पुढील भागांत स्वाभाविकवृत्तींचा विचार करूं.

या जगांत बहुविध प्राणी आहेत. प्रत्येक प्राणी आपलें पोषण करितो, रक्षण करितो व आपली वंशवृद्धि करून आपला आयुष्यक्रम संपवितो. प्राण्यांचें पोषण, रक्षण व वंशवृद्धि हीं तीन कार्यें नीट चाललीं नाहींत, तर ही परमेश्वराची सृष्टि लयाला जाईल. हीं कार्यें नीट चालावीं याजकरितां परमेश्वरानें प्रत्येक प्राण्याला कांहीं सहजप्रवृत्ति दिल्या आहेत. त्या प्राण्यांत जन्मतःच असतात. या सहजप्रवृत्तींचें स्वरूप आपण कांहीं उदाहरणें घेऊन स्पष्ट करूं. वासरूं जन्मास आल्याबरोबर गाईच्या सडास लागतें व दूध पिऊं लागतें. कोंबडीचें पिलूं अंड्यांतून बाहेर पडल्याबरोबर दाणे व किडे वेचूं लागतें व त्याच्या शरीरप्रकृतीला इष्ट असेंच अन्न तें टिपतें व खातें. प्राण्याला त्याच्या शरीरप्रकृतीला इष्ट असें अन्न खावयास कोणीं शिकवावें लागत नाहीं. आपलें भक्ष्य कोणतें व तें कसें मिळवावयाचें हें त्याला जन्मापासूनच कळतें.

संकटापासून आपलें संरक्षण करण्याची प्रवृत्ति देखील अगदीं स्वाभाविक आहे. कोंबडीचें अगदीं लहान पिलूं देखील बोका पाहिल्याबरोबर आपल्या आईकडे धांवत जातें. संकट पाहिल्याबरोबर खार झाडावर चढते, बेडूक पाण्यांत उडी मारतो, ससा बिळांत लपून बसतो व विंचू कोपऱ्यांत अगर फटींत शिरतो. संकट आलें असतां, संरक्षण करण्याचें ज्ञान या प्राण्यांनीं अनुभवानें मिळविलें नाहीं. तें जन्मतःच मिळतें व त्या योगानें ते इष्ट तें कार्यही करतात. मुलांचें पोषण व संगोपन करण्याच्या प्रवृत्तीचें उदाहरण आपण घेऊं. अंडीं घालण्याची वेळ झाली म्हणजे पक्ष्यांतील नर व मादी मिळून घरटें बांधतात. त्यांत मादीनें अंडीं घातलीं कीं, नर व मादी मिळून तीं आळी-पाळीनें उबवितात. अंड्यांतून पिलें बाहेर पडलीं कीं, तीं लहान व दुर्बळ आहेत, तोंपर्यंत आईबाप त्यांचें ममतेनें पोषण व रक्षण करितात. अशा प्रकारें त्यांची वंशवृद्धि होते. पक्ष्यांतील नरमादींना घरटें बांधण्यास व पिलांचें रक्षण व संगोपन करण्यास कोणीं शिकविलेलें नसतें. गांधील माशी मातीचें घर तयार करते. त्यांत ती अंडीं घालते. आपल्या पोरांना खावयाकरितां कांहीं किडे ती या घरांत ठेवते. या किड्यांना नांगी मारून ती बेशुद्ध करिते. कांहीं दिवसांनीं गांधीलमाशीच्या अंड्यांतून अळ्या बाहेर पडल्या कीं, त्या आईनें ठेवलेले किडे खाऊन टाकतात व मग घराच्या बाहेर पडतात. नंतर त्या आपल्या स्वतांचें पोषण करून आपला आयुष्यक्रम चालवितात. वाघासारखा निष्ठुर व क्रूर प्राणी दुसरा कोणताही नाहीं, पण वाघीणही आपल्या पिलांचें तीं लहान आहेत, तोंपर्यंत ममतेनें पालनपोषण करते. प्राण्यांतील या सर्व आयांना आपल्या पिलांचें पोषण व संगोपन करण्यास कोणीं शिकविलें नाहीं. प्राण्यांतील मादींत व कांहीं प्राण्यांच्या नरांतही ही अपत्यसंगोपनाची प्रवृत्ति जन्मतःच असते. ती मागून उत्पन्न होत नाहीं.

सहज प्रवृत्ति ही प्राण्यांत जन्मतःच असते व तिचें कार्य आपोआपच घडत असतें. मांजर उंदीर पाहतें व ताबडतोब भूक शमन करण्याची त्याची सहजप्रवृत्ति जागृत होते. व तें उंदरावर झडप घालतें. उंदीर मांजराला पाहतो. त्याची संकटापासून दूर होण्याची सहजप्रवृत्ति जागृत होते. भीति हा मनोविकार त्याच्या मनांत उद्भवतो व तो पळून लागलाच बिळांत शिरतो

व आपला जीव बचावतो. उंदराची व मांजराची ही क्रिया त्यांच्यांतील रक्षणाच्या व पोषणाच्या प्रवृत्तीमुळेंच घडली आहे.

सहजप्रवृत्तीचें कार्य कसें घडतें हें आपण उदाहरण घेऊन पाहूं. एक मांजर रस्त्यांतून जात असतांना त्यानें समोरून एक कुत्रा येतांना पाहिला. त्याबरोबर हा कुत्रा भयंकर आहे व तो आपणांकडे येत आहे हें ज्ञान मांजराला झालें. मग त्याचे मनांत भीति हा मनोविकार उत्पन्न झाला व त्यानें आत्मसंरक्षण करण्याकरितां पळण्यास सुरवात केली व कुत्रा जवळ येण्याच्या पूर्वी तें जवळच्या झाडावर चढलें. सहजप्रवृत्तीच्या या व्यापारांत ज्ञान, भावना व क्रियाप्रवृत्ति या तिन्ही गोष्टी दिसून येतात.

सहजप्रवृति इतर प्राण्यांत ज्याप्रमाणें असतात त्याप्रमाणें मनुष्यांतही असतात. या सहजप्रवृत्तींमुळें मनुष्यांचें आचरण घडत असतें. सहजप्रवृत्ति या एंजिनप्रमाणें आहेत. एंजिनाच्या जोरानें आगगाडी चालते त्याचप्रमाणें मनुष्याचें सर्व आचरण या सहजप्रवृत्तींच्या प्रेरणेवर अवलंबून असतें. मुख्य सहजप्रवृत्ति किती व त्या कोणत्या याजबद्दल मात्र मानसशास्त्रवेत्त्यांत एकमत नाहीं. सहजप्रवृत्तींच्या स्वरूपांचा व कार्याचा विचार इंग्लिश मानसशास्त्रवेत्ता डॉक्टर–म्याकूडुगल यांनीं फार काळजीपूर्वक केला आहे. त्यानें मुख्य सहजप्रवृत्ति ७ मानल्या आहेत. प्रत्येक सहजप्रवृत्तींत एक मनोविकार असतो. उदाहरणार्थ, पलायनवृत्ति किंवा संकटापासून दूर होण्याची प्रवृत्ति. या प्रवृत्तींत भीति हा मनोविकार असतो. मुख्य ७ सहज प्रवृत्ति व त्या प्रत्येकींत असणारा मनोविकार हीं पुढें दिलीं आहेत.

| | सहजप्रवृत्ति | मनोविकाराचें नांव |
|---|---|---|
| १ | पलायनप्रवृत्ति, [ अथवा संकटापासून दूर होण्याची प्रवृत्ति ] | १ भीति, |
| २ | जुगुप्सा, [ घाणेरड्या अथवा कुरूप वस्तूपासून किंवा प्राण्यापासून दूर होण्याची प्रवृत्ति. ] | २ तिटकारा. |
| ३ | युद्धप्रवृत्ति. | ३ राग, |
| ४ | स्वताच्या गुणांचें, रूपाचें अगर वैभवाचें प्रदर्शन करण्याची प्रवृत्ति | ४ डौल. |

| | |
|---|---|
| ५ लीन होण्याची प्रवृत्ति | ५ विनय |
| ६ जिज्ञासा अथवा नवीन गोष्ट जाणण्याची प्रवृत्ति. | ६ कुतूहल. |
| ७ वात्सल्यप्रवृत्ति. | ७ कोमल भावना |

पलायनवृत्ति, जिज्ञासा व वात्सल्यप्रवृत्ति यांजसंबंधानें या लेखांत व यापूर्वीच्या लेखांत अनेक वेळां उल्लेख आला आहेच. कृतिप्रेम, स्तुतिप्रियता, समाजप्रियता व स्पर्धा या सहजप्रवृत्ति फार महत्त्वाच्या आहेत. कांहीं मानसशास्त्रवेत्ते या प्रवृत्तींना मुख्य प्रवृत्ति मानतात व अशा प्रकारें मुख्य सहजप्रवृत्तींची संख्या सात न मानतां जास्त मानतात. कांहीं मानसशास्त्रवेत्ते 'या चार सहजप्रवृत्ति वर दिलेल्या ७ मुख्य सहजप्रवृत्तींत येतात व त्यांना स्वतंत्र मानण्याची जरूर नाहीं,' असें प्रतिपादन करितात. या सहजप्रवृत्ति स्वतंत्र मानल्या किंवा न मानल्या, तरी मुलाच्या मानसिक व शारीरिक विकासाचे कामीं त्यांचा फार उपयोग आहे, ही गोष्ट पालक व शिक्षक यांनीं लक्षांत ठेविली पाहिजे. संपादन व संचय करण्याची माणसांतील सहजप्रवृत्ति ही देखील महत्त्वाची आहे. बालपणांत देखील ही प्रवृत्ति कार्य करीत असते व मुलाच्या शिक्षणाचे कामीं तिचें बरेंच साहाय्य होतें. यांशिवाय दुसऱ्याही अनेक सहजप्रवृत्ति माणसांत असतात.

कांहीं सहजप्रवृत्ति, उदाहरणार्थ, संकटापासून दूर होण्याची प्रवृत्ति, युद्धप्रवृत्ति या सर्व प्राण्यांत असतात. पण कांहीं प्रवृत्ति एखाद्या विशिष्ट वर्गांतच आढळतात. घरटें बांधण्याची प्रवृत्ति फक्त पक्ष्यांतच दिसून येते. पोळें बांधण्याची प्रवृत्ति फक्त मधमाशांतच दिसून येते. प्राण्यांतील सर्व सहजप्रवृत्ति त्याच्या जन्माबरोबर कार्य करीत नाहींत. ज्या त्या प्रवृत्तीचा योग्य काळ असतो व त्या वेळीं ती काम करूं लागते.

प्राण्यांच्या सहज प्रवृत्तीच्या कार्यांत अनुभवानें थोडासा फरक पडतो. उंदीर पकडण्याकरितां पिंजरा लावून त्यांत खमंग भर्जी ठेविलीं, तर कांहीं दिवस उंदीर त्या पिंजऱ्यांत सांपडतात, पण मग बाकीचे उंदीर अनुभवानें सावध होतात व त्यांची पलायनप्रवृत्ति जागृत होऊन त्या संकटापासून ते दूर जातात. मग त्या पिंजऱ्यांत क्वचितच एखादा उंदीर सांपडतो. एखाद्या माणसानें एखाद्या कुत्र्याला खूप मारलें, तर मग तो कुत्रा त्या माणसानें भाकरी जरी पुढें

केली, तरी तो ती घेण्यास पुढें येत नाहीं. वानर, घोडा, हत्ती वगैरे बुद्धिवान् प्राण्यांच्या सहजप्रवृत्तींच्या कार्यांत अनुभवानें व ज्ञानानें पुष्कळच फरक पडतो. मनुष्यप्राण्यांच्या सहजप्रवृत्तींच्या कार्यांत ज्ञानानें व अनुभवानें जो फरक पडतो तो इतर प्राण्यांच्या मानानें फारच मोठा असतो. दोन वर्षांच्या मुलानें ताटांत पेढे पाहिल्यास ताबडतोब तें ताटांत हात घालील व एक दोन पेढे तोंडांत टाकील, पण ९ वर्षांचा मुलगा आईला विचारील, मग त्या पेढ्यांतील आपल्या वांट्याचा एकच पेढा तोंडांत टाकील. मुलें लहान असतात तोंपर्यंत त्यांच्या सहजप्रवृत्ति इतर प्राण्यांच्या सहजप्रवृत्तींप्रमाणेंच काम करीत असतात, पण मुलें मोठीं झाल्यावर शिक्षणानें, अनुभवानें व ज्ञानानें त्यांच्या सहज-प्रवृत्तींच्या कार्यांत फार फरक पडतो. कुत्र्याच्या पुढ्यांतील खाण्याचा पदार्थ काढून घेतला, तर कुत्रा ज्यानें पदार्थ ओढला त्या माणसाच्या अंगावर गुर-गुरेल व त्याला चावण्यास धावेल. आपणाला जो कोणी त्रास देईल त्याच्या अंगावर गुरगुरावें व त्याला चावण्यास धांवावें ही वागण्याची रीत कुत्र्याच्या सर्व आयुष्यांत कधींही बदलणार नाहीं. कुत्र्यास राग येण्याचीं कारणें जीं थोडीं ठराविक आहेत त्यांजपेक्षां इतर कोणत्याही कारणानें त्याला राग येणार नाहीं. ५ वर्षांच्या मुलाच्या हातांतील पेढा काढून घेतला, तर तो रागावेल व पेढा घेणाराला चावेल किंवा जवळची वस्तु त्याच्या अंगावर फेकून मारील. दहा वर्षांच्या गणूला वर्ग चालला असतां एखाद्या सोबत्यानें त्रास दिला, तर तो त्याला चावणार नाहीं, पण ती गोष्ट तो शिक्षकाला सांगेल व शिक्षक त्या खोडकर मुलाला शिक्षा करील. रानटी लोक व सुधारलेले लोक यांच्या सहजप्रवृत्तींच्या कार्यांत शिक्षणामुळेंच फार मोठा फरक दिसतो. रानटी समाजांत **अ** **ब**ला एखादा अपमानकारक शब्द बोलला, तर **ब** आपलें हत्यार उपसून धावेल. पण सुधारलेल्या देशांत **अ** हा जर **ब**ला लागेल असें बोलला, तर **ब** त्याजविरुद्ध फिर्याद करील, किंवा **अ**ची फजीति करण्याकरितां वर्तमान-पत्रांत कांहीं लेख लिहील किंवा **अ**वर सामाजिक बहिष्कार घालण्याचा प्रयत्न करील.

पशुपक्ष्यांतील मादी अगदीं ठराविक पद्धतीनें लहान बालकाचें पोषण व रक्षण करिते. रानटी समाजांतील आई आपल्या मुलाचें पालनपोषण करि-तांना परिस्थितीप्रमाणें अनेक बदल करिते, सुधारलेल्या समाजांतील आई

आपल्या मुलाचें आरोग्य राखण्याकरितां अनेक उपाय योजते; जरूर तेथें ती डॉक्टरचा सल्ला घेते. मुलाच्या नैतिक शिक्षणाकरितां व बौद्धिक शिक्षणाकरितां ती फार झटते. एकच सहजप्रवृत्ति जरी सर्व आयांमध्यें असते. तरी तिच्या कार्यांत फरक दिसून येतो. पशुपक्ष्यांतील सहजप्रवृत्तीच्या कार्यांस दीर्घकालांतही फरक पडत नाहीं. शिक्षण, अनुभव व ज्ञान यांच्यायोगानें मनुष्याच्या सहजप्रवृत्तींच्या कार्यांत फार फरक पडतो.

मनुष्याची कोणतीही सहजप्रवृत्ति दाबून टाकणें शक्य नाहीं व तें इष्टही नाहीं. मुलांतील युद्धप्रवृत्ति व राग हीं नाहींशीं करण्याचा यत्न केला, तर त्या योगानें पुढील आयुष्यांत त्या मुलाचें फार नुकसान होतें. हीच गोष्ट इतर सहजप्रवृत्तीच्या बाबतींतही दिसून येते. याजकरितां मुलाची कोणतीही सहजप्रवृत्ति दाबून न टाकितां तिला इष्ट तें वळण पालकांनीं व शिक्षकांनीं दिलें पाहिजे.

पलायनप्रवृत्ति, युद्धप्रवृत्ति, संपादनप्रवृत्ति वगैरे सहजप्रवृत्ति स्वार्थी असतात. स्वतःच्या गुणांचें किंवा वस्तूंचें प्रदर्शन करण्याची प्रवृत्ति, लीन होण्याची प्रवृत्ति या सामाजिक असतात. कारण भोंवतीं थोडाबहुत समाज असल्याशिवाय या प्रवृत्तीचें कार्य होणें शक्य नाहीं. वात्सल्यप्रवृत्ति ही सर्व श्रेष्ठ मनोप्रवृत्तींची जननी आहे. या प्रवृत्तीच्या योगानें दुसऱ्याविषयीं अनुकंपा वाटून मनुष्य त्याला स्वतः स्वार्थत्याग करून मदत करण्यास तयार होतो. मनुष्याच्या सहजप्रवृत्तीमुळें मनुष्याच्या मनोवृत्ति बनतात. मनुष्याच्या मनोवृत्तींवर त्याचें शील अवलंबून असतें म्हणून सहजप्रवृत्तींना नीट वळण लागलें कीं मनुष्याचें शील तयार होतें.

पशुपक्ष्यांना सहजप्रवृत्ति आहेत, त्याचप्रमाणें मनुष्यालाही सहजवृत्ति आहेत. पशुपक्ष्यांचें आचरण सहजप्रवृत्तींवर अवलंबून असतें, त्याचप्रमाणें मनुष्याचें आचरणही सहजप्रवृत्तींवर अवलंबून असतें. सहजप्रवृत्तींपैकीं बहुतेक सहजप्रवृत्ति स्वार्थीच आहेत. असें जर आहे, तर मग मनुष्य प्राण्यांचें महत्त्व कोठें राहिलें असा प्रश्न सहज उत्पन्न होतो. शिक्षणानें, ज्ञानानें व अनुभवानें मनुष्याच्या सहजप्रवृत्तींना इष्ट तें वळण देतां येतें. ही गोष्ट इतर प्राण्यांत फारशी शक्य नसते. मनुष्याच्या अंगीं असणाऱ्या स्तुतिप्रियता, लीन होण्याची प्रवृति, संपाद-

प्रवृत्ति वगैरे प्रवृत्तींना शिक्षणानें इष्ट तें वळण देऊन त्यायोगें व्यक्तींचें व समाजाचेंही अनेक प्रकारें हित साधतां येतें. वात्सल्यप्रवृत्तीच्या प्रेरणेमुळें मनुष्य स्वतांचा स्वार्थ विसरून अनेक परोपकाराचीं कृत्यें करतो. सारांश, सहजप्रवृत्ति ही एक प्रचंड शक्ति आहे. त्या शक्तीला योग्य दिशेनें काम करण्यास लाविलें, तर व्यक्तीचें व समाजाचेंहि अनेक प्रकारें हित साधतां येतें. मुलांच्या सहज-प्रवृत्तींना इष्ट तें वळण देणें हेंच खरें शिक्षण होय. हें शिक्षण देण्यांतच पाल-कांची व शिक्षकांची खरी कुशलता दिसून येते.

आपण दोन उदाहरणें घेऊन ही गोष्ट स्पष्ट करूं. मधुकर हा मराठी चौथ्या इयत्तेंत शिकत होता. त्याची शरीरप्रकृतीही चांगली असे व बुद्धीही तरतरित असे. यामुळें तो फार गर्विष्ठ झाला होता. त्याच्या वागणुकीमुळें वर्गाला त्रास होत असे. या मुलाला शिक्षकानें वर्गनियंता ( सेक्रेटरी ) नेमिलें व वर्गाची बरीच व्यवस्था त्याजकडेस सोंपविली. आपला वर्ग शिस्तीच्या व स्वच्छतेच्या बाबतींत इतर वर्गा-पेक्षां चांगला दिसला पाहिजे असें शिक्षकानें मधुकरला बजाविलें. मधुकराचें लक्ष आतां स्वतांवरून उडालें व वर्गाकडे लागलें. वर्ग स्वच्छ राखण्याकरितां तो फार झटूं लागला. कागदाचा कचरा कोठेंही वर्गांत आढळला, तर तो लागलींच तो उचलून केराच्या करंडींत नेऊन टाकीत असे. वर्गाचीं कामें करतांना त्याला सोबत्यांच्या मदतीची जरूर भासूं लागली. त्यामुळें तो त्यांच्यांत मिळून मिसळून वागूं लागला. सर्व मुलांच्या मदतीनें त्यानें वर्गा-करितां सुंदर चित्रें गोळा करण्याचें ठरविलें. प्रत्येक मुलानें आपल्या घरून एक दोन चित्रें आणलीं. तीं सर्वांनीं मिळून एका वहींत चिकटविलीं. सर्व मुलांनीं मिळून वर्गाकरितां कांहीं तक्तेही तयार केलें. खेळाच्या सामन्यांत भाग घेण्याकरितां या वर्गानें चांगली तयारी केली व दसऱ्याच्या खेळांत सर्व शाळेंत या वर्गाचा पहिला नंबर आला. मधुकराला व त्याच्या सोबत्यांना त्या दिवशीं कितीतरी आनंद झाला. अशा रीतीनें स्वतांचा डौल दाखविण्याऐवजीं आपल्या वर्गाचा डौल दाखवावा असें मधुकराला वाटूं लागलें आणि त्या योगानें त्याचाही फायदा झाला व वर्गाचाही फायदा झाला. अशा प्रकारें मधुकराच्या प्रवृत्तीला इष्ट तें वळण मिळालें.

गणूला वाटेल ती घरांतील वस्तु घेऊन पाहण्याची, तिची मोड तोड करण्याची व ती फेकून देण्याची वाईट खोड लागली. अशाप्रकारें त्याच्या

जिज्ञासा व कृतिप्रेम या सहज प्रवृत्तींना अनिष्ट वळण लागलें. त्याच्या योगानें त्याच्या घरच्या मंडळीला फार त्रास होऊं लागला. त्याच्या बापानें त्याला घर, पूल, बंगला वगैरे बांधण्याकरितां लाकडाचें लहान घन व पट्ट्या आणून दिल्या. बाग करण्याकरितां बापानें गणूला एक लहान जमिनीचा तुकडा दिला व खणण्याकरितां एक लहानशी कुदळ व पाणी घालण्याकरितां झारी दिली. बापानें मांजर, कुत्रा, घोडा वगैरे चित्रें विकत घेतली व तीं गणूला दिलीं व घरीं पांढरी चिकण माती आणून गणूला तशीं चित्रें करण्यास सांगितलें. गणू या सर्व व्यवसायांत गढून गेला व त्याला व्यवस्थितपणें वागण्याची व हातानें काम करण्याची संवय लागली. मुलाच्या प्रवृत्तीला अनिष्ट वळण लागल्यास ती प्रवृत्ति इष्ट मार्गाकडे लावण्याला पालकाच्या आंगीं चातुर्य लागतें.

सहजप्रवृत्तींसंबंधानें महत्त्वाच्या गोष्टी थोडक्यांत सांगून हा भाग पुरा करूं.

१ सहजप्रवृत्ति या जन्मसिद्ध असतात. त्या परिस्थितीनें, शिक्षणानें अथवा अनुभवानें मनुष्यास प्राप्त होत नाहींत.

२ सर्व सहजप्रवृत्तींचा उदय किंवा विकास एकाच काळीं होत नाहीं. कांहीं सहजप्रवृत्ति बालपणीं विशेष दिसून येतात. कांहींचा उदय व विकास तरुणपणीं होतो.

३ प्रत्येक मनुष्यांत सर्व सहजप्रवृत्ति असतात. एखाद्या माणसांत शारीरिक अगर मानसिक दोष अथवा दुर्बलता असेल, तर एखादी सहजप्रवृत्ति त्याच्या आंगीं नसण्याचा किंवा ती दुर्बल असण्याचा संभव असतो.

४ एखाद्या माणसाची एखादी सहजप्रवृत्ति फार जोरदार असते व दुसऱ्याची हीच सहजप्रवृत्ति फार दुर्बल असते. मनुष्याची शरीरप्रकृति बळकट असली व त्याच्या एखाद्या सहजप्रवृत्तीला व्यवसाय मिळाला म्हणजे ती जोरदार होते. उलटपक्षीं मनुष्याची शरीरप्रकृति दुर्बल असली किंवा त्याच्या एखाद्या सहजप्रवृत्तीला व्यवसायच मिळाला नाहीं, तर ती दुर्बळ होण्याचा संभव असतो.

५ मनुष्याच्या प्रत्येक सहजप्रवृत्तीचा हेतु त्याचें पालन, पोषण अथवा वंशवर्धन व्हावें असाच असतो, प्रत्येक प्रवृत्तीला उच्च प्रकारचें वळण देऊन तिच्याकडून उत्कृष्ट कार्य करून घेतां येतें.

६ मनुष्याचें शील व आचरण हीं बहुतांशीं त्याच्या सहजप्रवृत्तींवर अवलंबून असतात.

७ कोणतीही सहजप्रवृत्ति नाहींशी करणें शक्य नाहीं किंवा ती दाबून टाकणें इष्ट नाहीं.

८ मुलांच्या स्वार्थी सहजप्रवृत्तींना वळण लावून व त्यांच्या सामाजिक सहजप्रवृत्ति स्तुतिप्रियता, समाजप्रियता यांचें व वत्सलतेचें साहाय्य घेऊन शिक्षकांना व पालकांना मुलांच्या मनांत परोपकार, स्वाभिमान, सत्यप्रेम, अन्यायाचा राग इत्यादि उत्कृष्ट मनोवृत्तींचें बीजारोपण करून त्यांचा विकास करितां येईल.

पुढील भागांत मुलांच्या कांहीं मुख्य सहजप्रवृत्तींना इष्ट तें वळण कसें लावतां येईल, हें पाहूं.

## भाग १३ वा

## मुलांच्या सहजप्रवृत्तींचें शिक्षण

मागील भागांत सहजप्रवृत्तींचें स्वरूप, त्यांचें महत्त्व व कार्य यांजबद्दल विवेचन केलें. या भागांत मुलांच्या कांहीं सहजप्रवृत्तींना इष्ट तें वळण कसें लावतां येईल हें पाहूं. पहिल्यानें आपण पलायन-प्रवृत्तीचा विचार करूं. अपायकारक गोष्टींपासून प्राण्याचें संरक्षण व्हावें हा या सहजप्रवृत्तीचा हेतु आहे. या प्रवृत्तींत भीति हा मनोविकार असतो. अपायकारक गोष्ट प्राणी पाहतो, त्याच्या मनांत भीति हा मनोविकार उत्पन्न होतो. मग तो अपायकारक गोष्टीपासून दूर जातो. बैल रानांत चरत असतो. त्याला वाघाचा वास येतो. भीति हा मनोविकार त्याच्या मनांत उत्पन्न होतो व तो लागलीच गांवाकडे पळत जातो. मांजर रस्त्यांतून चाललें असतां त्याला समोरून येणारा मोठा कुत्रा दिसतो. त्या मांजराच्या मनांत त्या कुत्र्याबद्दल भीति उत्पन्न होते, मग तें लागलींच शेजारच्या उंच झाडावर चढतें. एका खोडकर मुलानें एका लहान कुत्र्याला काठी मारली होती. तेव्हांपासून त्या मुलाला पाहिल्याबरोबर त्या कुत्र्याला त्याची भीति वाटे व तें त्या मुलापासून दूर पळून जाई. वरील उदाहरणांवरून पलायनप्रवृत्तीचें कार्य कसें होतें याची कल्पना येईल.

साधारणपणें मूल एक वर्षाचें होईपर्यंत त्यांत या प्रवृत्तीचें कार्य दृष्टीस पडत नाहीं. एक वर्षाचें मूल झालें कीं, त्यांत ही प्रवृत्ति दृष्टीस पडूं लागते. एखादा अपरिचित प्राणी, भेसूर दिसणारा पदार्थ अगर मनुष्य पाहिला कीं मुलाला भीति वाटते व घाबरून तें वडील माणसाकडे जातें व त्याचा आश्रय घेतें. लहान मुलाला सर्व जग नवीन असतें व त्याचें ज्ञान त्याला फारच थोडें असतें. यामुळें त्याला अपाय होण्याचा फार संभव असतो. या अपायकारक गोष्टीपासून या प्रवृत्तीमुळें लहान मुलांचें रक्षण होतें. जें कांहीं अपरिचित, चमत्कारिक व भेसूर दिसतें त्याची मुलांना भीति वाटते. कित्येक मुलें पाळीव गाईला किंवा कुत्र्याला देखील हात लावण्यास थरकांप भितात.

भीति हा मनोविकार जोरदार असला कीं मनुष्याला त्याच्यापासून फार त्रास होतो. भीतीनें हृदयाची क्रिया फार जोरानें चालूं लागते. श्वासोच्छ्वास नीट चालेनासा होतो. सर्व इंद्रियांची शक्ति कमी होते. चेहरा निस्तेज होतो. मूल जसजसें मोठें होईल, तसतसा त्याचा भीति हा मनोविकार कमी होत गेला पाहिजे. विनाकारण एखाद्या गोष्टीची भीति त्याला वाटतां कामा नये. भित्रेपणा हा दुर्गुण आहे. तो मुलांतून घालविण्याचा शिक्षकानें व पालकानें प्रयत्न करावा. खरोखरी अपायकारक गोष्टींपासून मुलांनीं दूर राहिलेंच पाहिजे, पण अशा वेळीं देखील त्यांनीं अगदीं घाबरून जातां कामा नये. भीति हा मनोविकार फारच प्रबळ झाला, तर मनुष्याच्या इंद्रियांतील सर्व शक्ति नष्ट होते व त्याच्या हातून संकटापासून दूर होण्याची क्रियाच होत नाहीं.

तिसऱ्या वर्षापासून मुलाला बरेंच कळूं लागतें व त्याच्या कल्पनाशक्तीचें कार्य सुरू होतें. या वेळेपासून मुलांतील भीति जास्त वाढूं लागते. जो मनुष्य अगर जो प्राणी प्रत्यक्ष दिसतो त्याजपेक्षां कल्पनेनें काढलेल्या मनुष्याची अगर जनावराची मुलांना फार भीति वाटते. यामुळेंच मुलें अंधारांत जाण्यास फार भितात. या काल्पनिक भीतीमुळें मुलांना फार त्रास होतो. मुलांना जी भीति वाटते तिजबद्दल वडील माणसें त्यांची टर उडवितात. यामुळें भीतीपासून होत असलेला त्रास तीं मुकाट्यानें सोसतात. वडील माणसांनीं मुलांशीं प्रेमानें वागावें व त्यांची भीति दूर करण्याचा यत्न करावा. अंधाराची भीति जर मुलाला वाटत असेल, तर दिवा न्यावा व तेथें भिण्याजोगें कांहीं नाहीं अशी मुलाची खात्री करावी. लहान मुलांना बुवाची भीति घालण्याची चाल फार

वाईट आहे. लहान मूल आपल्या कल्पनाशक्तीनें बुवाचें भेसूर चित्र काढतें व अंधारांत जेथें तेथें त्याला हा बुवा दिसूं लागतो. या बुवाच्या भीतीनें कित्येक वेळां मुलें आजारीहि पडतात. त्यांच्या आंगीं भित्रेपणाचा दुर्गुण जडतो व या भीतीचा त्यांच्या प्रकृतीवरहि परिणाम घडतो. ज्या ज्या गोष्टीची मुलांना विनाकारण भीति वाटत असेल ती ती गोष्ट प्रत्यक्ष दाखवून शिक्षकानें व पालकानें मुलांची भीति दूर करावी. मुलांना बुवाची भीति घालण्यापेक्षां शारीरिक शिक्षेची भीति घालणें जास्त चांगलें.

मुलांची काल्पनिक भीति घालविण्यास पालकाला पुष्कळ वेळां फार त्रास पडतो. तथापि प्रेमानें व शहाणपणानें उपाय योजना केल्याशिवाय मुलांची भीति कमी होत नाहीं. गणू सात वर्षांचा होता. एकदां त्याला त्याच्या सोबत्यानें त्यांच्या घराच्या जवळील झाडावर भूत आहे व तें झाडाखालीं उतरतें व मुलांना भिववितें असें सांगितलें. त्या दिवसापासून गणू अंधारांत जाण्यास भिऊं लागला. तो आपल्या खोलींत एकटाच निजत असे. त्या खोलींत एकटें निजण्याला त्याला भीति वाटूं लागली. तो तोंडावर पांघरूण घेऊन निजे व भीतीनें घामाघूम होत असे. त्याच्या आईनें हें सर्व पाहिलें व त्याजपासून सर्व हकीगत तिनें काढून घेतली. त्या झाडावर भूत वगैरे कांहीं नाहीं असें तिनें त्यास सांगितलें; तथापि गणूची भीति जाईना. मग तिनें गणूला रामरक्षेंतील कांहीं श्लोक शिकविले व निजते वेळीं ते म्हणण्यास सांगितलें. दत्ताची तसबीर त्याच्या खोलींत आणून ठेविली. यानंतर गणूला भुताची भीति वाटेनाशी झाली. सारांश, मुलाची भीति दूर करण्याचें काम प्रेमानें, सहानुभूतीनें व चातुर्यानें केलें, तरच त्यांत यश येतें.

मनुष्य हा अत्यंत बुद्धिमान प्राणी आहे. त्याला आपल्या आयुष्यांत अनेक प्रकारचीं कर्तव्यें करावयाचीं असतात. त्याला कुटुंबांत, समाजांत व राष्ट्रांत वागावयाचें असतें. या सर्वांच्या सौख्यावर त्याचें सौख्य अवलंबून असतें. म्हणूनच बालपणापासून त्याच्या भीतीला निराळें वळण लावावें लागतें. लहान मुलाच्या भोंवतालचें वातावरण प्रेमाचें असलें पाहिजे व घरीं चांगली शिस्त असली पाहिजे. आईबापांच्याबद्दल मुलांच्या मनांत प्रेम असलें म्हणजे त्यांना राग येईल व वाईट वाटेल या भीतीनें मुलें अयोग्य कृति करीत नाहींत.

जेवावयाचें ताट वाढलें व त्यांत लाडू असला, तरी सर्व मंडळी जेवावयास बसल्याशिवाय मूल लाडूला हात लावीत नाहीं. तसें केलें, तर आई आपणावर रागावेल व आपणाला लाडू मिळणार नाहीं अशी भीति त्याला वाटते. शाळेंतही शिक्षक प्रेमळ असेल व शाळेंतील शिस्त जर चांगली असेल, तर शिक्षकाला राग येईल या भीतीनें कोणतेंही अयोग्य कृत्य तें करीत नाहीं. अशा प्रकारें चांगलें वागण्याची मुलाला संवय लागते. वयाच्या वाढीबरोबर मुलाच्या ज्ञानांतहि भर पडत असते व त्याची विचारशक्ति वाढत असते. यामुळें हळू हळू चांगलें कोणतें, वाईट कोणतें, योग्य कोणतें, अयोग्य कोणतें याचें स्पष्ट ज्ञान मुलाला होऊं लागतें. वयाच्या बरोबर त्याचा स्वाभिमानहि वाढत जातो. आपण एखादी वाईट कृति केली, तर आपले आईबाप व शिक्षक यांना आपला राग येईल व सोबत्यांतहि आपली फजीती होईल, अशी भीति मुलांना वाटूं लागते. आणखी कांहीं वर्षें गेलीं कीं मूल बरेंच मोठें होतें. त्याची विचारशक्ति बरीच वाढते, त्याची सदसद्विचारशक्तीहि काम करूं लागते, त्याच्या नैतिक मनोवृत्ती जोरदार बनतात, त्याचा स्वाभिमान वाढतो, व परमेश्वराबद्दल भक्ति त्याच्या मनांत दृढ होते. मग वाईट कृत्यामुळें होणारी सामाजिक मानहानीं, त्यामुळें मनाला लागणारी टोंचणी, ईश्वराचा आपणावर होणारा राग, या सर्वांची भीति त्याला वाटूं लागते. अशा प्रकारें सुशील आईबाप व शिक्षक यांच्या हाताखालीं मुलाच्या भीतीला योग्य वळण लागतें.

मुलानें यत्किंचित् वाईट कृति केली कीं, त्याला यथेच्छ बडवावें व अशा प्रकारें शिक्षेच्या धाकानें मुलाला योग्य कृति करण्यास लावावें व अयोग्य कृतीपासून दूर ठेवावें अशी पुष्कळ पालकांची व शिक्षकांची वृत्ति असते. आमची शिस्त फार कडक आहे, आमचीं मुलें आम्हांला भिऊन अगदीं शिस्तीनें वागतात, असें हे लोक मोठ्या अभिमानानें दुसऱ्यास सांगत असतात. माराच्या किंवा शिक्षेच्या भीतीनें मुलें जी कृति करतात तिजबद्दल त्यांना कधींच गोडी वाटत नाहीं, उलट तिजबद्दल त्यांच्या मनांत अतिशय तिटकारा उत्पन्न होतो. यामुळें शिक्षेची भीति नाहींशी होतांच मुलें ती कृति करण्याचें ताबडतोब सोडून देतात. अशा प्रकारें शिक्षेच्या भीतीनें होणारें मुलाचें हें वर्तन परिणामीं हितकर नसतें. जुलमानें कडक शिस्त ठेवणाऱ्या व मार देणाऱ्या शिक्षकाबद्दल किंवा पालकाबद्दल मुलाच्या मनांत प्रेम कधींच राहत नाहीं. अपराध केला

असतां पालकाच्या अगर शिक्षकाच्या शिक्षेच्या भीतीनें तो लपविण्याचा मुलें प्रयत्न करितात. यामुळें त्यांना खोटें बोलण्याची व ढोंग करण्याची खोड लागते. प्रेमळ आईबापांच्या व शिक्षकाच्या संगतींत मुलांना अपराध छपविण्याचा मोहच होत नाहीं, कारण आईबापांना किंवा शिक्षकाला खरी हकीकत सांगितली, तर आपणास शिक्षा होणार नाहीं अशी त्यांची खात्री असते. यामुळें मोकळ्या मनानें तीं आपला अपराध कबूल करतात. प्रेमळ आईबापांनीं किंवा शिक्षकानें थोडीशी शिक्षा केली, तर तिचा परिणाम अतिशय हितकर व खात्रीचा होतो. मुलांच्या पलायनप्रवृत्तीसंबंधानें शिक्षकानें व पालकांनीं पुढील गोष्टी लक्षांत ठेवाव्या.

१ मुलांच्या ज्ञानांत भर घालावी व त्यांना निष्कारण वाटणारी भीति दूर करावी. २ मुलांना धैर्य धरण्यास व संकटांना तोंड देण्यास शिकवावें. ३ मुलांची विचारशक्ति वाढण्यास मदत करावी, मुलांच्या नैतिक मनोवृत्ति दृढ करण्याचा प्रयत्न करावा व मुलांचा स्वाभिमान जागृत करावा.

२ **जुगुप्सा** [ किळस अथवा तिटकारा वाटणाऱ्या पदार्थापासून दूर होण्याची प्रवृत्ति ]—ही प्रवृत्ति देखील प्राण्याच्या संरक्षणास उपयोगी पडते. जे पदार्थ कुजलेले आहेत किंवा घाणेरडे अथवा ओंगळ आहेत त्यांजपासून या प्रवृत्तीच्या प्रेरणेमुळें मनुष्य दूर सरतो; त्यामुळें त्याचे आरोग्यास अपाय होत नाहीं. त्याचप्रमाणें झुरळ, विंचू, घाणेरडे किडे यांजपासून मनुष्य दूर राहातो. अगदीं लहानपणीं मुलांत ही प्रवृत्ति नसते. दोन वर्षांचीं मुलें झालीं म्हणजे त्यांना हळूहळू घाणेरड्या पदार्थांचें ज्ञान होऊं लागतें व मग त्यात ही प्रवृत्ति दिसूं लागते. मुलाच्या या प्रवृत्तीला देखील त्यांच्या लहानपणापासून आईबापांना व पुढें शिक्षकाला इष्ट वळण लावावें लागतें. मुलांच्या मनांत अव्यवस्थितपणा व घाणेरडेपणा यांजबद्दलही तिटकारा उत्पन्न झाला पाहिजे. गृह व शाळा हीं सुव्यवस्थित व स्वच्छ असलीं आणि आईबाप व शिक्षक यांनीं स्वच्छतेची व सुव्यवस्थेची आवड मुलांच्या मनांत उत्पन्न केली कीं, त्यांना अव्यवस्थेचा व अस्वच्छतेचा तिटकारा वाटूं लागतो. मुलांच्या मनांत असत्य, भित्रेपणा, अप्रामाणिकपणा, दुष्टपणा इत्यादि दुर्गुणांबद्दलही शिक्षकानें व आईबापांनीं तिटकारा उत्पन्न केला पाहिजे. वडिलांच्या उपदेशापेक्षां आचरणाचा परिणाम या बाबतींत फार होतो. घाणेरड्या व कुजलेल्या पदार्थापासून जसें मूल दूर होतें त्याच-

प्रमाणें दुर्गुणापासूनही तें दूर झालें पाहिजे. याजकरितां पालकांनीं व शिक्षकानें मुलांना चांगलें नैतिक शिक्षण दिलें पाहिजे. स्वतःचें उत्तम आचरण, घरांतील व शाळेंतील उत्कृष्ट शिस्त, थोर पुरुषांच्या गोष्टी, महाभारत, रामायण वगैरे प्राचीन ग्रंथांतील थोर पुरुषांच्या व स्त्रियांच्या कथा, व्यवस्थित खेळ वगैरे अनेक साधनांचा नैतिक शिक्षणाच्या कामीं उपयोग करितां येईल. थोर पुरुषांच्या गोष्टी ऐकल्यानें मुलांच्या मनांत स्वार्थत्याग, शौर्य, परोपकार, समाजसेवा इत्यादि सद्गुणांची आवड उत्पन्न होते व दुर्गुणांचा तिटकारा उत्पन्न होतो. घाण पदार्थांबद्दल मनुष्याला जसा तिटकारा वाटतो तसाच त्याला वाईट आचरण व विचार यांजबद्दल वाटला म्हणजे त्याच्या जुगुप्सा या प्रवृत्तीला अत्यंत इष्ट असें वळण लागलें असें समजावें.

**जिज्ञासा**—नवीन ज्ञान मिळविण्याची इच्छा. ही सहज प्रवृत्ति संरक्षणाकरितांच परमेश्वरानें प्राण्याला दिलेली आहे. भोंवतालच्या कोणत्या पदार्थापासून अगर प्राण्यापासून आपणास अपाय होईल याचें प्राण्याला ज्ञान व्हावें व त्यानें त्या पदार्थापासून अगर प्राण्यापासून दूर राहावें हा या सहजप्रवृत्तीचा मूळ हेतु आहे. प्राण्याच्या आयुष्यक्रमांतील परिस्थिति बदलण्याचा संभव जितका जास्त तितकी त्याच्यांत असलेली जिज्ञासा अधिक जोरदार असते. यामुळेंच इतर प्राण्यांपेक्षां हत्ती, घोडा, वानर या प्राण्यांतील जिज्ञासा अधिक जोरदार असते मनुष्यप्राण्याला बहुविध कर्तव्यें करावयाचीं असतात. त्याच्या परिस्थितींत नेहमीं बदल होत असतो. यामुळेंच मनुष्य प्राण्याची जिज्ञासा इतर सर्व प्राण्यांपेक्षां जास्त तीव्र असते. या जिज्ञासेमुळेंच मनुष्यप्राण्यानें आपल्या सभोंवतालच्या सृष्टीचें काळजीपूर्वक निरीक्षण करून ज्ञान मिळविलें, आपली सुधारणा करून घेतली व आपल्या सुखांत भर घातली. अनेक यंत्रांचे शोध, अनेक रोगांवरील उपाय, अनेक सुखसाधनें हीं सर्व या जिज्ञासेमुळेंच मनुष्य समाजास लाभलीं आहेत. मनुष्याची ही सहजप्रवृत्ति अगदीं बालपणींच जागृत होते व तेव्हांपासून ती कार्य करूं लागते. तारुण्यांत व प्रौढावस्थेंतही ती जोरानें कार्य करीत असते. वृद्धपणीं पुष्कळ जणांची ही सहजप्रवृत्ति दुर्बळ होते तथापि ती नष्ट होत नाहीं. तत्त्ववेत्ते, शास्त्रज्ञ कारागीर वगैरे कांहीं लोकांत ही सहज प्रवृत्ति त्यांच्या वृद्धपणींही जोरदार असते.

जिज्ञासा या सहजप्रवृत्तीचा अगदीं लहानपणीं उदय कसा होतो व या

प्रवृत्तीच्या योगानें त्याच्या ज्ञानांत व अनुभवांत भर कशी पडते याचें थोडेंसें विवेचन दुसऱ्या व तिसऱ्या लेखांत केलेंच आहे. मुलाला सर्व सृष्टि नवीन असते व त्याच्या भोवती जे अनेक व्यवहार चाललेले असतात त्यांचेंही त्याला ज्ञान नसतें. या सर्वांचें ज्ञान त्याला हळूहळू मिळवावयाचें असतें. मूल हें ज्ञान जिज्ञासेच्या प्रेरणेनें मिळवितें. जिज्ञासा या सहजप्रवृत्तींत कुतूहल हा मनोविकार असतो. जो जो नवीन पदार्थ दिसतो त्याजबद्दल मुलाला कुतूहल वाटतें. मग मूल तो पदार्थ हातांत घेतें, तो निरखून पहातें, तो आपटतें, त्याची चव घेतें. अशा प्रकारें तें पदार्थाचा रंग, आकार, आवाज व चव यांचें ज्ञान ज्ञानेंद्रियांच्या साहाय्यानें मिळवितें. मुलें चालूं लागलीं कीं, त्यांची जिज्ञासा घरांतील मंडळीला फार तापदायक होऊं लागते. 'बाबांचा चष्मा घे, तो डोळ्याला लाव,' 'ताईची कातर घेऊन वाटेल तें कातर,' 'दादाचें पुस्तक काढून त्यांतील चित्रें पहा,' असा त्यांचा सारखा उद्योग चाललेला असतो. मधून मधून, न समजणाऱ्या गोष्टींबद्दल तीं वडील माणसांना प्रश्नही विचारीत असतात. मुलें पांच सहा वर्षांचीं होईतोंपर्यंत त्यांचा हा क्रम चाललेला असतो. मग त्यांच्या जिज्ञासेला जरा व्यवस्थित स्वरूप येतें. दुसरा मुलगा कसा खेळतो हें लक्षपूर्वक पहावयाचें व तो खेळ समजावून घ्यावयाचा, दुसरा मुलगा नाव कशी करतो हें लक्षपूर्वक पहावयाचें व मग आपणही तशीच नाव करण्याचा प्रयत्न करावयाचा; किडा, वनस्पति, प्राणी किंवा पदार्थ यांचें निरीक्षण करावयाचें व त्याच्यासंबंधानें वडील माणसांना माहिती विचारावयाची, असा त्यांचा क्रम सुरू होतो.

मुलें शाळेंत जाऊं लागलीं कीं, तेथें त्यांना एका जागेवर बसून अक्षरें गिरविणें, अंक काढणें, परवचा म्हणणें वगैरे नीरस गोष्टी कराव्या लागतात. अभ्यासक्रमांतील इतर विषय अशा पद्धतीनें घेतले जातात कीं तेथें मुलांच्या जिज्ञासेला वावच नसतो. यामुळें शाळांतून मुलांच्या जिज्ञासेला इष्ट तें वळण न मिळतां उलट ती दाबली जाते व ती हळूहळू कमी होते. शाळेंत शिकविण्याची पद्धति अशी पाहिजे कीं, नवीन ज्ञानाबद्दल मुलांच्या मनांत कुतूहल उत्पन्न झालें पाहिजे व तें मिळविण्याची मुलांच्या मनांत तीव्र इच्छा उत्पन्न झाली पाहिजे. शिक्षकाच्या पाठांत ही ज्ञानाची तीव्र इच्छा उत्पन्न झाली पाहिजे. पाठांत सर्व कांहीं शिक्षकानें सांगावयाचें व मुलांना तें पाठ करावयाला सांगा-

वयाचें किंवा शिक्षकाच्या हुकूमाप्रमाणें, न समजतांही मुलांनीं शिक्षकाच्या कृतीची नक्कल करावयाची अशी जेथें शिकविण्याची पद्धति आहे तेथें मुलांच्या जिज्ञासेची वाढ तरी कशी होणार व तिला इष्ट तें वळण कसें मिळणार?

पालकांनीं व शिक्षकांनीं मुलांची जिज्ञासा दाबून टाकूं नये. तिला भरपूर काम देऊन ती योग्य दिशेकडे वळवावी. पालकांनीं मुलांना खेळाचें भरपूर साहित्य पुरवावें. वस्तूची मोडतोड न करितां ती काळजीपूर्वक नीट पाहण्याची मुलांना संवय लावावी. पोपट, मांजर, कुत्रें वगैरे पाळीव पक्षी व पशू घरांत पाळावें. घराच्या मागें लहानशी बाग असल्यास मुलांच्या जिज्ञासेला ती एक चांगलें क्षेत्र होतें. मुलांना शेतांत, बागांत व गांवाबाहेरील मैदानांत नेऊन नवीन नवीन वनस्पति, पक्षी, कीटक वगैरे दाखवावे. मुलांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं शक्य तितकीं समाधानकारक उत्तरें द्यावीं. मुलांना खेळाचें भरपूर साहित्य पुरवावें, कागदाच्या नावा, डबे, चौफुले, व भिरभिरीं वगैरे पदार्थ करण्यास त्यांना उत्तेजन द्यावें. ओल्या वाळूंत बोगदे, किल्ले, पक्ष्यांचीं घरटीं, नदी, आगगाडीचे रस्ते वगैरे करणें मुलांना फार आवडतें. मेक्यानोच्या साहाय्यानें खुर्ची, टेबल, बांक, स्टूल, नांगर, कपाट वगैरे पदार्थ करण्यांत मुलाच्या जिज्ञासेला व कृतिप्रियतेला फारच चांगली संधि मिळते. गमतीचीं कोडीं सोडविण्यांत मुलाच्या जिज्ञासेला भरपूर व्यवसाय मिळतो. मुलांना वाचतां येऊं लागल्यावर त्यांना 'मनी व मोत्या,' 'एका दिवसाच्या सुटींत,' 'कां व कसें!' अशीं मनोरंजक, जिज्ञासेला उत्तेजन देणारीं पुस्तकें वाचावयास द्यावीं. शाळेंतही शिक्षकानें मुलांच्या जिज्ञासेचा अभ्यासाचें कामीं उपयोग करून घ्यावा. मुलांना नवीन ज्ञान स्वप्रयत्नानें मिळविण्यास उत्तेजन द्यावें. सर्व कांहीं स्वतां न सांगतां मुलांना विचार करण्यास लावून त्यांच्याकडून शक्य तितकें काढून घ्यावें. सृष्टिनिरीक्षण, बागकाम, चित्रकला, हातकाम इत्यादि शाळेंतील विषयांनीं मुलांच्या जिज्ञासेला इष्ट वळण लावावें. बालपुस्तकालय शाळेंत असावें व त्यांत मुलांची जिज्ञासा वाढेल अशीं पुस्तकें असावीं. प्रत्येक विषय शिकवितांना योग्य शिक्षणपद्धतीचा उपयोग केल्यास मुलांच्या जिज्ञासेला शाळेंत भरपूर काम मिळेल.

जिज्ञासा ही सहज प्रवृत्ति एखाद्या वाफेच्या एंजिनाप्रमाणें आहे. तिला योग्य मार्गाला लाविली, तर त्या योगानें व्यक्तीचें व समाजाचें कल्याण होतें. ती भलत्या मार्गाकडे लागली, तर व्यक्तीचें व समाजाचें अहित होतें.

# भाग १४ वा

## सहजप्रवृत्तींचें शिक्षण

मागील भागांत मुलांच्या पलायन प्रवृत्ति, जुगुप्सा व जिज्ञासा या सहज-प्रवृत्तींना शिक्षकानें व पालकांनीं कसें वळण लावावें याचा विचार केला. या लेखांत आणखी कांहीं सहजप्रवृत्तींच्या शिक्षणाचा विचार करूं.

**स्वतांचा मोठेपणा दाखविण्याचा प्रवृत्ति.** आपलें बल, सौंदर्य, कौशल्य, सद्गुण, संपत्ति, वगैरे दुसऱ्यांस दाखविण्याची व अशा प्रकारें मोठे-पणा मिरवण्याची ही प्रवृत्ति मनुष्य प्राण्यांत फार जोरदार असते. कांहीं पशूंत व पक्ष्यांतही ही प्रवृत्ति दिसून येते. मोर आपला सुंदर पिसारा पसरून मोठ्या डौलांत नाचतो. कबुतर मोठ्या ऐटीनें छाती काढून चालतें. घोडा मान ताठ करून व शेपूट जरा उचलून मोठ्या डौलांत पाऊल टाकीत असतो. मोठा कुत्रा लहान कुत्र्यांना पाहून मोठ्या ऐटींत उभा राहतो. नंतर त्या लहान कुत्र्यां-कडे तुच्छतेनें पाहत हळूहळू चालत जातो. वानरांतही ही प्रवृत्ति दिसून येते. मोठेपणा मिरविण्याची ही प्रवृत्ति सामाजिक आहे. आपल्या जवळ दुसरा कोणी असल्याशिवाय आपल्या मोठेपणाची ऐट कशी दाखवितां येईल ?

मनुष्याच्या सहज प्रवृत्तींना चांगलें वळण लागलें, तर त्यांपासून त्या मनु-ष्याचें हित व समाजाचेंही हित होतें. हाच नियम मोठेपणा दाखविण्याच्या सहजप्रवृत्तीला लागू आहे. लहानपणीं व तरुणपणीं ही सहजप्रवृत्ति विशेष प्रबळ असते. प्रौढपणीं व वृद्धपणीं बहुधा ही कमी होत जाते. या प्रवृत्तींत डौल किंवा गर्व हा मनोविकार असतो. मूल वर्षाचें किंवा दीड वर्षाचें होई-पर्यंत या प्रवृत्तींचें कार्य त्याच्यांत दिसून येत नाहीं. मूल पहिल्यानें चालूं लागलें व हळू हळू पावलें टाकूं लागलें कीं, त्याला फार धन्यता वाटते व अभिमान वाटतो. वडील मंडळीसमोर आपल्या कौशल्याचें प्रदर्शन करण्याची त्याला फार हौस वाटते. बाबांना, आईला, दादाला, ताईला व इतर मंडळींना हाक मारून त्यांना तें आपल्या चालण्याचें कौशल्य दाखवितें. ' वाहवा ! बाबू कसा छान चालतो ! ' असें त्यांनीं म्हटलें कीं बाबूला फार आनंद वाटतो व डौलानें तो आणखी चालून दाखवितो. प्रोफेसर म्याक्डुगल यांनीं आपल्या

मुलाची गमतीची गोष्ट लिहिली आहे. ते म्हणतात. ' माझा मुलगा १८ महि-न्यांचा झाल्यावर चालूं लागला. तेव्हां त्याला आपल्या कौशल्याचें प्रदर्शन करण्याची फार हौस वाटूं लागली. तो पावलें टाकीत खोलीच्या एका कडे-पासून दुसऱ्या कडेला गेला कीं वडील मंडळी त्याला शाबासकी देत. मग त्याला फार धन्यता वाटे. पण अशी शाबासकी जर कोणीं त्याला दिली नाहीं, तर तो रागावे व जमिनीवर गडबडा लोळे आणि रागानें व मोठ्यामोठ्यानें रडे.'

आपल्या मोठेपणाचें प्रदर्शन करण्याच्या प्रवृत्ति बरोबरच स्तुतिप्रियता ही सहजप्रवृत्ति कार्य करीत असते. आपल्या वडील माणसांनीं, शिक्षकानें, शाळें-तील सोबत्यांनीं आपलें कौशल्य, गुण, सामर्थ्य, वगैरे पहावें व आपली वाहवा करावी ही इच्छा मुलांत फार दांडगी असते. स्तुतिप्रियतेबद्दल पुढें लिहावया-चेंच आहे.

मुलांना कळूं लागलें व ' आपलें आणि दुसऱ्याचें ' यांतलि भेद समजूं लागला कीं आपल्या वस्तूंचें प्रदर्शन करण्यांत त्यांना फार आनंद वाटतो. दोन वर्षांच्या शरदला बाबांनीं नवी टोपी आणली. सारा दिवसभर ती टोपी त्यानें आपल्याजवळ बाळगिली. ती त्यानें ज्याला त्याला दाखविली व ' माझी पोपी किती छान ! दादाची शी ! ' असें तो मोठ्या ऐटीनें सर्व दिवसभर सग-ळ्यांना सांगत होता. ५ वर्षांच्या मनीला तिच्या मामानें मुंबईहून एक जपानी बाहुली आणली. ती बाहुली शेजारच्या मुलींना ऐटीनें दाखविण्यांत व तिचें वर्णन करण्यांत मनीला किती तरी धन्यता वाटत होती ! ६ वर्षांच्या बाबूला त्याच्या मुंबईच्या काकांनीं वीस रुपयांची एक तीनचाकी सायकल पाठविली. बाबूला त्या सायकलवर बसून ती पळविण्यांत केवढी धन्यता वाटे ! भोंव-तालीं मुलें असलीं म्हणजे तो डौलानें घंटा वाजवीत ती सायकल चालवी. मध्यंतरीं उगाच खालीं उतरे व पुन्हां वर चढे. सायकलजवळ ऐटींत उभें राहून तिचें वर्णन सोबत्यांना सांगण्यांत त्याला फार धन्यता वाटे !

मुलानें आपल्या आईला मदत केली किंवा आपल्या भावंडाला खेळविलें, तर आपली ही कृति सर्वांच्यापुढें सांगण्याची त्याला इच्छा असते. ' पहा, मी आईचें काम कसें केलें ' हें ऐटीनें सांगण्यांत त्याला फार धन्यता वाटते. धाकटी छबू चार वर्षांची होती. आईचा सर्व स्वयंपाक झाला

होता. छबूनें पाट मांडून ठेविले व भरलेला एक एक तांब्याहि तिनें ताटाजवळ ठेविला. आपण केलेली तयारी पाहून तिला फार आनंद झाला व तिनें बाबांना व आईला हाका मारून आणलें व आपण केलेली तयारी तिनें त्यांना मोठ्या डौलानें दाखविली. ‘ शाबास छबू ! ’ असें बाबांनीं म्हटल्यावर तिला किती धन्यता वाटली ! साऱ्या दिवसभर मधून मधून आईला, ताईला, भाऊला व रामा गड्याला आपल्या कृतींचें वर्णन ती सांगत होती. रामूला त्याच्या वडिलांनीं पाटी आणली. आईनें त्याला ‘ग’ लिहिण्यास शिकविला. सर्व दिवसभर ज्याला त्याला तो ‘ ग ’ लिहून दाखवीत होता व आतां मला दादासारखें लिहितां येतें म्हणून डौलानें सांगत होता. स्वतः आंघोळ करितां येऊं लागली, पोशाक करितां येऊं लागला, पायांत बूट घालतां येऊं लागला, एखादा खेळ खेळतां येऊं लागला कीं, या आपल्या कौशल्याचें प्रदर्शन करण्याची मुलांना फार हौस वाटते. लहान गणूला जेव्हां चाक फिरवितां येऊं लागलें तेव्हां तें आपलें कौशल्य तो ज्याला त्याला दाखवूं लागला. त्याच्या बापाचे एक मित्र डॉक्टर त्याच्या बापाबरोबर गोष्टी सांगत बसले होते. ते गणूच्या घरीं नेहमीं येत. त्यांच्याकडे गणू धावत गेला व त्यांना म्हणाला ‘ काका, मला पहा कसें चाक छान चालवितां येतें ! चला मी तुम्हांला दाखवितों. ’ त्यानें काकांचा हात धरून त्यांना रस्त्यावर नेलें व मोठ्या डौलानें आपल्या कौशल्याचें प्रदर्शन केलें. ‘ शाबास. छान ! ’ असें काकानें म्हटल्यावर गणूचा आनंद गगनांत मावेना.

शाळेंतहि मुलांची ही प्रवृत्ति खालच्या वर्गात विशेष दिसून येते. आपणाला जें कांहीं येत आहे त्याचें प्रदर्शन शिक्षकापुढें व वर्गातील आपल्या सोबत्यांपुढें करावें, अशी उत्कट इच्छा मुलाला असते. ‘ मास्तर, मी सांगूं का ?’ ‘ मास्तर मी तें गांव दाखवूं का ?’ ‘ मास्तर, मी तें गाणें म्हणूं का ?’ अशी मुलांची लागलेली अहमहमिका मुलांची हीच प्रवृत्ति दाखविते. शिक्षकांना व पालकांना मुलांच्या अंगीं असलेल्या जिज्ञासा, कृतिप्रियता, स्वतांच्या मोठेपणाचें प्रदर्शन करण्याची प्रवृत्ति, स्तुतिप्रियता वगैरे प्रवृत्तींचा योग्य उपयोग करून मुलांना बौद्धिक, नैतिक व शारीरिक शिक्षण देतां येतें.

शिक्षकांनीं व पालकांनीं मुलाच्या स्वतांच्या मोठेपणाचें प्रदर्शन करण्याच्या या प्रवृत्तीला अडथळा करून ती दाबून टाकण्याचा प्रयत्न करूं नये. मुलाच्या

अंगीं स्वाभिमान उत्पन्न होण्यास व त्याची प्रगति होण्यास ही प्रवृत्ति फार उपयोगी पडते. मूल लहान असतें तोंपर्यंत त्याला त्याचें कौशल्य दाखविण्यास पूर्ण संधि द्यावी व त्याचें कौतुक करावें. मूल आपल्या सोबत्यांत मिसळूं लागलें कीं, मग तें प्रसंग पाहूनच स्वतांचा मोठेपणा दाखविण्याचा प्रयत्न करितें. मुलाच्या अंगीं पोकळ अभिमान, आढ्यता, चढेलपणा वगैरे दुर्गण उत्पन्न होणार नाहींत याची मात्र काळजी घ्यावी. मुलाच्या या प्रवृत्तीनें दुसऱ्याला त्रास होणार नाहीं याजबद्दल पालक व शिक्षक यांनीं दक्षता ठेविली पाहिजे. वर्गांत किंवा घरीं एकच मूल पुढें पुढें करीत असेल, तर अर्थात् त्याची ही खोड सौम्य उपायानें घालविली पाहिजे. वर्गांत काम करण्याची पाळी सर्वांस्च मिळाली पाहिजे. तसेंच घरींहि सर्व मुलांना आपआपलें कौशल्य किंवा गुण दाखविण्याची संधि मिळाली पाहिजे. एकाच मुलाला डोक्यावर बसविल्यानें त्याचें फार नुकसान होतें ही गोष्ट शिक्षकानें व पालकांनीं लक्षांत ठेविली पाहिजे. मुलाच्या स्तुतिप्रियता या प्रवृत्तिला वळण लावण्यासंबंधानें पुढें ज्या गोष्टी सांगितल्या आहेत त्यांपैकीं बऱ्याच गोष्टी याही प्रवृत्तीच्या बाबतींत लागू पडतील.

**स्तुतिप्रियता**—कांहीं मानसशास्त्रवेत्ते या प्रवृत्तीस स्वतंत्र प्रवृत्ति असें मानीत नाहींत. ते हिचा अंतर्भाव स्वतांचा मोठेपणा दाखविण्याच्या प्रवृत्तींत करितात. परंतु मुलाच्या शिक्षणाच्या दृष्टीनें या प्रवृत्तीचें फार महत्त्व आहे. कुत्रा, घोडा, वानर, हत्ती वगैरे बुद्धिवान् प्राण्यांत ही प्रवृत्ति थोड्या प्रमाणांत दिसून येते. आपली विद्वत्ता, गुण, कौशल्य, संपत्ति, कुल, यांची स्तुति दुसऱ्यांनीं करावी व ती आपण ऐकावी अशी उत्कट इच्छा मनुष्याला असते व त्या दृष्टीनें त्याचा प्रयत्नही चालू असतो. लहान मुलापासून वृद्ध माणसापर्यंत सर्वांचा स्तुति, शाबासकी किंवा गौरव मिळविण्याचा प्रयत्न थोड्या फार प्रमाणांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें एकसारखा चाललेला असतो.

दुसऱ्यानें केलेली आपली स्तुति ऐकण्याची आवड ही व्यक्तीला व समाजाला उपकारक होते. या प्रवृत्तीमुळें मनुष्याची सुधारणा होते. मनुष्य दुष्कृत्यांपासून दूर राहतो, विद्या, कला, कौशल्य, शरीरसामर्थ्य इत्यादि गोष्टी मिळविण्यास तो झटतो व परोपकारादि सत्कृत्येंहि करतो. समाजानें आपली स्तुति करावी व भावी पिढींनींहि आपली कीर्ति गावी, म्हणून कितीएक धनिक लोक

लक्षावधि रुपये दवाखाने, घाट, तलाव, शाळागृहें वगैरे लोकोपयोगी गोष्टींत खर्च करितात. आपण शास्त्रांचे व कलांचे पुरस्कर्ते आहोंत अशी आपली कीर्ति लोकांनीं गावी, म्हणून कितीएक राजे-रजवाडे व धनिक व्यापारी शास्त्रज्ञांना व कलावंतांना उदार हातानें मदत करितात. या योगानें समाजाचाहि फायदा होतो. या प्रवृत्तीचा दुरुपयोग होण्याचाहि पुष्कळ संभव असतो. स्तुतिप्रियता ही प्रवृत्ति प्रबळ झाली म्हणजे मनुष्य दुर्बळ होतो. दुसऱ्यानें आपणांस बरें म्हणावें म्हणून स्वतांच्या सदसद्विचारबुद्धीच्या विरुद्धहि तो कृति करितो. दुसऱ्यांनीं आपणांस बरें म्हणावें म्हणून ऋण काढून सण करणारे किती तरी लोक सांपडतील. स्वार्थसाधु लोकहि स्तुतिप्रिय माणसाच्या प्रवृत्तीचा फायदा घेण्यास तयार असतात. मूर्ख, अडाणी अशा लोकांच्या स्तुतीची अपेक्षा करणें म्हणजे पर्यायानें आपण स्वतां मूर्ख बनण्याप्रमाणेंच आहे. ज्यांची विचारशक्ति विकास पावलेली आहे, ज्यांचा स्वाभिमान दांडगा आहे त्यांच्यांत ही स्तुतिप्रियतेची प्रवृत्ति फार कमी असते. जगांत आजपर्यंत जे थोर पुरुष होऊन गेले त्यांनीं कधीं जनतेच्या स्तुतीची पर्वा केली नाहीं. जें त्यांना कर्तव्य वाटलें तें त्यांनीं लोकनिंदेची अथवा स्तुतीची पर्वा न करितां केलें. स्तुति मिळविण्याचें ध्येय मनुष्यानें दृष्टीसमोर ठेवून काम करणें कधींहि योग्य होणार नाहीं. स्तुतीच्या मागें लागून जो सर्वांस खूष करण्याचा प्रयत्न करितो त्याची स्थिति ‘म्हातारा आणि त्याचा बैल’ या गोष्टींतील भोळसर वृद्ध मनुष्याप्रमाणें होते.

आतां स्तुतिप्रियता या प्रवृत्तीची वाढ मुलांत कशी होते व मुलाच्या शिक्षणाला या प्रवृत्तीचें कसें साहाय्य होतें हें पाहूं. अगदीं लहान मुलाला चांगली कृति कोणती व वाईट कृति कोणती याचें बिलकूल ज्ञान नसतें. जी कृति केली असतां वडील माणसें आपणांस शाबासकी देतात अथवा खाऊ देतात ती चांगली व जी कृति केली असतां तीं आपणांवर रागावतात किंवा आपणांला शिक्षा करितात ती वाईट असें लहान मुलांना साहजिकपणेंच वाटतें. चार वर्षांची मनी आपल्या बाहुलीबरोबर खेळत होती. तिचा धाकटा भाऊ पाळण्यांत रडूं लागला. मनीनें बाळाला झोका दिला व त्याला जो जो म्हणून गाणें म्हटलें. आई तिकडून आली. ती म्हणाली ‘मनी माझी कशी शहाणी आहे. ती बाळाला कशी झोके देते व त्याला निजवितें!’ आईचे ते शब्द ऐकून

मनीला आनंद झाला. आईला आपली ही कृति आवडते, अर्थातच ती चांगली असली पाहिजे असें मनीला वाटलें व तेव्हांपासून आपल्या भावाला पाळण्यांत रडतांना पाहिलें कीं ती त्याला झोके देई व गाणें म्हणें. बाबू तीन वर्षांचा होता. शेजारची शांती बाबूच्या घरीं आली. तिनें बाबूला जवळ घेतलें व ती त्याला खेळवूं लागली. बाबूच्या हातांत नवा चेंडू होता. तो तिनें त्याच्या हातांतून सहज पाहण्यास घेतला. तें पाहून बाबूला फार राग आला व तो शांतीच्या बोटाला कडकडून चावला. लागलींच आई तेथें आली व तिनें बाबूच्या पाठींत धबका दिला व शांतीला लाडू देऊन तिची समजूत केली. धबका मिळाल्यामुळें व खाऊ न मिळाल्यामुळें दुसऱ्याला चावणें ही गोष्ट वाईट आहे हें बाबूला चांगलें समजलें. लहान मुलांचें आईवर व बापावर फार प्रेम असतें. आई व बाबा ज्या कृतीबद्दल शाबासकी देतात ती कृति करण्यांत मुलांना फार आनंद वाटतो, व अशा प्रकारें ती कृति करण्याची संवय मुलांना लागते. एखादी कठीण किंवा अप्रिय गोष्टही वडील मनुष्याच्या शाबासकीमुळें मूल करतें, व पुन्हा पुन्हा ती कृति केल्यामुळें ती करण्याची त्याला संवय होते. मुलें जसजशीं मोठीं होतात तसतशी त्यांची विचारशक्ति वाढत जाते. मग त्यांना ' चांगलें व वाईट ' याबद्दलची कल्पना जास्त स्पष्ट होत जाते. मग आईबापांवरील प्रेम, भावंडांवरील प्रेम, गुरुजनाबद्दल आदर, इत्यादि त्यांच्या मनोवृत्ति स्थिर होऊं लागतात व ' कर्तव्याची जाणीव ' त्यांच्या मनांत जागृत होते. यामुळें मग लहान सहान व दररोजच्या करावयाच्या गोष्टींबद्दल त्यांना स्तुतीची आवश्यकता वाटत नाहीं. दररोजचा अभ्यास करणें, आईला व वडिलांना मदत करणें, भावंडांना संभाळणें, स्नान करणें, कपडे धुणें वगैरे कामें स्वतां व नियमितपणें करणें, वर्गांत गुरुजींनीं सांगितलेलें काम करणें इत्यादि गोष्टी करण्याला मुलांना दुसऱ्याच्या स्तुतीची आवश्यकता वाटत नाहीं. एखादें विशेष मानसिक अगर शारीरिक श्रमाचें अगर कौशल्याचें काम केलें, तर आईबापांनीं व गुरुजींनीं त्याबद्दल आपणांस शाबासकी द्यावी असें त्यांना वाटतें व ती मिळाली म्हणजे मुलांना धन्यता वाटते व जास्त काम करण्यास त्यांना उत्तेजन येतें.

शाळेंतही आरंभीं मुलाला शिक्षकाच्या शाबासकीची जरूरी असते. मुलानें अक्षर नीट काढलें, चित्र चांगलें काढलें, त्याला शिक्षकानें थोडीशी शाबासकी

दिली कीं, त्याला आपलें काम चांगलें झालें असें कळतें व जास्त चांगलें काम करण्याचा त्याला उत्साह येतो. त्याचप्रमाणें मंद बुद्धीच्या मुलाचा प्रयत्न जरी वेडा-वाकडा असला, तरी त्याला शाबासकीची जरूरी असते. या शाबासकीच्या प्रेरणेनें तो जास्त चांगलें काम करितो. मुलें जसजशीं मोठीं होतील तसतसें शिक्षकानें व पालकांनीं आपलें स्तुतीचें प्रमाण कमी करावें. मुलानें नेहमींचीं कामें चांगलीं केलीं कीं, त्यांच्याकडे संतोषाची नजर टाकावी व आपली पसंती व्यक्त करावी. जर कांहीं विशेष चांगलें काम मुलानें केलें. तरच त्याला शाबासकी द्यावी व तीहि अगदीं थोड्या शब्दांत द्यावी. नाहींतर मुलाला स्तुतीचें व्यसनच लागतें. स्तुतीशिवाय त्याच्या हातून कामच होत नाहीं. अफीणबाजाला अफूवांचून ज्याप्रमाणें चैन पडत नाहीं त्याप्रमाणें स्तुतिप्रिय मुलाला स्तुती-शिवाय चैन पडत नाहीं. जोडीदारानें मोठ्यानें ढोलकें वाजविल्याशिवाय गारुड्याला कामच करतां येत नाहीं, त्याप्रमाणें स्तुतिप्रिय माणसाला स्तुतीशिवाय कामच करितां येत नाहीं. अशा प्रकारचें स्तुतीचें व्यसन मुलांना लागूं नये याजविषयीं शिक्षकानें व पालकांनीं फार काळजी घेतली पाहिजे. मुलानें एखादें विशेष काम केलें, तरच त्याला शाबासकी द्यावी व तीहि अगदीं थोड्या शब्दांत द्यावी. प्रेमाच्या माणसाच्या प्रेमळ शब्दांनीं मुलांना जो आनंद होतो तो नुसत्या शाबासकीच्या अनेक लांबलचक वाक्यांनीं होणें शक्य नाहीं.

**विनम्रता**—या प्रवृत्तींत लीनता हा मनोविकार असतो. जो कोणी आपल्या-पेक्षां सामर्थ्यानें, सत्तेनें, ऐश्वर्यानें किंवा विद्वत्तेनें जास्त असेल त्याच्याशीं अति-शय गरीबीनें व लीनतेनें वागण्याची प्रवृत्ति मनुष्य समाजांत अनादि काला-पासून चालत आलेली आहे. कांहीं प्राण्यांत ही प्रवृत्ति दिसून येते. एखादा मोठा कुत्रा पाहिला म्हणजे लहान लहान कुत्रीं शेपूट खालीं करून मोठ्या गरिबीनें त्याच्यापासून थोड्या अंतरावर उभीं राहतात. लहान मुलांना कळूं लागलें कीं, मग त्यांत या प्रवृत्तीचें कार्य दिसूं लागतें. मुलें चार-पांच वर्षांचीं झालीं म्हणजे त्यांना आपणापेक्षां ज्ञानानें किंवा बलानें कोण जास्त आहे त्याची थोडीफार कल्पना येतें व तेव्हांपासून त्यांची ही प्रवृत्ति जागृत होऊन काम करूं लागते. प्रेमळ व सुशिक्षित आईबापांच्या संगतींत मुलाच्या या प्रवृत्तीला इष्ट तें वळण लागतें. वडील माणसांचा मान राखणें, मोठीं माणसें बोलत असतांना आपण मध्येंच बडबड न करणें, मर्यादेनें बोलणें वगैरे कृति मुलें

आनंदानें व स्वतांच्या इच्छेनें करितात, तेव्हां मुलाच्या या प्रवृत्तीला इष्ट तें वळण लागलें आहे असें तेव्हांच दिसून येतें. जबरदस्तीनें व भीतीनें मुलांना नम्रता शिकविणें व त्यांचा स्वाभिमान व स्वतांच्या गुणांचें व सत्कृतीचें प्रदर्शन करण्याची प्रवृत्ति दडपून टाकणें हें मुलांच्या शिक्षणदृष्ट्या फार अनिष्ट आहे. गोपाळराव व त्यांचे एक स्नेही गप्पा मारीत बसले होते. धाकटा ९ वर्षांचा गणू आपलें पुस्तक घेऊन आंत आला. ' बाबा, हा शब्द मला लागत नाहीं. मला सांगतां का ? ' असें तो गोपाळरावांस म्हणाला. 'चल, काय कटकट लावली आहेस ? मोटा आला आहे अभ्यासी ! मोठीं माणसें बोलत असतांना मध्यें आपण बोलूं नये. जा एथून, ' असें म्हणून गोपाळरावांनीं गणूला हाकून दिलें. तेव्हांपासून गणूनें बापाला अभ्यासाच्या बाबतींत त्रास दिला नाहीं. बापाच्या वर्तनानें मुलाच्या स्वाभिमानाला धक्का बसला. बापाच्या भीतीनें स्वतांच्या मनाच्या विरुद्ध गणूंत शिरलेली नम्रता ही खरी नम्रता नव्हे. दोन तास झटून लहान लिलीनें आपली बाहुली सजविली व ती आईला नेऊन दाखविली. आईनें तिचें कौतुक करण्याचे ऐवजीं, ' कारटे, तुला मावशीला बोलावून आणण्यास सांगितलें, तें न करितां हा उद्योग करीत बसलीस ! ' असें म्हणून लिलीच्या पाठींत धबका दिला व तिला नम्रता शिकविली. अर्थातच लिलीच्या नम्रतावृत्तीला या शिक्षणानें अनिष्ट असेंच वळण मिळालें. आरडाओरड करून, शिक्षा देऊन, मुलांचा अपमान करून त्यांना नम्रता शिकविण्यानें मुलांवर अनिष्ट परिणाम होतो. त्या योगानें मुलांच्या स्वाभिमानाला धक्का बसतो व त्यांच्या सुधारणेच्या मार्गांत प्रतिबंध होतो.

मुलें लहान असतांना त्यांना ज्ञान फार कमी असतें. चांगलें कोणतें, वाईट कोणतें ग्याची त्यांना जाणीव नसते. अशा वेळीं शिक्षकानेंहि मुलांच्या नम्रता या प्रवृत्तीचा योग्य तो उपयोग करून घ्यावा. मुलें जसजशीं मोठीं होत जातील तसतसें त्यांनीं स्वतांच्या विचारानें, शिक्षकावरील प्रेमानें व त्याजबद्दल वाटत असलेल्या आदरानें शाळेंत शिस्त पाळावी व आपलें आचरण ठेवावें हेंच योग्य होय. आईबापांबद्दल व शिक्षकांबदल मुलांच्या मनांत भीति व दरारा असतां कामा नये. दुसऱ्याच्या भीतीनें स्वाभिमान विसरून त्याच्यापुढें नम्रतेनें वागण्याची वृत्ति ही अनिष्ट आहे. नम्रतेनें मुलांचा स्वाभिमान जाणार नाहीं याजबद्दल शिक्षकानें व आईबापांनीं काळजी घ्यावी.

## भाग १५ वा.

## सहजप्रवृत्तींचें शिक्षण ( पुढें चालू )

मागील भागांत मुलांच्या स्तुतिप्रियता व विनम्रता या सहजप्रवृत्तींना वळण कसें लावावें याचा विचार केला, या भागांत स्पर्धा, संपादन-प्रवृत्ति व समाजसहवासप्रियता या मुलांच्या सहजप्रवृत्तींना कसें वळण लावावें याचा विचार करूं. मूल वर्ष दीड वर्षांचें होईपर्यंत तें आपल्या भोवतालच्या माणसांच्या कांहीं अगदीं सोप्या कृतींचें साहजीकपणेंच अनुकरण करीत असतें. दादा टाळ्या वाजवितो. त्याप्रमाणें धाकटा बाळही टाळ्या वाजवितो, दादा डोक्यावर टोपी ठेवतो त्याप्रमाणें धाकटा बाळही डोक्यावर टोपी ठेवितो. बाबा काठी घेऊन उभे राहतात, त्याप्रमाणें बाळही काठी घेऊन उभा राहतो. आई दही घुसळते, तें पाहून दीड वर्षांची विमलही दही घुसळण्याची नक्कल करते. अनुकरणाची जी ही स्वाभाविक वृत्ति मुलांत परमेश्वरानें ठेविली आहे तिच्यायोगानें शिक्षणदृष्ट्या मुलाचा किती फायदा होतो याचें वर्णन मागील एका भागांत केलें आहे. मूल अडीच तीन वर्षांचें झालें कीं, मुलाची स्पर्धा ही साहजिक प्रवृत्ति जागृत होते व तिच्या प्रेरणेनें मूल कृति करूं लागतें. स्पर्धेचे दोन प्रकार असतात. दुसऱ्यांत जे गुण, कौशल्य किंवा ज्ञान आहे, तेंच गुण, कौशल्य, किंवा ज्ञान आपणास असावें अशी इच्छा उत्पन्न होऊन तसा प्रयत्न करणें हा स्पर्धेचा पाहिला प्रकार होय. दुसऱ्यांत जे गुण, कौशल्य किंवा ज्ञान आहे त्याजपेक्षां आपणाला जास्त गुण, कौशल्य किंवा ज्ञान असावें अशी इच्छा धरून त्याप्रमाणें प्रयत्न करणें हा स्पर्धेचा दुसरा प्रकार होय. प्रथमतः मुलांत पहिल्या प्रकारची स्पर्धा उत्पन्न होते. आपल्या बरोबरीचीं किंवा आपणांपेक्षां जरा मोठीं मुलें जी कृति करितात, ती आपणालाहि करितां यावी असें मुलाला वाटतें व ती कृति आपण करावी व वडील माणसांनीं तिजबद्दल आपणास शाबासकी द्यावी अशीहि त्याला इच्छा होते. लीलेची सात वर्षांची थोरली बहीण कमला दोरीवरून मोठ्या चपलतेनें भराभर उड्या मारीत होती. तें पाहून आपणालाहि अशा उड्या मारतां याव्या असें पांच वर्षांच्या लीलेला वाटलें. ती साऱ्या दिवसभर दोरी-वरून उड्या मारण्याचा प्रयत्न करीत होती; पण तो तिला साधला नाहीं.

दुसऱ्या दिवशींहि तिनें आपला प्रयत्न तसाच चालविला व तिला दोरीवरून उड्या मारतां येऊं लागल्या. मग तिचा आनंद गगनांत मावेना. बाबाला, आईला, दादाला, कमला ताईला, रामा गड्याला तिनें दोरीवरून उड्या मारून दाखविल्या. प्रत्येकानें तिला शाबासकी दिली. यामुळें तिला कितीतरी धन्यता वाटली! दुसऱ्याची जी कृति मूल पाहतें ती कृति आपणाला करितां यावी ही प्रेरणा त्याला स्पर्धेमुळें होते व तिच्या प्रेरणेनेंच मूल सारखा प्रयत्न करितें व या प्रयत्नाचें त्याला यश मिळतें. मूल सहा सात वर्षांचें झालें कीं दुसऱ्या प्रकारची स्पर्धा त्यांत उत्पन्न होते. मूल शाळेंत जाऊं लागलें व बरोबरीच्या सोबत्यांत खेळूं लागलें कीं ही दुसऱ्या प्रकारची स्पर्धा त्यांत जास्त दिसूं लागते.

स्पर्धेमुळें मुलांचा पुष्कळ फायदा होतो यांत शंका नाहीं. कुटुंबांतील मुलें स्पर्धेमुळें पुष्कळ नवीन नवीन कृति करण्यास शिकतात व त्यांना चांगली शिस्तहि लागते. ज्या कुटुंबांत तीन चार मुलें समवयस्क असतात त्या कुटुंबांतील मुलांना स्पर्धेपासून चांगला फायदा होतो. 'तो पहा बाबू कसा शांतपणें जेवत आहे. तो शीत देखील खालीं सांडीत नाहीं,' असें आईनें सांगितलें कीं मधू बाबूप्रमाणें शांतपणें जेवण्याचा व शितें खालीं न सांडण्याचा प्रयत्न करितो व त्यांत त्याला यशाही येतें. स्पर्धेमुळें, तोंड धुणें, पोषाक व स्नान करणें, भांडें धुणें, वगैरे दररोजच्या आवश्यक कृति सहज करण्यास मुलें शिकतात. शाळेंतहि स्पर्धेच्या योगानें पुष्कळ फायदा होतो. आपल्या वयाचीं दुसरीं पुष्कळ लहान लहान मुलें अक्षरें काढीत आहेत हें पाहून मूलहि अक्षरें काढण्यास प्रारंभ करतें. वाचणें, चित्रें काढणें, हातकाम करणें, वगैरे किती तरी गोष्टी स्पर्धेमुळेंच चांगल्या करण्यास मुलें शिकतात. दोरीवरून उड्या मारणें, चाक फिरविणें, भोवरा फिरविणें, लंगडी घालणें वगैरे अनेक खेळहि स्पर्धेमुळें मुलें लवकर शिकतात.

दुसऱ्या मुलांत जे गुण दिसतात किंवा जें कौशल्य दिसतें त्याजपेक्षां आपण जास्त गुण मिळवूं अगर जास्त कौशल्य दाखवूं अशी इच्छा करणें व त्याप्रमाणें प्रयत्न करणें ही दुसऱ्या प्रकारची स्पर्धा होय. या स्पर्धेच्या योगानें मुलाच्या मनांत दुसऱ्या मुलाबद्दल द्वेष, मत्सर किंवा शत्रुत्व उत्पन्न होण्याचा संभव असतो आणि या स्पर्धेमुळें कुटुंबांतील किंवा वर्गांतील प्रेमाचें वातावरण दूषित

होण्याचाहि संभव जास्त असतो. वडील मंडळीच्या स्तुतीमुळें किंवा निंदेमुळें मुलांच्या मनांत मत्सर किंवा द्वेष उत्पन्न होतो. असा द्वेष उत्पन्न न होतां मुलानें आपल्या आवडीच्या खेळांत किंवा विषयांत जास्त प्रावीण्य मिळवावें हें जास्त चांगलें. कुटुंबांतील व वर्गांतील वातावरण जर प्रेमाचें असलें, तर स्पर्धेच्या योगानें कांहीं नुकसान न होतां फायदाच होतो. मुलाच्या स्पर्धा या प्रवृत्तीला वळण लावून तिचा शिक्षणाच्या कामीं शक्य तितका उपयोग करून घेण्यास शिक्षकाला व पालकाला फार चातुर्य लागतें. नाहींतर त्या स्पर्धेचे अनिष्ट परिणाम मुलांच्या मनावर कायमचे होतात. राष्ट्राराष्ट्रांत जीं वितुष्टें माजतात, समाजांत जी फाटाफूट होते व कुटुंबांत जे बेबनाव होतात त्यांचें कारण बालपणापासून विकास पावत असलेली स्पर्धा असें मानसशास्त्रवेत्त्यांचें मत आहे आणि म्हणून नवीन पद्धतीनें चालविलेल्या मॅांटिसरी शाळांतून स्पर्धेची हकालपट्टी केलेली असते. स्पर्धा ही सहजप्रवृत्ति नाहींशी करितां येणार नाहीं व तिचा शक्य तितका उपयोग करूनहि घेतला पाहिजे. पहिल्या प्रकारची स्पर्धा अगदीं निरुपद्रवी असते व दुसऱ्या प्रकारच्या स्पर्धेत द्वेष, मत्सर वगैरे मनोविकार उत्पन्न होऊं नयेत अशी काळजी घेतली, तर तिचाहि शहाण्या पालकाला व शिक्षकाला चांगला उपयोग करून घेतां येईल.

प्राण्यांमध्यें असणारी सहजप्रवृत्ति, समाजप्रियता हिचा मुलांचे शिक्षणांत कसा उपयोग करितां येईल हें आतां आपण पाहूं. प्राण्यांच्या संरक्षणाकरितां व कल्याणाकरितां ही सहजप्रवृत्ति परमेश्वरानें त्यांच्या ठिकाणीं ठेविली आहे. हरण, वनगाई, हत्ती वगैरे पशु; चिमण्या, कावळे, पोपट, कबुतरें वगैरे पक्षी; मुंग्या, मधमाशा, वाळवी वगैरे कीटक संघ करून राहतात. हे प्राणी जर संघ करून राहिले नाहींत, तर त्यांचें संरक्षण होणार नाहीं व मुंग्यांसारख्या प्राण्यांचें एकटें राहिल्यानें पोषणहि होणार नाहीं. वाघ, सिंह यांच्यासारखे बलवान् क्रूर प्राणी, सापासारखे सरपटणारे प्राणी, गरुडासारखे प्रबल पक्षी यांना समूहात राहण्याची अगदींच जरूर नसते, म्हणून समाजप्रियता ही सहज-प्रवृत्ति त्यांत नसते.

मनुष्यप्राण्याला समाजाची फार आवड आहे. समाजापासून दूर एकटें राहणें मनुष्याला अगदीं आवडत नाहीं. याचें कारणहि उघडच आहे. मनुष्य

प्राण्याची जी ही सुधारणा झाली आहे ती त्याच्या समाजप्रियतेमुळेंच झाली आहे. समाजांत राहिल्यानें मनुष्यप्राणी इतर क्रूर व बलवान प्राण्यांपासून आपलें रक्षण करतो. समाजांत राहिल्यानें मनुष्याची बौद्धिक, शारीरिक व नैतिक प्रगति झाली आहे. एखादें मूल अगदीं लहानपणींच जंगलांत नेऊन सोडलें व त्याला मनुष्यसमाजाचा यत्किंचित् संपर्क होऊं दिला नाहीं, तर त्याची काय स्थिति होईल बरें ? हें मूल मोठें झालें, तरी त्याला भाषा बोलतां येणार नाहीं. त्याच्या अंगीं जनावराप्रमाणें बल व चपलता हीं येतील. पण इतर जनावरें व हा मनुष्यप्राणी यांत कांहीं अंतर राहणार नाहीं. इतर प्राण्यांपेक्षां बुद्धि जास्त असल्यामुळें तो कदाचित् झाडावर आपणांकरितां फांद्यांचें लहानसें घर बांधील व वानराप्रमाणें भराभर झाडावर चढून आपली उपजीविका करील. अशा प्रकारें त्याचें आयुष्य रानांत जाईल. उलटपक्षीं आपण समाजांत राहिलेल्या १४ वर्षांच्या वसंताची स्थिति पाहूं. आईबापांच्या, बहीणभावांच्या व आजोबा व आजी यांच्या प्रेमळ सहवासांत वसंत वाढला. आठ दहा महिन्यांचा झाल्यावर तो हळूं हळूं बोलूं लागला. भोवतालची मंडळी वस्तूंना, क्रियांना व प्राण्यांना जीं जीं नांवें देत तीं तीं वसंत लक्षांत ठेवूं लागला व अनुकरणानें त्यांतील कांहीं शब्द बोलूं लागला. तो तीन चार वर्षांचा झाल्यावर मातृभाषा त्याला बरीच चांगली बोलतां येऊं लागली. तो पांच वर्षांचा झाला तेव्हां त्याला सुमारें ५०० शब्द बोलतां येत व त्यांजपेक्षां जास्त शब्द समजत. बोलतां येऊं लागल्यापासून वसंताच्या ज्ञानांत फार जलद भर पडूं लागली. भाषेंतील प्रत्येक शब्दांत मनुष्यसमाजाच्या ज्ञानाचा व अनुभवाचा संग्रह केलेला असतो. अनेक पिढ्यांचें हें ज्ञान भाषेच्या योगानें वडील माणसांपासून वसंताला मिळालें. वडील माणसांच्या व मुलांच्या अनेक कृति पाहून त्या वसंत सफाईनें व कुशलतेनें करूं लागला. तो शाळेंत गेल्या वर दोन तीन वर्षांत त्याला लिहितां वाचतां येऊं लागलें. मग तो सोपीं पुस्तकें वाचूं लागला. प्राथमिक शाळेंत कांहीं वर्षें घालविल्यावर तो इंग्रजी शाळेंत गेला. आतां त्याला चांगलें वाचतां येऊं लागलें होतें. तो निरनिराळीं पुस्तकें वाचून आपल्या ज्ञानांत भर घालूं लागला. चित्रें काढणें, सुतारकीचीं लहानसहान कामें करणें, शिवणें, सायकलीवर बसणें, पोहणें वगैरे किती तरी कला तो

शिकला. इतिहास, भूगोल, गणित, भूमिति, ज्योतिष, वनस्पतिशास्त्र, इंग्रजीभाषा, संस्कृत भाषा इत्यादिकांचें ज्ञान त्यानें हायस्कूलमध्यें मिळविलें. ही सर्व प्रगति वसंत मनुष्यसमाजांत राहिल्यामुळेंच झाली.

मूल प्रथम आईला ओळखतें व तिचा सहवास त्याला आवडूं लागतो. मग बाप, भाऊ व बहीण वगैरे निकट असणाऱ्या कुटुंबांतील मंडळींना तें ओळखूं लागतें व त्यांचा सहवास त्याला आवडतो. मुलाला एकटें एका खोलींत नेऊन ठेवलेलें कधींही आवडत नाहीं. त्याला घरच्या मंडळीच्या सहवासांत राहावें असें वाटतें. १॥–२ वर्षांचें मूल झालें कीं तें भावाबहिणींत खेळूं लागतें. त्यांनीं जर त्याला जवळ घेतलें नाहीं, तर तें रडूं लागतें. मुलें चार पांच वर्षांचीं झालीं कीं तीं आपल्या समवयस्क सोबत्यांत मिसळतात व त्यांच्या बरोबर खेळतात. आपल्या बरोबरीच्या मुलांत मूल मिसळूं लागलें व त्यांत खेळूं लागलें कीं शिक्षणदृष्ट्या अत्यंत इष्ट असा परिणाम त्या मुलावर होतो. सहानुभूति, सहकार्य, मिळून मिसळून वागण्याची आवड इत्यादि अनेक चांगल्या संवयी मुलाला लागतात. ज्या कुटुंबांत तीनचार समवयस्क मुलें असतात तेथलि सर्व मुलांवर एकमेकांच्या सहवासाचा इष्ट परिणाम होतो. कुटुंबांत मुलें नसलीं, तर शेजारच्या मुलांबरोबर चार पांच वर्षांच्या मुलांस खेळावयास धाडलेंच पाहिजे. जें मूल आपल्या आईबापाचें एकुलतें एक असतें व ज्याला समवयस्क सोबत्यांबरोबर आईबाप खेळूं देत नाहींत, त्याचें शिक्षणदृष्ट्या अतिशय नुकसान होतें. तें भित्रें बनतें व हट्टी होतें. त्याच्या ज्ञानांत फारशी भर पडत नाहीं. सौशिकपणा, मिळून मिसळून वागण्याची संवय, सहानुभूति वगैरे चांगल्या संवयी त्याला लागत नाहींत. लाडावलेलें व आईबापाच्याच निरंतर सहवासांत असलेलें मूल हट्टी, भित्रें, चिरडखोर असेंच बहुधा असतें. मनुष्याच्या भोंवतालची परिस्थिति निरंतर बदलत असते. बदलत असलेल्या परिस्थितीला तोंड देण्याचें शाहाणपण व संवय हीं मुलांना प्राप्त झालीं पाहिजेत व हें शिक्षण त्याला अवश्य मिळालें पाहिजे. हें शिक्षण मिळण्याला समवयस्क मुलांचा सहवास अवश्य पाहिजे. शाळेंत मुलाला समवयस्क मुलांच्या सहवासांत आयुष्य घालवावें लागतें, यामुळें दुसऱ्याशीं गोडीगुलाबीनें वागणें, दुसऱ्याला मदत करणें, सर्वांनीं मिळून एखादें काम करणें, आपल्या हक्कांचें

रक्षण करणें, दुसऱ्याच्या हक्काला मान देणें, स्वावलंबन इत्यादि आयुष्यांत अवश्य लागणारे गुण मुलांत येतात.

मुलाला आपल्या बरोबरीच्या मुलांचा सहवास साहजिकच आवडतो. ज्या मुलाला ही आवड नसते त्याच्यांत कांहींतरी शारीरिक अगर मानसिक दोष असलाच पाहिजे, अथवा आईबापांच्या फाजील लाडांनीं तें मूल बिघडलेलें असलें पाहिजे. कधीं कधीं घरच्या कडक शिस्तीमुळें मूल एकलकोंडें बनतें. पुष्कळ वेळा कुटुंबांतील वडील माणसें मुलाच्या सहवासप्रियतेला अडथळा आणतात. कुटुंबांत चार मुलें असलीं कीं कुटुंबांतील वडील माणसें एकाची नेहमीं स्तुति करतात व बाकीच्या तिघांची निंदा करितात. यामुळें स्तुति केलेलें मूल लाडावतें व गर्विष्ठ बनतें आणि बाकीचीं मुलें त्याचा हेवा व मत्सर करूं लागतात. हीच स्थिति शाळेंतही पुष्कळ वेळां दृष्टीस पडते. शिक्षकांनीं व पालकांनीं मुलांच्या मनांतील समाजसहवासप्रियता ही कमी होणार नाहीं याजबद्दल फार काळजी घेतली पाहिजे.

संपादनाची सहजप्रवृत्ति मनुष्यप्राण्यांस जशी दिसून येते तशी ती इतर प्राण्यांत दिसून येत नाहीं. बहुतेक प्राणी तात्कालिक लागणाऱ्या अन्नाच्या पलीकडे कांहींही संपादन करीत नाहींत. मुंग्या, मधमाशा, खारी या थोडासा अन्नसंचय करून ठेवतात. मनुष्याइतकी कल्पनाशक्ति दुसऱ्या प्राण्यांत नसल्यामुळें त्यांना दूरवरचा विचारच करतां येत नाहीं. आजपासून २५ वर्षांनीं आपल्या मुलांना सुखांत राहतां यावें म्हणून पैसा साठविणारा मनुष्याशिवाय दुसरा कोणताही प्राणी सांपडणार नाहीं. मनुष्याच्या या संपादनप्रवृत्तीमुळें व्यक्तीचें व समाजाचेंही कल्याण होतें. संपादनप्रवृत्तीला हितकर वळण लावलें, तरच तिच्यापासून व्यक्तीचा व समाजाचा फायदा होतो. याच प्रवृत्तीमुळें राष्ट्राचा व्यापारधंदा, शेतकी, कलाकौशल्य यांत प्रगति होते. धनलोभी, चोर, दरवडेखोर, अप्रामाणिक पेढीवाले यांच्या अनिष्ट संपादनप्रवृत्तीमुळें त्यांची व समाजाची फार हानी होते. मुलाच्या संपादनप्रवृत्तीला प्रारंभापासून इष्ट वळण देण्याची काळजी घेतली पाहिजे.

संपादनप्रवृत्तींत ‘ माझेंपणाची भावना ’ फार दांडगी असते व या भावनेच्या प्रेरणेनें संपादन करण्याकरितां मनुष्य वाटेल ते श्रम करितो. मूल वर्ष

दीड वर्षाचें होईपर्यंत त्याला मी व दुसरा याच्यांतील फरक स्पष्टपणें कळत नाहीं. मग हळू हळू त्याला टोपी, कोट, जेवण्याची ताटली वगैरे वस्तु आपल्या आहेत ही जाणीव होऊं लागते. आरंभीं जरी त्याला ' मी ' या सर्वनामाचा उपयोग करितां येत नाहीं, तरी बाबूची पोपी ( टोपी ) ' बाबूची ताटली ' असे शब्दप्रयोग मूल करूं लागतें. मूल दोन अडीच वर्षांचें झालें कीं त्याला ' मी ' या सर्वनामाचा प्रयोग करितां येऊं लागतो. मग तें ' माझी टोपी ' ' माझी ताटली ' ' माझी गाडी ' असे शब्दप्रयोग करूं लागतें. प्रत्येक मुलाची ताटली, लोटी, खेळणीं, कपडे हीं स्वतंत्र असावीं. या वस्तूंचा उपयोग त्याच मुलानें करावा म्हणजे मुलाला स्वतांच्या वस्तूंची काळजी घेण्याची संवय लागते. त्यानें आपले कपडे उचलून नीट ठेवावे, जेवतांना त्यानें आपली ताटली मांडावी व आपल्या लोटींत पाणी भरून घ्यावें. मुलाला अशी संवय लावली, तर त्याला मीपणाच्या भावनेबरोबर व्यवस्थितपणाची संवय लागेल. वडील माणसांनीं मुलांची वस्तु त्यांना न विचारतां किंवा त्यांच्याजवळून बळजबरीनें घेणें हें बरें नाहीं. ' बाळ, तुझी पेन्सील जरा मला दे पाहूं. मी आतां परत देतों, ' असें म्हणून बापानें मुलाची पेन्सिल घेतली व काम झाल्यावर ती परत दिली, तर शिस्तीच्या दृष्टीनें बापाची वागणूक अत्यंत हितकर होईल. आपली वस्तु दुसऱ्याला कांहीं वेळ दिल्यानें मुलांना, आपण दुसऱ्याचे उपयोगीं पडत आहों असें वाटून फार आनंद वाटतो. रामूजवळ त्याचा एक सुंदर रबरी चेंडू होता. त्याचा धाकटा तीन वर्षांचा भाऊ मधु रडत होता. आई रामूला म्हणाली, ' रामू, तुझा चेंडू जरा बाळाला दे व त्याला खेळव बरें. ' रामूनें आपला चेंडू आणून बाळाला दिला व बाळ त्याच्याशीं खेळूं लागला. तो चेंडू फेकी व रामू त्याला तो चेंडू परत आणून देई. असा त्यांचा खेळ १०–१२ मिनिटें चालला. आईला तो खेळ पाहून आनंद वाटला व तिनें रामूला शाबासकी दिली. असें न करितां रामू जवळून ' चल इकडे आण तो चेंडू. तो कांहीं तुझा एकट्याचाच नाहीं, ' असें म्हणून हिसकावून घेऊन आईनें तो बाळाला दिला असता, तर त्या योगानें रामूवर शिक्षणदृष्ट्या अनिष्ट असा परिणाम झाला असता. ममत्व किंवा माझेपणाची तीव्र भावना मनांत असल्याशिवाय स्वार्थत्याग, परोपकार इत्यादि चांगलें सद्गुण मुलाच्या अंगीं जडणें शक्यच नाहीं.

मुलें अगदीं लहान असतांना वस्तु संपादन करण्याचें त्यांचें एकच साधन म्हणजे वडील माणसाजवळ आपणाला पाहिजे ती वस्तु मागणें हें होय. मुलें चार पांच वर्षांचीं झालीं कीं तीं स्वतां बागेंतील फुलें, फळें, नदीकांठच्या अगर समुद्रकांठच्या शिंपा, वाळवंटांत सांपडणारे अनेक रंगांचे लहान सुंदर दगड वगैरे वस्तु गोळा करितात व त्या काळजीपूर्वक जतन करून ठेवतात व मोठ्या डौलानें त्या ज्याला त्याला दाखवितात. संचय करून ठेवण्याची ही प्रवृत्ति संपादनप्रवृत्तीचाच भाग आहे. पालकांनीं मुलांच्या या संचय करण्याच्या प्रवृत्तीला उत्तेजन दिलें पाहिजे. ‘ कांहीं तरी वेड्या वाकड्या वस्तु जमवून घरांत अडगळ केली आहेस ’ असें म्हणून मुलानें काळजीपूर्वक सांचविलेल्या शिंपा, खडे, गारगोट्या, कापडाचे तुकडे वगैरे वस्तु खिडकीच्या बाहेर भिरकावून देणें हें अत्यंत निष्ठुरपणाचें व शिक्षणदृष्ट्या अनिष्ट असें वर्तन होईल. शिक्षकांनीं व पालकांनीं अशी कृति कधींही करूं नये.

मुलांना खाऊकरितां किंवा यात्रेकरितां अथवा वाढदिवशीं अगर इतर सणावाराच्या दिवशीं थोडेसे पैसे द्यावे. त्यांचा खर्च त्यांच्या इच्छेनुरूप करावा. या पैशांतून थोडेबहुत पैसे शिल्लक टाकण्याची त्यांना संवय लावावी. यूरोपमधील व अमेरिकेंतील कांहीं शाळांतून मुलांचे शिल्लक राहिलेले पैसे ठेवण्याकरितां लहान लहान सेव्हिंग्ज ब्यांका असतात. याच पैशामधून मुलें गरीब अनाथ मुलांना कांहीं देणग्या देतात. आपल्या सांचविलेल्या पैशांतून थोड्याशा पैशाचा एखादा उपयोगी जिन्नस आईला किंवा बापाला अथवा भावाला अगर बहिणीला आणून देण्यांत मुलांना मौज वाटते. अशा प्रकारें मुलांच्या संपादनप्रवृत्तीला इष्ट वळण लागतें. मनुष्यानें श्रम करून पैसा संपादन करावा व काटकसर करून तो वाचवावा आणि त्याचा सत्कारणीं व्यय करावा ही गोष्ट व्यक्तीच्या, समाजाच्या व कुटुंबाच्या दृष्टीनें हितकारक आहे व याच दृष्टीनें लहानपणापासून मुलाच्या संपादनप्रवृत्तीला वळण लावलें पाहिजे, म्हणजे पुढें मोठेपणींहि मुलें स्वार्थी, धनलोभी किंवा अप्रामाणिक बनणार नाहींत.

# भाग १६ वा

## संवय

दिनकररावाचा मधुकर पांच वर्षांचा होता. सकाळीं आईनें हांक मारल्याबरोबर मधु आनंदानें उठे. तो आपल्या हातानें आपलें तोंड, हातपाय स्वच्छ धुऊन आईनें दिलेलें दूध घेई व मग खेळावयास जाई. नऊ वाजतां आई त्याला आंघोळीला बोलावी. आई त्याला पाणी उपसून देई. मधू आपल्या हातानें आपल्या आंगाला साबण लावी व तें अंग हातानें चोळून स्वच्छ करी. आंघोळ झाल्यावर तो आपलें अंग स्वच्छ रुमालाला पुशी व तो रुमाल धुण्याकरितां आईनें ठेवलेल्या धुण्यांत नेऊन ठेवी. जेवतांना मधुकर कधींही हट्ट करीत नसे व अन्न ताटाच्या बाहेर सांडीत नसे. मुलांशीं खेळतांना तो कोणाच्या खोड्या करीत नसे किंवा गळा काढून रडतहि नसे. रात्रीं आठ वाजतां आईनें घातलेल्या अंथरुणावर तो मुकाट्यानें जाऊन पडे व लागलींच झोंपीं जाई.

शेजारींच राहणाऱ्या वामनरावाचा मुलगा बाळू याची मधुकराच्या अगदीं उलट स्थिति होती. वामनरावाचीं पहिलीं तीन मुलें वारलीं होतीं. यामुळें वामनराव व त्यांची पत्नी राधाबाई ही बाळूचे फार लाड करीत. बाळू पांच वर्षांचा झाला होता. तो सकाळीं आईनें हाक मारल्यावरहि उठत नसे. तो जागा झाला तरी अंथरुणांत तसाच लोळत पडे. अखेरीस आई त्याला बळेंच उठवी. मग बाळोबा हातपाय आपटीत तोंड धुण्यास जात. त्यांची लहर लागल्यास ते स्वच्छ तोंड धूत, नाहींतर चार गुळण्या टाकून तसेच परत येत. मग आई त्याला दूध देई. पण बाळू बहुधा चहाचिवडा व लाडू यांजकरितां हट्ट धरून बसे. अंघोळीच्या वेळींहि तो असाच दंगा करी. जेवतांना तर कधींहि रुसल्या फुगल्याशिवाय त्याचें जेवण होत नसे. खेळतांना तो मुलांच्या खोड्या काढी व आपणच मोठा गळा काढून रडत बसे. निजतांना त्याचा असाच त्रास असे. आईला त्याला थोपटीत दहापंधरा मिनिटें बसावें लागे. मग बाळू झोंपी जाई.

या दोन मुलांच्या वागणुकींत व आवडींत इतका फरक कशानें पडला ? संवयींनीं. जन्मल्यापासून पुढें पांच वर्षें या दोन मुलांना ज्या संवयी लागल्या

त्यांच्या योगानें त्या दोघांच्या वागणुकींत इतकें महदंतर पडलें. मूल पांच सहा वर्षांचें होईपर्यंत त्याला बऱ्याच संवयी जडतात व त्या बहुधा आयुष्यभर कायम राहतात.

मनुष्याचें आचरण हें बहुतांशीं त्याच्या सहजप्रवृत्तींवर अवलंबून असतें. या सहजप्रवृत्तींना शिक्षणानें निराळें वळण देतां येतें, पण मनुष्याच्या सहज-प्रवृत्ति समूळ नष्ट करणें अथवा त्यांना दाबून टाकणें हें शक्य नसतें. मूल जन्मास आल्यावर त्याच्या कांहीं सहजप्रवृत्ति काम करूं लागतात व त्यांच्या प्रेरणेनें चोखणें, गिळणें, रडणें, पिणें इत्यादि क्रिया मूल करूं लागतें. कांहीं दिवसांनीं मुलाच्या जिज्ञासा, कृतिप्रियता इत्यादि सहजप्रवृत्ति व खेळ, अनुकरण इत्यादि स्वाभाविकवृत्ति जागृत होतात व काम करूं लागतात. मुलाच्या ज्ञानांत जसजशी भर पडते व वडील माणसें जसजसें त्याला शिक्षण देत जातात, तसतसें मुलाच्या सहजप्रवृत्तींना व स्वाभाविकवृत्तींना इष्ट तें वळण लागतें. या सर्व गोष्टींचें विवेचन मागील कांहीं लेखांत केलेंच आहे.

सहजप्रवृत्तीमुळें किंवा स्वाभाविक वृत्तीमुळें क्रिया करीत असतांना मुलाला एखादी संवय कशी लागते, हें आपण कांहीं उदाहरण घेऊन पाहूं. मधूला अगदीं पहिल्या दिवसापासून त्याच्या आईनें नेमलेल्या ठराविक वेळीं पाज-ण्याचा क्रम ठेविला. या वेळांखेरीज मध्यंतरीं जरी तो जागा होऊन रडला, तरी ती त्याला पाजीत नसे. पुढें आई मधूला गाईचें दूध जरी पाजूं लागली, तरी ती तें ठराविक वेळींच पाजीत असे. ती त्याला ठराविक वेळींच न्हाऊं घालीत असे. मधू रडला कीं लगेंच त्याला उचलावयाचें व अंगावर पाजा-वयाचें, असें तिनें कधींच केलें नाहीं. यामुळें मधू जागा झाल्यावर रडत नसे. हातांत आईनें दिलेलें खेळणें घेऊन तो त्याच्याशीं खेळत पडत असे. पुढें तो जेऊं लागल्यावर देखील नियमित वेळीं त्याला जेऊं घालण्याची आई काळजी घेत असे. एकदां तो जेवत असतांना त्यानें लाडूकरितां हट्ट घेतला. आईनें 'तुला उद्यां लाडू देईन. आतां लवकर जेव. आपणांला भूर ( बाहेर ) जावयाचें आहे' असें सांगून त्याचें लक्ष दुसरीकडे लावलें. जेव्हां मधू एखाद्या-वेळीं कांहीं भलताच हट्ट धरी तेव्हां त्याची आई किंवा बाप अशाच प्रकारें त्याची समजूत घालीत असे.

बाळूची आई अगदीं पहिल्या दिवसापासून तो जरा रडला कीं त्याला मांडीवर घेई व त्याला पाजी. यामुळें जागें झालें कीं रडावें व प्यावें अशी संवय बाळूला लागली. पुढें तो तीन महिन्यांचा झाल्यावर देखील तो जागा झाल्यावर रडून दंगा करी व त्याची आई हातांतील काम टाकून त्याला मांडीवर घेई अथवा इकडे तिकडे फिरवी. यामुळें बाळूला स्वतंत्रपणें खेळण्याची संवयच लागली नाहीं. उलटपक्षीं वाटेल तेव्हां पिण्याची व आपलाच हट्ट चालविण्याची संवय त्याला अगदीं लहानपणींच जडली व तीच पुढें बळावली.

अगदीं लहानपणीं सहजप्रवृत्तीच्या प्रेरणेनें मुलाच्या हातून एखादी कृति घडते. ती कृति केल्यानें जर त्याला आनंद किंवा सुख वाटलें, तर मूल पुन्हा तीच कृति करतें. अशा प्रकारें ती कृति पुन्हा पुन्हा केल्यानें मुलाला ती कृति करण्याची संवय जडते. पुढें मुलाच्या ज्ञानांत भर पडत जाते, त्याला हळूहळू विचार करितां येतो. यामुळें तें विचारपूर्वक एकादी कृति करतें. त्या कृतीपासून त्याला आनंद किंवा सुख झालें, तर मूल तीच तीच कृति पुन्हा पुन्हा करितें, व लवकरच त्याला त्या कृतीची संवय जडते.

मनुष्याचें सर्व आयुष्य त्याला जडलेल्या संवयींवर अवलंबून असतें. अमेरिकेंतील प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञ प्रो. जेम्स म्हणतात, 'आपल्या कृतींपैकीं शेंकडा ९९ नव्हे तर हजारांतील ९९९ कृति संवयींवर अवलंबून असतात.' सुविचार, सदाचार, सद्गुण, दुर्गुण, सदभिरुचि या सगळ्या गोष्टी संवयींवर अवलंबून आहेत. मनुष्यानें पुन्हा पुन्हा एखादी कृति केल्यानें तिची त्याला संवय होते. अशा प्रकारें जडलेल्या अनेक संवयींनीं त्याचें शील बनतें. कृति, संवयी व शील यांतील हा निकट संबंध पालक व शिक्षक यांनीं नीट लक्षांत ठेविला पाहिजे. मूल पांच वर्षांचें होईतोंपर्यंत त्याच्या, जवळ जवळ अर्ध्या संवयी दृढ होतात व त्या सर्व आयुष्यभर टिकतात. याकरितां पालकांनीं व शिक्षकांनीं मुलांना चांगल्या संवयी लागाव्या म्हणून फार जपलें पाहिजे.

मुलाला चांगल्या संवयी लावण्याला सुरुवात अगदीं पहिल्या दिवसापासूनच झाली पाहिजे. मुलाला ठराविक वेळीं जी आई पाजते, ठरलेल्या वेळीं न्हाऊं घालते ती त्याला व्यवस्थितपणाची संवय लावते. मूल पांचसहा महिन्यांचें

झालें कीं त्याचें खाणें, पिणें, शौचाची व्यवस्था, त्याचे कपडे पालटणें, त्याला बाहेर नेणें, वगैरे गोष्टी अगदीं नियमित वेळीं झाल्या पाहिजेत. लहान मुलांना नियमितपणाच्या संवयी लाविल्या, तर १-१॥ वर्षाचीं मुलें लघवी करून कपडे भिजवीत नाहींत, किंवा भलत्याच ठिकाणीं भलत्याच वेळेला शौचानें कपडे किंवा जागा घाण करीत नाहींत. अनियमितपणें पाजणें, भलत्याच वेळीं खाऊ घालणें, शौचाला वेळेवर न बसविणें, वेळेवर न निजविणें इत्यादि गोष्टींमुळें मुलांना ज्या अनियमितपणाच्या संवयी लागतात त्या आयुष्यभर टिकतात. लाडांमुळें मुलाला वाटेल तेव्हां उचलून घेणें व मांडीवर किंवा कडेवर घेऊन तासच्या तास त्याला खेळवीत बसणें या योगानें मुलाला अप्पलपोटेपणाची व हेकेखोरपणाची संवय लागते. मूल जागें झालें कीं त्याला घेतलेंच पाहिजे असें नाहीं. त्यानें स्वतां खेळावें ही गोष्ट फार इष्ट आहे. ५।६ महिन्यांचें मूल झालें कीं त्याच्या हातांत रंगीत व त्याला इजा होणार नाहीं असें खेळणें दिलें, तर तें त्याच्याशीं खुशाल खेळतें. मुलाला जर स्वतंत्रपणें खेळण्याची संवय लावली, तर त्याला व्यायामही चांगला मिळतो. असें मूल जर त्याचें कांहीं दुखत असलें, तरच किरकिर करतें व रडतें. एरवीं तें आनंदांत खेळत असतें.

मूल दीड दोन वर्षांचें झालें कीं, वडील माणसें ज्या सूचना करितात, त्या ग्रहण करण्याची त्याची स्वाभाविकवृत्ति काम करूं लागते. या त्याच्या सहज-वृत्तीचा फायदा त्याला चांगल्या संवयी लावण्याचे कामीं आईबापांनीं अवश्य करून घेतला पाहिजे. गोडीगुलाबीनें सांगून एखादी कृति मुलानें केली कीं, तें दुसऱ्या वेळींही ती कृति सहज करतें व अशा प्रकारें त्याच्या हातून ती कृति नियमित वेळीं व ठरलेल्या प्रसंगीं होत गेली कीं, ती करण्याची त्याला संवय लागते. अगदीं लहानपणीं आपण ही कृति कां करीत आहों, हें मुलाला कळत नाहीं, पण मूल जसजसें मोठें होतें तसतसें आपल्या कृतीचा परिणाम व हेतु यांचें त्याला ज्ञान होऊं लागतें.

मुलाला एखादी चांगली संवय लागत नसेल, तर ती कां लागत नाहीं याचा काळजीपूर्वक विचार केला पाहिजे व ज्या कारणामुळें ती संवय लागत नसेल तें कारण नाहींसें करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. नुसता धाक दाखवून

किंवा बळें दळें एखादी कृति करून घेतल्यानें तिची मुलाला संवय लागणें शक्य नाहीं. पुष्कळ वेळ आईबाप कारण शोधण्याच्या भरीसच पडत नाहींत. कांहीं आईबाप ' जाऊं द्या, मुलाला कळूं लागलें कीं आपोआप त्याला चांगली संवय लागेल, ' असें म्हणून स्वस्थ बसतात. कांहीं आईबाप रागावून, किंवा शिक्षा करून मुलाला इष्ट ती कृति करावयास लावतात. या योगानें मुलाला त्या कृतीची संवय तर लागत नाहींच, पण त्या कृतीबद्दल तिटकारा मात्र त्याच्या मनांत उत्पन्न होतो व संधि साधली कीं ती कृति करण्याचें तें तेव्हांच सोडून देतें.

एखादी कृति नियमितपणें कांहीं दिवस केल्यानें तिची संवय लागते. ती कृति जर नियमितपणें केली नाहीं, तींत कांहीं दिवसांचा खंड पडला, किंवा कधीं ती कृति करावी, कधीं करूं नये असें झालें, तर त्या कृतीची संवय मनुष्यास होत नाहीं. म्हणूनच तोंड धुणें, स्नान करणें, व्यवस्थितपणें जेवणें, जेवणाचे पूर्वी व नंतर तोंड व हात स्वच्छ धुणें, स्वच्छ पाणी पिणें, उष्टें न खाणें, बोबडें न बोलणें, मुलांशीं मिसळून आनंदानें खेळणें, खेळ झाल्यावर सामान उचलून जागेवर ठेवणें या संवयी मुलांना लहानपणापासूनच काळजीपूर्वक लाविल्या पाहिजेत.

प्रथम एखादी गोष्ट करण्याला त्रास पडतो व विचार करावा लागतो. पण त्याच गोष्टीची संवय लागली कीं ती त्रासाशिवाय सहज करतां येते व तिजबद्दल विचारही करावा लागत नाहीं. ताटाच्या बाहेर शितें न सांडतां जेवण्याला पहिल्यानें मुलाला त्रास पडतो, पण कांहीं दिवस गेल्यावर शितें न सांडतां जेवण्याचा कृति सहज त्याच्या हातून घडते. तें एकीकडे बोलत असतें व एकीकडे जेवत असतें, तरी त्याचा भात ताटलीच्या खालीं सांडत नाहीं. संवयीचा परिणाम इतका जोरदार असतो कीं, ठरलेल्या वेळीं ठरलेली कृति न केली, तर मुलाला चैनच पडत नाहीं. ज्याला लवकर निजण्याची संवय आहे त्या मुलाला फार वेळ जागें राहवत नाहीं. तें जांभया देऊं लागतें व कशांतही त्याचें चित्त लागत नाहीं. वडील मंडळींनीं मुलाच्या या वृत्तीकडे लक्ष दिलें पाहिजे. मुलांच्या नेहमींच्या आयुष्यक्रमांत विनाकारण बदल कधीं करूं नये. या योगानें लहान मुलांना निष्कारण फार त्रास होतो. निजण्याची जागा बद-

लणें, जेवण्यास दररोजचे पदार्थ न देतां दुसरेच कांहीं तरी देणें वगैरे कृतींनीं मुलांना फार त्रास होतो. घराची दुरुस्ती होत असतांना एका चार वर्षांच्या लहान मुलाला त्याच्या नेहमींच्या खोलींत न निजवितां दुसऱ्या एका खोलींत नेलें, पण तेथें त्याला दोन तीन दिवस चांगली झोंप आली नाहीं. त्याला जेव्हां त्याच्या जुन्या खोलींत निजविलें तेव्हां तें गाढ झोपीं गेलें व साऱ्या रात्रींत तें उठलें नाहीं.

एखादी कृति करण्याची संवय झाली कीं, ती कृति कुशलतेनें व सहज करितां येते. मग ती करीत असतांना तिच्याकडे फारसें लक्षहि द्यावें लागत नाहीं किंवा फारसा विचारही करावा लागत नाहीं. संवयीनें अशा प्रकारें आपली कृति चांगली होऊन ती करितांना आपली प्रवर्तकशक्ति व विचारशक्ति यांचा फारसा उपयोग करावा लागत नाहीं. एक उदाहरण घेऊन ही गोष्ट स्पष्ट करूं. मूल जेव्हां पहिल्यानें चालावयास शिकतें तेव्हां त्याला आपलें सारें लक्ष चालण्याकडे द्यावें लागतें. त्याला आपण पडूं अशी भीति वाटत असते व त्याला आपला तोल सांभाळण्यास फार त्रास पडतो. तें मूल या बाजूला किंवा त्या बाजूला कलंडत असतें. प्रारंभीं त्याला फार थोडीं पावलें एका दमांत चालतां येतात. हळू हळू त्याला चालण्याची संवय होते, मग त्याला आपल्या पायाकडे लक्ष देण्याचें कारणच पडत नाहीं. यदाकदाचित् वाटेंत कांहीं अडथळा आला, तरच त्याला तिकडे लक्ष द्यावें लागतें. चालण्याची संवय झाल्यावर मुलाला चांगलें व झरझर चालतां येतें. अशाच प्रकारें मुलाला जेवण्याची, तोंड धुण्याची, स्नान करण्याची, कपडे काढण्याची व घालण्याची संवय लागली कीं तें ती कृति कुशलतेनें, जलद व सहज करितें. मुलाला कोणताही खेळ खेळण्याची संवय झाली कीं तें तो खेळ मोठ्या कुशलतेनें खेळूं लागतें.

कांहीं कांहीं कृति वर दिलेल्या कृतीइतक्या सोप्या नसतात. त्यांत प्रत्येक वेळीं विचार करावा लागतो. लिहिणें, वाचणें, चित्रें काढणें, गणित करणें वगैरे क्रिया करतांना थोडा फार तरी विचार करावा लागतोच. तथापि संवयीनें या क्रियाही अगदीं थोडा विचार करून कुशलतेनें व जलद करितां येतात. प्रारंभीं वाचावयाला मुलाला किती त्रास पडतो ! तसेंच लिहिण्याचाही त्याला फार त्रास पडतो. नवीन शिकणाऱ्या मुलाला एखादा शब्द लिहिण्यास

सांगितला म्हणजे तें प्रत्येक अक्षराचा विचार करून सावकाश, लिहीत असतें. त्याचें सर्व लक्ष त्याच्या लिहिण्याकडे असतें, पण त्याला लिहिण्याची बरीच संवय झाली म्हणजे फारसा विचार न करितां व लक्ष न देतां, सहज त्याला लिहितां येतें. संवयीच्या योगानें कोणतीही क्रिया फारसा विचार न करितां किंवा प्रवर्तक-शक्तीचा फारसा व्यय न करितां सहज करितां येते व ती थोड्या वेळांत व कुशलतेनें करितां येते, हा संवयीचा फार मोठा फायदा आहे.

कांहीं मुलांना स्वतां एखादी विशिष्ट कृति करण्याचा कंटाळा येतो. आपणांस पोशाक, आईनें किंवा भाऊनें घालावा, आईनें भरवावें, ताईनें स्नान घालावें अशीच त्यांची इच्छा असते. अशा मुलांना रागें भरून किंवा शारीरिक शिक्षा करून कांहीं फायदा होत नाहीं. मुलाच्या स्तुतिप्रियता, कृतिप्रेम, स्पर्धा वगैरे कोणत्या तरी सहजप्रवृत्तींचें साहाय्य घेऊन ती कृति मुलाकडून करवून त्या कृतीची त्याला संवय लाविली पाहिजे. गणपतरावाचा वसंत पांच वर्षांचा होता. खेळ खेळल्यानंतर खेळाचें सामान उचलून पेटींत ठेवण्याचा त्याला फार कंटाळा असे. त्याला बापानें व आईनें किती जरी सांगितलें, तरी तो तें सामान उचलीत नसे. अनेक उपाय केले, तरी त्याची ही खोड जाईना. कांहीं दिवसांनीं गणपतरावची बहीण शांताबाई ही आपला शरद याच्यासह माहेरीं राहण्यास आली. शरद हा वसंताच्याच वयाचा होता. दुसरे दिवशीं शरदनें आपल्या खेळण्याचे जिन्नस वसंताला दाखविले. वसंत व शरद दोघेही कांहीं वेळ खेळले. खेळ संपल्यावर शरदनें आपले सर्व जिन्नस पेटींत व्यवस्थेशीर ठेविले. गणपतरावानें तें पाहून शरदची स्तुति केली व त्याला शाबासकी दिली. तें पाहून वसंतनेंही आपले खेळाचे जिन्नस उचलून आपल्या पेटींत ठेवून दिले. तेव्हांपासून खेळाचे जिन्नस इकडे तिकडे टाकण्याची त्याची वाईट खोड नाहींशी झाली. कित्येक वेळां अंतःकरण जरा कठोर करून मुलाला चांगली संवय लावावी लागते. चार वर्षांचा दिनकर अंगणांत खेळून हातपाय न धुतां जेवण्यास येऊन बसला. आईनें 'नळावर जा व स्वच्छ हातपाय धुऊन ये' म्हणून त्याला दोन तीन वेळां सांगितलें, पण त्यानें तें ऐकिलें नाहीं. 'हातपाय धुतल्याशिवाय तुला जेवावयास मिळणार नाहीं' असें म्हणून आईनें, दिनकरचें ताट उचलून झांकून ठेविलें. आईचा करारी स्वभाव दिनकरला माहीत होता. कांहीं वेळ तो तसाच पाटावर बसला. मग मुका-

त्यानें नळावर गेला व हातपाय धुऊन आला. आईनें त्याचें ताट आणून ठेविलें व दिनकर लागलीच जेवूं लागला.

ज्या कुटुंबांत व्यवस्थितपणा, नीटनेटकेपणा, स्वच्छता व नियमितपणा यांजबद्दल विशेष काळजी घेतली जाते, त्या कुटुंबांतील मुलांना नीटनेटकेपणाची, स्वच्छतेची, नियमितपणाची व व्यवस्थितपणाची संवय साहजिकपणेंच लागण्याचा फार संभव असतो. कुटुंबांतील सुव्यवस्थेमुळें चांगल्या संवयी लागण्याचा जितका संभव असतो, त्याजपेक्षां कुटुंबांतील अव्यवस्थेमुळें मुलाला वाईट संवयी लागण्याचा जास्त संभव असतो. अस्वच्छता, अनियमितपणा, अव्यवस्थितपणा, असभ्य भाषण, अशुद्ध भाषा, आप्पलपोटेपणा, अप्रामाणिकपणा वगैरे वाईट संवयी मुलांना कुटुंबांतील वडील माणसांच्या आचरणामुळें व सहवासामुळें लागतात. मुलांना चांगल्या संवयी लागाव्या, म्हणून आईबाप व कुटुंबांतील इतर मंडळी यांनीं आपले आचार व विचार फार शुद्ध ठेवले पाहिजेत. मुलांना संवयी जडण्याच्या कामीं पालकांच्या आचरणाचा जितका परिणाम होतो तितका त्यांच्या उपदेशाचा होत नाहीं.

मुलाला आपली आई अगदीं लहानपणींच आवडूं लागते. प्रेमळ व मायाळू आईच्या सहवासांत मुलाचें तिच्यावरील प्रेम वाढत जातें. तिची आज्ञा पाळावयाची, ती सांगेल त्याप्रमाणें वागावयाचें, तिच्या दुःखानें दुःखित व्हावयाचें, तिच्या सुखानें आनंदित व्हावयाचें अशी संवय मुलाला लागली कीं मातृप्रेम ही स्थिर मनोवृत्ति ( Sentiment ) मुलाच्या मनांत दृढ होते. मातृप्रेम, पितृप्रेम, बंधुप्रेम, भूतदया, परोपकार, स्वदेशाभिमान, स्वधर्माभिमान वगैरे अनेक उच्च स्थिर मनोवृत्ति विचाराच्या व आचाराच्या संवयीमुळेंच मनुष्याला जडतात. सारांश, सदाचार, सुविचार, व सद् मनोवृत्ति हीं सर्व संवयीचींच फळें होत. उलटपक्षीं, कुविचार, दुराचार व अनिष्ट भावना हींही संवयीचींच फळें होत.

मुलाला चांगल्या संवयी लावणें जसें अवश्य आहे, तसेंच त्याला लागलेल्या वाईट संवयी मोडून काढणें हेंही अवश्य आहे. वाईट संवयी केव्हां व कशा लागतील हें सांगतां येत नाहीं. अमुक एक वाईट आहे व ती आपल्या अंगीं आहे हें पुष्कळ वेळां ती संवई असणाऱ्या मुलाला कळत नाहीं. यामुळें ती

खोड मोडून टाकण्याचा प्रयत्नही त्याजकडून होत नाहीं. तोंडांत बोट घालणें, दांतांनीं नखें कुरतडणें, पेन्सिल तोंडांत घालणें, सदऱ्याच्या बाहीला नाक पुसणें, पाटीला थुंकी लावणें, लिहितांना शाई झटकणें, लाडानें बोबडें बोलणें, अंगांतील कपडे काढून अव्यवस्थित टाकणें इत्यादि कितीतरी वाईट संवयी मुलांत असतात. मुलाला समजत असेल, तर त्याच्या खोडीचा वाईट परिणाम किती होतो हें त्याला समजावून द्यावें. मूल लहान असल्यास युक्तीनें त्याची संवय नाहींशी करावी लागते. शारीरिक दोषांमुळें कांहीं वाईट संवयी लागतात, त्या दूर करण्याचे कामीं वैद्याचा सल्ला घेतला पाहिजे. दोन वर्षांच्या मुलाला बोट तोंडांत घालण्याची संवय असली व त्याच्या बोटास सागरगोटा उगाळून लावला, तर त्याची ती खोड नाहींशी होते. सारांश, वाईट संवयी नाहींशा करण्यास पालकांना व शिक्षकाला विचार करून योग्य उपाय योजावा लागतो. मुलाला चांगली संवय लावतांना आईबापांनीं फार जपलें पाहिजे. संवय शांतपणें लावली पाहिजे. आरडाओरड करून, दंगा करून किंवा रागावून मुलाला संवय लावण्याचा प्रयत्न केला, तर त्याचा परिणाम फार अनिष्ट होतो. राधाबाईचा बाबू दीड वर्षांचा होता. बाबूनें नियमित वेळीं व ठरलेल्या ठिकाणीं शौचाला बसावें व तशी त्याला संवय लागावी अशी त्यांची फार इच्छा असे. सकाळीं ७ वाजतां त्या बाबूला पडवींत पायावर घेऊन बसत व अर्धा अर्धा तास त्याला पायावर बसवीत. बाबूला आपल्या आईचा हा जुलूम आवडत नसे. तो एकसारखा रडत व ओरडत असे. राधाबाई कंटाळून त्याच्या पाठींत थप्पडही देत. याचा परिणाम असा झाला कीं बाबूला शौचाची भीति वाटूं लागली. तीन दिवस त्याला परसाकडेसच झाली नाहीं. त्याला ताप आला. दामोदरपंतांना डॉक्टरला बोलावून बाबूला औषधोपचार करावा लागला. तेव्हांपासून बाबूला वाटेल तेथें शौचविधि उरकण्याची परवानगी मिळाली व घाणेरडेपणाची व अव्यवस्थितपणाची त्याला संवय लागली.

वाईट संवयी मोडण्याला धाक, दपटशा व शिक्षा यांचा उपयोग होत नाहीं. कोणत्या कारणामुळें वाईट संवय मुलाला लागली आहे, हें शोधून काढलें पाहिजे. वाईट संवय लागण्याला मुलाच्या मनांतील एखादा मनोविकारच कारण असतो. हा मनोविकार नाहींसा झाल्याशिवाय ही संवय नाहींशी होत नाहीं. मुलाला वाटेल तेथें अंगांतील कपडे फेकून देण्याची संवय असली,

तर त्या ऐवजीं ते कपाटांत व्यवस्थित ठेवण्याची संवय लाविली पाहिजे. मुलें आप्पलपोटी असतील, तर त्यांना मांजर, कुत्रा, किंवा पोपट पाळण्यास दिला पाहिजे. मुलाला बाहीला नाक पुसण्याची संवय असल्यास, नाक शिंकरून नंतर तें रुमालानें साफ करण्याची संवय लाविली पाहिजे. नखें कुरतडण्याची संवय मुलांना असेल, तर त्या ऐवजीं नखें व्यवस्थित कापण्याची व त्यांत मळ न साचूं देण्याची संवय त्यांना लाविली पाहिजे. सारांश, वाईट खोड काढून टाकण्यास, त्याच्या उलट असणारी चांगली संवय लावणें हेंच मुख्य साधन आहे. संवयींच्या संबंधानें महत्त्वाच्या गोष्टी पुन्हा एकदा सांगून हा लांबलेला भाग पुरा करूं.

१ एक कृति नियमितपणें अनेक वेळा केल्यानें तिची संवय लागते. अनेक संवयींमुळें मनुष्याचें शील बनतें.

२ मूल पांच सहा वर्षांचें होईपर्यंत त्याला बऱ्याच संवयी लागतात; व त्या पुढील आयुष्यांत बहुधा कायम राहतात.

३ सुविचार, सदाचार, उच्च मनोवृत्ति या सर्व संवयींवरच अवलंबून असतात.

४ एखादी कृति करण्याची संवय झाली म्हणजे ती कृति लवकर व कुशलतेनें करितां येते. ती करण्याला विचारशक्ति व प्रवर्तक शक्ति यांचा कमी उपयोग करावा लागतो. हा संवयीचा फार मोठा फायदा आहे.

५ कुटुंबांतील माणसांच्या आचरणानें व सहवासानें मुलास पुष्कळशा बऱ्या अथवा वाईट संवयी लागतात.

६ मुलांना चांगल्या संवयी लावणें व त्यांच्या वाईट संवयी मोडून टाकणें हें आईबापांचें व शिक्षकांचें कर्तव्य आहे.

७ मुलांना संवय लावतांना ती शांतपणें व काळजीपूर्वक लावली पाहिजे.

# भाग १७ वा.

## मनोविकार आणि स्थिरमनोवृत्ति

अगदीं लहानपणीं म्हणजे साधारणपणें चौथ्या वर्षापर्यंत मुलाचे मनोविकार जोरदार असतात; राग, भीति, मत्सर व प्रेम हेच मनोविकार या वयांतील मुलांत विशेषतः दिसून येतात. शरीरपोषणाला आवश्यक अशा ज्या सहजप्रवृत्ति त्यांजवरच हे मुलांचे मनोविकार अवलंबून असतात. आई मुलाला पाजते, मांडीवर घेऊन थोपटते, पाळण्यांत घालून झोके देऊन निजविते, अशा प्रकारें ती मुलाच्या पोषणाचें व रक्षणाचें कार्य करते, म्हणूनच ती मुलाला आवडते व या आवडीचें रुपांतर प्रेमांत होतें.

लहान मुलाचे मनोविकार तात्काळ उत्पन्न होतात, ते फार जोरदार असतात, पण ते शांत होण्यालाही फारसा वेळ लागत नाहीं. मधू एक वर्षाचा असतांना एके दिवशीं त्याच्या आईनें त्याला न्हाऊं घालून पाळण्यांत निजविलें व ती आपल्या बहिणीच्या घरीं तिला भेटण्यास गेली. तिला तिकडे बराच वेळ लागला. इकडे कांहीं वेळानें मधू जागा झाला. मधूला भूक लागली होती. त्याला आईच्या अंगावर पिण्याची इच्छा झाली. पण आई जवळ नव्हती, म्हणून त्यानें रागानें मोठ्यानें रडण्यास सुरुवात केली. विमलनें त्याला खेळावयास चेंडू दिला, पण त्यानें रागानें तो फेकून दिला. तिनें त्याला अंगणांत नेऊन चिमणी, कावळा व मांजर हीं दाखविलीं, पण मधू तिकडे मुळींच लक्ष देईना. तो एकसारखा ‘ आई आई ’ करून रडत होता. इतक्यांत त्याची आई घरीं आली. आईनें त्याला घेतलें व घरांत नेलें. तिनें त्याला मांडीवर घेऊन पाजण्यास सुरुवात केली. मधूचा राग ताबडतोब नाहींसा झाला व तो आईबरोबर हसूं लागला व थोड्याच वेळांत विमल बरोबर आनंदानें खेळूं लागला.

मधू दीड वर्षांचा होता. तो आईजवळ खेळत होता. जवळच त्याच्या मावशीची मुलगी लिली हीही खेळत होती. आईनें लिलीला मांडीवर घेतलें व ती मधूला म्हणाली, ‘ मधू, ही लिली माझें बाळ आहे. ती मला फार आवडते.’ असें म्हणून आईनें तिचा एक मुका घेतला. या योगानें मधूचे

मनांत मत्सर उत्पन्न झाला व त्याला लिलीचा फार राग आला. तो झटकन् लिली जवळच आला व तिच्या हाताला चावला. मग लिली मोठ्यानें रडूं लागली. आईनें लिलीला खाऊ देऊन कशी तरी तिची समजूत केली. मधोबा मोठ्यानें रडतच होते. इतक्यांत मावशी आली. तिनें पेढ्यांचा पुडा आणला होता. तो खाऊ तिनें मधूला दाखविला. मग मधू व लिली दोघेंही तिच्या मांडीवर बसलीं व दोघेंही पेढा हातांत घेऊन हसूं लागलीं. पेढा खाल्यानंतर दोघेंही आनंदानें खेळूं लागलीं.

सहजप्रवृत्तीचा विचार करितांना आपण पाहिलेंच आहे कीं, प्रत्येक सहज-प्रवृत्तींत एक ठरलेला मनोविकार असतो. त्या मनोविकाराच्या प्रेरणेमुळेंच मनुष्याच्या हातून क्रिया होत असते. भीति, राग, तिटकारा, वत्सलता वगैरे मनोविकारांचा आपण विचारही केला आहे. प्रत्येक मनोविकारानें मनुष्याच्या मनांत सुख दुःख किंवा सुखदुःखाचें मिश्रण होत असतें. मनोविकारांत सुख-दुःखादि भावना तीव्र स्वरूपाच्या असतात. या मनोविकारामुळें मनुष्याच्या मुद्रेंत फरक पडतो. रुधिराभिसरण, श्वासोच्छ्वास वगैरे शारीरिक क्रियांवरही मनोविकाराचा परिणाम होतो. मनोविकारामुळें मनुष्य मुठी वळणें, हातपाय आपटणें, वगैरे शारीरिक क्रियाही करतो. सहजप्रवृत्तींमुळें मनोविकार उत्पन्न होतो. मनोविकारामुळेंच मनुष्याच्या हातून क्रिया घडते.

भीति, राग, मत्सर, हे मनोविकार प्रबळ झाले, तर त्यांचा शरीरावर व मनावर किती वाईट परिणाम होतो हें मागें सांगितलेंच आहे. भीति व राग या मुलांच्या मनोविकारांना योग्य वळण कसें लावावें याचें विवेचन सहज-प्रवृत्तींचा विचार करितांना केलेंच आहे.

सहजप्रवृत्तींत कोणता तरी एक मनोविकार असतो. या मनोविकाराच्या प्रेरणेनें मूल एखादी क्रिया करिते. त्या क्रियेपासून त्याला सुख झालें, तर ती क्रिया तें पुन्हा पुन्हा करितें. अशा प्रकारें त्याच्या त्या सहजप्रवृत्तीला व्यव-साय मिळाला कीं ती सहजप्रवृत्ति प्रबल होते व तिच्यांतील मनोविकारही प्रबल होतो. ही गोष्ट उदाहरणांनीं स्पष्ट करूं.

गोविंदराव व त्यांची पत्नी राधाबाई आपल्या रामूचे फार लाड करीत असत. रामू तीन वर्षांचा असतांना गोविंदरावांनीं त्याजकरितां एक बिस्कि-

टांचा पुडा आणला व त्यांतील एक बिस्किट त्याला खावयास दिलें. तें रामूला फार आवडलें. रामूनें तें खाऊन टाकलें व आणखी एक बिस्किट बापाजवळ मागितलें. मुलाला बिस्किटें पचणार नाहींत म्हणून गोविंदराव त्याला बिस्किट देईनात. हें पाहून रामूला फार राग आला. तो हात आपटूं लागला व मग त्यानें मोठ्यानें गळा काढला. बापानें त्याला शांत करण्याकरितां आणखी एक बिस्किट दिलें. रामू चार वर्षांचा असतांना त्यानें शेजारच्या मुलाचा रंगित चेंडू पाहिला. त्यानें बापाजवळ चेंडू मागितला. त्याचा बाप देवपूजा करीत होता. बापानें त्याला सांगितलें 'रामू, मी तुला संध्याकाळीं चांगला चेंडू घेऊन येईन ' पण रामूला तें पटलें नाहीं. त्याला फार राग आला व रागानें त्यानें मोठा गळा काढला व दंगा करण्यास प्रारंभ केला. बिचाऱ्या गोविंदरावानें कशीबशी पूजा संपविली व बाजारांत जाऊन चिरंजिवाला एक चेंडू आणला. आईबापांच्या अशा वागण्यानें रामूचा राग हा मनोविकार वाढत गेला. तो फार तामसी बनला. मोठेपणींही हा त्याचा तामसीपणा जाणार नाहीं.

याच्या उलट स्थिति मधूची आहे. त्याचे वडील दिनकरराव हे एकदां बाहेर जावयास निघाले. मधू चार वर्षांचा होता. त्यानें टोपी डोक्यांत घातली व तो म्हणाला, ' बाबा, मला भूर न्या. ' त्याचा बाप त्याला म्हणाला, 'मधू, मी आतां कामाला जातों. मग संध्याकाळीं तुला बागेंत नेईन व नवीन चेंडू आणून देईन. ' मधूचा बापावर विश्वास होता. ' नाहीं ' म्हटल्यावर आपला बाप आपणांला बाहेर नेणार नाहीं हें त्याला माहीत होतें. ' बाबा मला बागेंत नेणार आहेत व चेंडू देणार आहेत, असें दुपारीं ज्याला त्याला तो सांगत होता. संध्याकाळीं त्याचे वडील घरीं आले. मग मधूला घेऊन ते बागेंत गेले व त्यांनीं त्याला नवीन चेंडू विकत घेऊन दिला. मधूला याप्रमाणें आत्मसंयमन करण्याची व आपला राग ताब्यांत ठेवण्याची संवय लागली.

मुलाच्या सहजप्रवृत्तीला इष्ट असें वळण लागलें कीं, त्या प्रवृत्तींत असणारा जो मनोविकार त्यालाही इष्ट वळण लागतें व योग्य संधि मिळाल्यामुळें तो मनोविकार दृढ होत जातो. चौथ्या वर्षापासून मुलाची जिज्ञासा, कृति, प्रेम, स्तुतिप्रियता, स्वतांच्या गुणाचें व वस्तूचें प्रदर्शन करण्याची प्रवृत्ति,

वत्सलता वगैरे प्रवृत्ति जोरदार होऊं लागतात. मुलांच्या या सहजप्रवृत्तींना कार्य करण्याची योग्य संधि पालकांनीं आणून दिलीं पाहिजे, म्हणजे त्या प्रवृत्तींत असणारा मनोविकार दृढ करण्याचें कार्यही होईल. खेळणीं, लाकडी घण, मेक्यानोसारखीं खेळाचीं साधनें देणें. बाग, मळे, कुरणें, नदी किनारा पशु संग्रहालय वगैरे ठिकाणीं मुलांना घेऊन जाणें; मुलांच्या प्रश्नांचीं उत्तरें देणें इत्यादि उपायांनीं मुलांच्या जिज्ञासा या सहजवृत्तीला इष्ट असें वळण कसें लागतें व त्या सहजप्रवृत्तींतील मनोविकार जो कुतूहल तो योग्य प्रकारें कसा दृढ होत जातो याचें विवेचन मागील भागांत केलें आहे.

सहजप्रवृत्तीमुळें मूल एखादी क्रिया करितें. ती क्रिया सुखदायक झाली, तर तीच क्रिया मूल पुन्हा पुन्हा करतें. यामुळें त्या सहजप्रवृत्तींत असणारा मुलाचा मनोविकार दृढ होत जातो. अशा प्रकारें मुलाच्या मनांतील राग, भीति, तिटकारा, कुतुहल, दया, प्रेम, द्वेष, वगैरे मनोविकार दृढ होत जातात. कोणतीही सहजप्रवृत्ति स्वाभाविकपणें वाईट नाहीं. ती चांगल्या मार्गाकडे लाविली, तर त्या योगानें व्यक्तीचें व समाजाचें हित होतें. ती जर वाईट मार्गाकडे लागली, तर ह्या योगानें व्यक्तीचें व समाजाचें नुकसान होतें. हीच गोष्ट बहुतेक मनोविकारांना लागूं आहे. ज्या मनोविकाराच्या प्रेरणानें झालेल्या कृतींचा परिणाम व्यक्तीला व समाजाला हितकर होतो, तो मनोविकार चांगला. अन्यायाचा राग हा मनोविकार चांगला, कारण त्या योगानें व्यक्तीचें व समाजाचें कल्याण होतें. मत्सर हा मनोविकार वाईट, कारण त्या योगानें समाज व व्यक्ति या दोहोंचेंही अकल्याण होतें.

एखाद्या सहजप्रवृत्तीमुळें एखाद्या माणसाबद्दल कांहीं दिवस एकसारखा एक मनोविकार उत्पन्न होत गेला व त्या मनोविकाराच्या प्रेरणेमुळें तीच तीच कृति होत गेली कीं तो मनोविकार दृढ होतो व त्याच्या प्रेरणेमुळें होणारी कृति फार जलद किंबहुना न कळत होऊं लागते.

बनू आठ वर्षांची होती. तिला एक भाऊ झाला. तें बाळ पाहून तिला फार आनंद झाला. त्याला पाहून वत्सलता ही सहजप्रवृत्ति तिच्या मनांत जागृत झाली. तो भाऊ ३।४ महिन्यांचा झाल्यावर त्या बाळाला आंघोळ घालण्याचे कामीं आईला ती मदत करूं लागली. त्याचें अंथरूण पसरणें,

त्याला पाळण्यांत झोके देणें, त्याला गाणें म्हणणें वगैरे बाळाचीं कामें ती आनंदानें करूं लागली. अशा प्रकारें दररोज भावाबद्दल वात्सल्य उत्पन्न झाल्यामुळें तिची त्याच्याबद्दलची ममता किंवा वात्सल्य हा मनोविकार दृढ झाला. पुढें पुढें तिला बाळाशिवाय बिलकूल चैन पडत नसे. एकदां तिच्या शाळेंत बक्षिससमारंभ होता. तिचा भाऊ त्या दिवशीं आजारी होता. आईनें जरी तिला शाळेंत जाण्यास सांगितलें, तरी आपल्या भावाकरितां ती त्या संभारंभाला गेली नाहीं. दिवसानुदिवस बनूचें आपल्या भावावरचें प्रेम वाढतच गेलें. भाऊ दृष्टीस पडला किंवा त्याची आठवण झाली कीं तिला आनंद होई. ती त्याला सुख देण्याकरितां निरंतर झटत असे. अशा प्रकारें बनूच्या मनांत आपल्या धाकट्या भावावरील प्रेमाची मनोवृत्ति स्थिर झाली.

वडील माणसांच्या किंवा शिक्षकाच्या वेडेपणामुळें मुलांच्या मनांत अनिष्ट मनोविकार व अनिष्ट मनोवृत्तिही उत्पन्न होतात.

पांच वर्षांच्या दगडूला त्याची आई व बाप नेहमी सांगत कीं, ‘ तूं आतां घरीं फार दंगा करतोस व त्रास देतोस. तुला आतां आम्ही शाळेंत घालूं. मग मास्तर तुला खूप बडवतील’, अशाप्रकारें दगडूच्या मनांत शाळा व शिक्षक यांजबद्दल भीति हा मनोविकार उत्पन्न झाला. यानंतर दगडूला एके दिवशीं त्याच्या बापानें शाळेंत घातलें. शाळेंत मुलें मोठमोठ्यानें ओरडून उजळणी काढीत होतीं. मधून मधून शिक्षक मुलांच्या अंगावर ओरडत होते. एक दोन मुलांना त्यांनीं छड्याही दिल्या. शिक्षकाच्या या कृतीनें दगडूच्या मनांतील शाळा व शिक्षक यांजबद्दलची भीति वाढली व त्यांजबद्दल त्याच्या मनांत तिरस्कार उत्पन्न झाला. दररोज तोच देखावा पाहिल्यामुळें ही भीति व हा तिरस्कार दगडूच्या मनांत वाढत गेला. तो शाळा टाळण्याचा प्रयत्न करूं लागला. कांहीं दिवसांनीं ही त्याची मनोवृत्ति स्थिर झाली. दगडू नऊ वर्षांचा झाल्यावर त्यानें शाळा सोडली. शाळेचें किंवा शिक्षकाचें नांव काढलें कीं त्याच्या मनांत भीति व तिरस्कार उत्पन्न होतात.

मनोवृत्ति ज्याप्रमाणें माणसाबद्दल असतात त्याचप्रमाणें समाज व संस्था यांजबद्दलही असतात. सत्य, शौर्य, धर्म इत्यादि अमूर्त कल्पनाबद्दलही मनोवृत्ति असतात. मुलें आठ वर्षांचीं होईपर्यंत आईबाप-भाऊ-बहिणी यांज-

वरील प्रेम, शिक्षकावरील प्रेम आपल्या कुटुंबाबद्दल अभिमान, शाळेची आवड व अभिमान इत्यादि स्थिर मनोवृत्ति त्यांचे मनांत दृढ होत गेल्या पाहिजेत.

मुलांच्या मनांत उच्च मनोवृत्ति दृढ करणें हें आईबापांचें व शिक्षकाचें कर्तव्य आहे. यालाच नीतिशिक्षण म्हणतात. सहजप्रवृत्तींच्या बरोबर मनोविकार उत्पन्न होतो. सहजप्रवृत्तींची क्रिया एकसारखी केल्यानें हा मनोविकार दृढ होतो व नंतर मनोवृत्ति बनते.

मुलाला धमकीनें एखादी क्रिया करण्यास एकसारखे पुष्कळ दिवस लावलें, तरी इष्ट तो मनोविकार मुलाच्या मनांत उत्पन्न होणार नाहीं व ती मनोवृत्तिही दृढ होणार नाहीं. आपण ही गोष्ट उदाहरणानें स्पष्ट करूं.

रघूच्या बापाला स्वच्छता फार आवडत असे. रघू पांच वर्षांचा असतांना त्यानें मातींत खेळून कपडे मळविल्याबद्दल त्यांनीं त्याला खरपूस मार दिला होता. रघू मोठा होऊन शाळेंत जाऊं लागल्यावर तर स्वच्छपणाबद्दल व व्यवस्थितपणाबद्दल बाप व शिक्षक या दोघांचीही बोलणीं त्याला खावीं लागत व मधून मधून शिक्षाही सहन करावी लागे. भीतीनें तो आपली खोली झाडून स्वच्छ ठेवी व सामान व्यवस्थित ठेवी, पण ही कृति करीत असतांना त्याला स्वच्छतेचा व व्यवस्थितपणाचा तिटकारा येत असे. कांहीं दिवसांनीं रघूच्या मनांत स्वच्छता व व्यवस्थितपणा यांजबद्दलचा तिटकारा ही मनोवृत्ति दृढ झाली. यानंतर कांहीं दिवसांनीं तो आपल्या मामाच्या घरीं गेला व तेथें तो अत्यंत अव्यवस्थितपणें वागूं लागला.

प्रेमळ व दक्ष आईबापांच्या सहवासांत मुलांच्या मनांत उत्कृष्ट मनोवृत्ति निर्माण होतात व संवयीनें त्या स्थिर होतात. आई, बाप, बहीण, भाऊ यांजबद्दल प्रेम, वडील माणसांबद्दल आदर, स्वच्छतेची व व्यवस्थितपणाची आवड, गरीब व अनाथाबद्दल सहानुभूति, प्राणीमात्राबद्दल दया, स्वाभिमान वगैरे मुलांच्या उत्कृष्ट मनोवृत्तींचा विकास होतो. कुटुंब हें या मनोवृत्तींचा विकास होण्याची फार उत्तम जागा आहे. कुटुंबांत या मनोवृत्तींचें वर्धन होतें व शाळा या वर्धनाचे कामीं मदत करते. मुलाच्या लहानपणीं आईबापांनीं व शिक्षकांनीं मुलाच्या उत्कृष्ट मनोवृत्तींची जोपासना करून त्यांचा विकास केला नाहीं, तर मुलांचें अपरिमित नुकसान होतें. बालपणीं मुलांच्या या उत्कृष्ट

मनोवृत्तींचा विकास झाला नाहीं, तर तरुणपणीं त्यांचा विकास करण्याचें काम फार कठीण होतें.

मुलांच्या उत्कृष्ट मनोवृत्तींचा विकास करून त्या स्थिर करण्याला घरीं व शाळेंत प्रेमाचें वातावरण पाहिजे. घरीं आईबाप व शाळेंत शिक्षक प्रेमळ व दक्ष असले पाहिजेत. त्यांच्या आंगीं शांतवृत्ति व सहनशीलता असली पाहिजे. मुलाचा दृष्टिकोण समजण्याची त्यांच्या अंगीं पात्रता पाहिजे. या गुणांशिवाय मुलांच्या उत्कृष्ट मनोवृत्ति तयार करण्याचें चातुर्यही त्यांच्या आंगीं पाहिजे. मुलांच्या मनोवृत्ति तयार करण्याला बराच काळ लागतो. अगदीं लहान मुलांच्या मनोवृत्ति आई, बाप, बहीण, भाऊ, गडी, माणसें इत्यादि व्यक्तींसंबंधानें असतात. त्यांच्या ज्ञानांत जास्त भर पडली व त्यांना जास्त अनुभव आला म्हणजे आपलें कुटुंब, आपली शाळा, आपला गांव इत्यादि समाज व संस्था यांजबद्दल त्यांच्या मनोवृत्ति तयार होऊं लागतात.

मुलांच्या मनांत आणखी ज्ञानाची भर पडली, त्यांचा अनुभव वाढला, चांगलें वाईट हें त्यांना स्पष्ट कळूं लागलें म्हणजे हळूहळू अमूर्त कल्पनांबद्दलही त्यांच्या मनोवृत्ति स्थिर होऊं लागतात. सत्याची आवड, कर्तव्यनिष्ठा, स्वदेश-प्रेम इत्यादि मनोवृत्ति या अमूर्त कल्पनांबद्दल होत. या मनोवृत्ति स्थिर होण्याला बरेंच ज्ञान व अनुभव लागतो. मुलांना अनुभव आल्याशिवाय व त्यांच्या ज्ञानाची योग्य वाढ झाल्याशिवाय मुलांच्या मनांत स्वदेश-प्रीति, स्वधर्म-प्रीति वगैरे मनोवृत्तींचा विकास करण्याचा प्रयत्न केव्हांही इष्ट नाहीं. या प्रयत्नाचा अनिष्ट परिणाम होण्याचा फार संभव असतो. परंतु या गोष्टीकडे पुष्कळ पालकांचें व शिक्षकांचें लक्ष जात नाहीं. मुलांच्या मनांत स्वदेशभक्ति व प्रेम या मनोवृत्ति उत्पन्न व्हाव्या व त्यांचा विकास व्हावा अशी कित्येक पालकांची, शिक्षकांची व लेखकांची इतकी उत्कट इच्छा असते कीं, पांच वर्षांच्या मुलांना देखील ही मंडळी भारतभूमीच्या थोरवीबद्दल व तिच्यावर प्रेम करण्याच्या आवश्यकतेबद्दल उपदेशामृत पाजण्यास तयार असतात. अर्थातच हें त्यांचें करणें फार अकालिक असतें.

प्रेम, आदर, भूतदया, सृष्टिसौंदर्याची, कलांची व वाङ्मयाची आवड, सत्यनिष्ठा वगैरे मनोवृत्ति शिक्षकांत व पालकांत असतील, तरच त्यांना मुलांच्या

मनांत या मनोवृत्ति उत्पन्न करून त्या स्थिर करितां येतील. मुलांना सत्य बोलावयाचा उपदेश करावयाचा व त्याचें खोटेंच वय सांगून अर्धें तिकीट काढून त्याला आगगाडींत न्यावयाचें, अथवा कोणी व्यापारी पैसे मागण्यास आला असतां मुलाकडून 'बाबा घरीं नाहींत, ते गांवाला गेले आहेत' म्हणून सांगावयाचें अशा वागणुकीनें मुलाच्या मनांत सत्यप्रीति ही मनोवृत्ति कशी उत्पन्न होणार व तिची वाढ तरी कशी होणार ? जी मनोवृत्ति आपल्या अंतःकरणांत नसेल, ती मुलाच्या अंतःकरणांत आपणांस कधींही वाढवितां येणार नाहीं, हें शिक्षकांनीं व पालकांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. सर्वच आईबाप मुलाला सत्याचरणाचा व प्रामाणिकपणाचा उपदेश करीत असतात. असें असतांनाही अगदीं थोड्याच मुलांत सत्यप्रीति ही मनोवृत्ति विकास कां पावते ? याचें कारण फारच थोड्या आईबापांचे अंतःकरणांत ही मनोवृत्ति स्थिर झालेली असते हें होय. आईबापांचा व शिक्षकाचा उपदेश व त्यांचें स्वतांचें आचरण यांतील विरोध रा- दिवाकर या लेखकानें आपल्या कांहीं नाट्यछटांत मार्मिकपणें दाखविला आहे.

मुलाला कळूं लागलें कीं, त्याची, आपल्या शक्तीचें, गुणांचें व वस्तूंचें प्रदर्शन करण्याची सहजप्रवृत्ति दिसूं लागते व त्याची स्तुतिप्रियता ही सहजप्रवृत्तिही काम करूं लागते. आईनें व बाबानीं आपणांला चांगलें म्हणावें म्हणून मूल प्रयत्न करतें. पुढें त्याला चांगलें व वाईट, खरें व खोटें यांतील भेद हळूहळू कळूं लागतो. त्याची सदसद्विचार बुद्धि वाढत जाते. त्याला स्वतांबद्दल अभिमान वाटूं लागतो. पुढें मूल शाळेंत जातें. शाळेंतील अभ्यास करीत असतांना मुलाच्या ज्ञानांत भर पडते. थोर पुरुषांचीं चरित्रें मूल ऐकतें व वाचतें. घरीं आईबाप व शाळेंत शिक्षक यांचें आपल्याबद्दल चांगलें मत व्हावें म्हणून मूल झटत असतें. शिक्षकाबद्दल व आईबापांबद्दल मुलाच्या मनांत आदर व प्रेम हीं असलीं म्हणजे मूल त्यांच्या मनोवृत्तींचें नकळत अनुकरण करतें. जसजसें मुलाचें वय वाढत जातें, जसजशी त्याच्या ज्ञानांत भर पडत जाते तसतसा त्याचा स्वतांबद्दलचा अभिमान व प्रेम वाढत जातें. स्वतांबद्दलचें प्रेम व अभिमान यांच्या योगानें आत्मविषयक मनोवृत्ति बनते व कालांतरानें ती स्थिर होते. या मनोवृत्तीचा अंमल व इतर सर्व मनोवृत्तींवर चालतो, या मनोवृत्तीच्या योगानें मनुष्य, जिच्या योगानें आपल्या अब्रूला काळिमा लागेल किंवा जी आपल्या सदसद्विचाराच्या विरुद्ध आहे अशी क्रिया मनुष्य

कधीं करीत नाहीं. मुलाचा स्वाभिमान कसा वाढवावा, त्या स्वाभिमानाला गर्वाचें किंवा फुशारकीचें स्वरूप येऊं नये, म्हणून वडील माणसांनीं कोणती काळजी घ्यावी याचें विवेचन मागील भागांत केलेंच आहे.

सहजप्रवृत्तींमुळें एखादा विशिष्ट मनोविकार मुलाच्या मनांत उत्पन्न होतो, व त्याच्या प्रेरणेनें एखादी क्रिया मूल करतें. अशा प्रकारें तीच तीच क्रिया केल्यानें तोच तोच मनोविकार एकसारखा दृढ होत जातो व मनोवृत्ति तयार होते ही गोष्ट मुलांच्या पालकांनीं व शिक्षकानीं नेहमीं लक्षांत ठेविली पाहिजे.

सहजप्रवृत्तींमुळें मनोवृत्ति होतात. मनोवृत्तींमुळें शील बनतें. शीलावरच मनुष्याचें आचरण व सुख हीं अवलंबून असतात. मुलांच्या मनांत उच्च मनोवृत्ति तयार करणें व त्या दृढ करणें हें मुलांच्या शिक्षणाचें सार आहे. उच्च मनोवृत्ति बनविण्यास व स्थिर करण्यास मुलांच्या सहजप्रवृत्तींला योग्य वळण लावणें, मुलांना अनुभव व ज्ञान मिळविण्याची भरपूर संधि देणें या दोन गोष्टी पालकांना व शिक्षकाला करावयाच्या असतात.

आतांपर्यंत जें विवेचन केलें त्यांतील मुख्य गोष्टी पुन्हा एकदां पाहूं.

१ अगदीं लहान मुलांचे मनांत मनोविकार फार जलद उत्पन्न होतात. ते तीव्र स्वरूपाचे असतात, पण ते फार थोडा वेळ टिकतात.

२ भीति, राग वगैरे मनोविकार प्रबळ झाले कीं, शरीरावर त्यांचा अनिष्ट परिणाम होतो.

३ सहजप्रवृत्तींमुळें मनोविकार उत्पन्न होतो. मनुष्य मनोविकाराच्या प्रेरणेनें काम करितो.

४ सहजप्रवृत्तीनें एखाद्या व्यक्तीबद्दल एखादा मनोविकार एकसारखा पुन्हा पुन्हा कांहीं दिवस उत्पन्न होत गेला कीं, एक विशिष्ट प्रकारची मनोरचना तयार होते. या मनोरचनेमुळें, ती व्यक्ति पाहिली असतां, किंवा तिची आठवण झाली असतां झटकन् ठरलेला मनोविकार उत्पन्न होतो व त्याच्या प्रेरणेनें ठरलेली क्रिया मनुष्य करतो. अशा मनोरचनेस स्थिर मनोवृत्ति असें म्हणतात.

५ व्यक्तीसंबंधानें जशा स्थिर मनोवृत्ति तयार होतात तशाच प्राणी, संस्था, समाज, अमूर्त कल्पना यांच्या संबंधानेंही स्थिर मनोवृत्ति बनतात.

६ सहजप्रवृत्तीमुळें मूल एखादी क्रिया करतें. ती क्रिया सुखकारक झाली कीं मूल पुन्हा पुन्हा तीच क्रिया करतें. अशा प्रकारें त्या सहजप्रवृत्तींत असणारा मनोविकार मुलाच्या मनांत दृढ होतो. मग मुलाच्या मनांत ती मनोवृत्ति स्थिर होते.

## भाग १८ वा.

## मुलांचें संगोपन

मुलाचा शारीरिक, बौद्धिक व नैतिक विकास कसा होतो याचें विवेचन मागील कांहीं लेखांत केलें आहे. मुलांत जन्मतःच बीजरूपानें असणाऱ्या शारीरिक शक्तीचा व बौद्धिक शक्तींचा विकास करण्याचें अत्यंत महत्त्वाचें काम प्रारंभीं आईबापांला व नंतर आईबाप व शिक्षक यांना करावें लागतें. त्याचप्रमाणें मुलांत जन्मतःच असणाऱ्या सहज स्वाभाविक प्रवृत्तींना व मुलांच्या वृत्तींना वळण लावून आईबापांला व शिक्षकाला मुलाचा नैतिक विकास करावयाचा असतो. प्रथम आपण मुलाच्या शारीरिक विकासाचा विचार करूं.

जन्मतः मूल अत्यंत दुर्बल असतें. यामुळें त्याचें संगोपन करण्याचें सर्व काम त्याच्या आईला करावें लागतें. त्याला वेळेच्या वेळीं पाजणें, त्याला स्नान घालणें, त्याला निजविणें वगैरे सर्व गोष्टी अत्यंत काळजीनें तिला कराव्या लागतात. मुलाला कपडे घालणें व त्याचे कपडे काढणें, त्याला स्नान घालणें, त्याला निजविणें वगैरे गोष्टी करण्यांत आईचा कितीतरी वेळ जातो. लहान मुलाला आईच्या दुधासारखें पौष्टिक व हितकर असें दुसरें कोणतेंही अन्न नाहीं. आईनें जर स्वतः पौष्टिक अन्न नियमितपणें व ठराविक प्रमाणांत खाल्लें व योग्य प्रमाणांत शारीरिक व्यायाम घेतला, तर तिचें दूध निरोगी व पौष्टिक राहातें. आई जोंपर्यंत मुलाला पाजीत आहे तोंपर्यंत तिनें आपलें मन शांत ठेवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आईला जर मानसिक चिंता असेल, घरांतील अनेक गोष्टींमुळें तिच्या मनाची शांती बिघडत असेल व तिचें मन क्षुब्ध होत असेल, तर या मानसिक अस्वस्थतेचा

परिणाम तिच्या दुधावर होतो व त्या दुधाची पोषण करण्याची शक्ति कमी होते. हें लक्षांत ठेवून आईनें आपली वृत्ति समाधानी व शांत ठेविली पाहिजे. घरांतील मंडळीनेंही तिची वृत्ति शांत व समाधानी राहावी याची काळजी घेतली पाहिजे.

वेळच्या वेळीं मुलाला नियमितपणें पाजणें, नियमितपणें मुलाला मलविसर्जन करण्याची संवय लावणें, त्याला भरपूर स्वच्छ हवेचा व सूर्यप्रकाशाचा पुरवठा करणें इत्यादि गोष्टी आईनें काळजीपूर्वक केल्यास मुलाचें आरोग्य चांगलें राहातें व त्याच्या शरीराचा व शारीरिक शक्तीचा योग्य विकास होतो. योग्य वेळीं आईनें मुलाला अंगावरून तोडलें पाहिजे व मुलाच्या वयाला व प्रकृतीला इष्ट असें अन्न त्याला पुरविलें पाहिजे. मुलांना भरपूर व पौष्टिक अन्न लागतें. मुलांना गोड पदार्थ फार आवडतात, यामुळें शर्करायुक्त पदार्थ मुलांना दिले जातात, पण त्यामुळें त्यांच्या पचनशक्तीवर अपायकारक परिणाम होतो. मुलाला नियमित वेळींच खाऊ घालण्याची खबरदारी आईनें घेतली पाहिजे. लाडाने सर्व दिवसभर मुलाला खाऊं देणें हें इष्ट नाहीं.

मूल रांगूं लागलें कीं, त्याला मोकळें खेळण्याची भरपूर संधि मिळाली पाहिजे. तें कोठें पडणार नाहीं व त्याला लागणार नाहीं एवढी काळजी वडील मंडळींनीं घेतली पाहिजे. मुलाला योग्य अशीं खेळणीं आईबापांनीं पुरविलीं पाहिजेत. ज्या त्या ऋतूला योग्य व मुलाच्या हालचालीला प्रतिबंध न करणारा पोषाख घातला पाहिजे. आईनें मुलाच्या स्वच्छतेची नीट काळजी घेतली पाहिजे. हौसेखातर किंवा श्रीमंतीचें प्रदर्शन करण्याकरितां मुलांच्या अंगावर रेशमी व जरीचे कपडे घालणें अथवा मुलाच्या अंगावर दागिने घालणें हेंही मुलाच्या आरोग्याच्या दृष्टीनें अनिष्ट आहे. मूल चालूं लागलें कीं त्याला भरपूर चालण्याची व खेळण्याची संधि मिळालीच पाहिजे. मुलाला योग्य तीं खेळणीं देणें व बरोबरीच्या मुलांत यथेच्छ खेळूं देणें हें मुलाच्या शारीरिक व बौद्धिक विकासाच्या दृष्टीनें अत्यंत इष्ट आहे. नदीकिनाऱ्यावर, समुद्रकिनाऱ्यावर अथवा मोकळ्या मैदानांत मुलाला खेळावयास नेणें, बागांत अथवा कुरणांत त्याला यथेच्छ बागडूं देणें याही गोष्टी त्याच्या शारीरिक विकासाला अवश्य असतात.

आपल्या देशांत लहान मुलाचें संगोपन करण्याचें काम आईलाच फार करावें लागतें. मूल आजारी पडलें किंवा आईला इतर जरूरीचें काम असलें, तरच लहान मुलाला कपडे घालणें, खेळविणें वगैरे काम बाप करतो. मूल चालूं लागलें कीं, मुलाला स्नान घालणें, खेळविणें, कपडे घालणें वगैरे कितीतरी गोष्टींत बापाला मुलाच्या आईला मदत करितां येईल. मुलाची निगा राखण्याचें काम फार कष्टाचें असतें आणि म्हणूनच बापानें आईला या कामीं सर्व प्रकारें मदत केली पाहिजे. आपल्या देशांतील स्त्रिया फार प्रेमळ असतात. मुलाकरितां वाटेल ते कष्ट करण्याची व स्वार्थत्याग करण्याची त्यांची नेहमीं तयारी असते. पण पुष्कळशा स्त्रियांना बालसंगोपनाचें ज्ञान नसल्यामुळें अज्ञानामुळें त्यांच्या हातून मोठ्या व कधीं कधीं भयंकर चुका घडतात व त्यांचा मुलांच्या प्रकृतीवर अत्यंत अनिष्ट असा परिणाम दिसून येतो. मंत्र, ताईत, गंडेदोरे करणें, मुलाला डॉक्टरचें किंवा वैद्याचें औषध न देतां आयाबायांनीं सांगितलेलीं भलतींच औषधें देणें, अफू देणें, देवी न टोंचविणें, मूलाला आपणापासून दूर जाऊं न देणें, उन्हाळ्यांत मुलाला कपड्यानें जखडून टाकणें व थंडींत त्याला अपुरे कपडे घालणें, बाजारचे पेढे, बर्फी वगैरे उघडे पदार्थ मुलाला खावयास देणें वगैरे कितीतरी चुका आई व कधीं कधीं बापही करितो व त्या चुकांचें प्रायश्चित्त मुलाला भोगावें लागतें.

सुधारलेल्या देशांत लहान मुलांकरितां स्वतंत्र आरोग्य-भुवनें व दवाखाने असतात. बालसंगोपन व बालरोगचिकित्सा यांत निष्णात असलेल्या डॉक्टरणी घरोघर फिरून आयांना मुलाच्या प्रकृतीसंबंधानें योग्य सल्ला देतात व औषधोपचार करितात. पालकांना बालसंगोपनाची अवश्य तेवढी माहिती देण्याकरितां रात्रीचे वर्ग भरवितात. मुलांना खेळण्याकरितां व मोकळी हवा मिळण्याकरितां स्वतंत्र बाग, कुरणें व क्रीडांगणें राखून ठेवतात. या सर्व गोष्टी मुलांच्या शरीरप्रकृतीच्या दृष्टीनें आपणांकडे सुरू झाल्या पाहिजेत. असा सोन्याचा काळ लवकर यावा अशी आपणां सर्वांची उत्कृष्ट इच्छा आहे.

मुलानें वेळेवर उठावें, उठल्यावर शौचाला जावें, त्यानें आपलें तोंड व दांत स्वच्छ धुवावे, खाण्यापूर्वी आपले हात व तोंड स्वच्छ धुवावे, भलतेंच पाणी पिऊं नये, उघड्यावर विकत असलेले चिवडा, रेवड्या, वगैरे पदार्थ खाऊं

नयेत वगैरे उत्कृष्ट संवयी आईबापांनीं काळजीपूर्वक मुलांना लावल्या पाहि-जेत. दररोज स्नान करण्याची व केस विंचरून घेण्याचीही संवय मुलाला लागली पाहिजे. या संवयींवरच मुलाचें आतांचें व पुढचें आरोग्य अवलंबून असतें.

सामाजिक आरोग्याच्या दृष्टीनें कांहीं संवयी लहानपणापासून मुलांना लावणें इष्ट असतें. भलत्या जागीं शौचाला अगर लघवीला न बसणें. वाटेल तेथें न थुंकणें अगर 'शेंबुड शिंकरणें याही संवयी मुलांना आईबापांनीं लावल्या पाहिजेत.

हट्टीपणा करणें, चिरचिर करणें, आळसांत स्वस्थ वेळ घालविणें वगैरे जे दोष मुलांत दिसून येतात त्याला पुष्कळ वेळां मुलांतील शारीरिक दोष किंवा प्रकृतींतील बिघाड हेंच कारण असतें. मुलांची प्रकृति निरोगी असली कीं, तीं आनंदांत असतात व धावणें, खेळणें, गाणें, दुसऱ्याची नक्कल करणें वगैरे क्रिया करण्यांत गुंग असतात. मुलांची आनंदी वृत्ति नाहींशी झाली कीं, त्यांच्या शरीरप्रकृतींत कांहींतरी बिघाड झालेला आहे असें समजावें व त्यांना वैद्याला किंवा डॉक्टरला दाखवावें.

शरीर आणि मन यांचा अत्यंत निकट संबंध आहे. ज्याची शरीरप्रकृति निरोगी व बळकट आहे तें मूल आनंदी व मोकळ्या मनाचें असतें. त्याची बुद्धि ही चांगली चालते. ज्या मुलाची शरीरप्रकृति बरोबर नसते व जें अशक्त असतें तें मूल नेहमीं चिरचिर करतें. तें फार एकलकोंडें असतें. त्याला बरोबरीच्या सोबत्यांत खेळण्याची आवड बिलकुल नसते. अशींच मुलें बहुधा हट्टी, आपलपोटीं व मत्सरी असतात. ज्या मुलांना चांगलें ऐकूं येत नाहीं तीं मुलें फार बावळट व मूर्ख दिसतात. श्रवणेंद्रियाच्या दोषामुळें त्यांच्या बुद्धीची चांगली वाढ होत नाहीं. कांहीं मुलांच्या घशांतील गांठी वाढलेल्या असतात, यामुळें या मुलांची शारीरिक व मानसिक वाढ होत नाहीं. कित्येक मुलांच्या नाकांत दोष असतो, यामुळें त्यांना नेहमीं पडसें येतें, ताप येतो व तीं मुलें अगदीं फिक्कट व रोगीट दिसतात. लठ्ठ व फोपशीं मुलें दिसण्यांत जरी बरीं दिसतात, तरी त्यांची शरीरप्रकृति बरोबर नसते. यत्किंचित् श्रम केले कीं तीं थकून जातात. मुलांची प्रकृति बरोबर नसली कीं पालकानें लागलीच वैद्याचा

किंवा डॉक्टरचा सल्ला घेतला पाहिजे. मुलाच्या अंगीं कांहीं व्यंग असेल, तर त्याजवर लहानपणींच उपचार करणें चांगलें. तिरळेपणा, घशांतील वाढलेल्या गांठी, श्वासोच्छ्वासाला प्रतिबंध करणारी नाकांतील वाढ वगैरे विकारांवर जर लहानपणींच उपचार केले, तर मुलाची प्रकृति ताबडतोब सुधारते व त्याची शारीरिक व मानसिक वाढ झपाट्यानें होऊं लागते. सध्यां वैद्यकशास्त्रांत व शस्त्रक्रियेंत इतकी कांहीं प्रगति झाली आहे कीं, मुलांच्या कोणत्याही व्यंगावर औषधोपचार किंवा शस्त्रक्रिया करून तें व्यंग नाहींसें करतां येईल व मुलाच्या शारीरिक व मानसिक वाढीच्या मार्गांतील अडथळा दूर करितां येईल.

मुलें शाळेंत जाऊं लागलीं कीं, त्यांच्या प्रकृतीची काळजी घेण्याचें काम शिक्षकावर येतें. शाळागृहांत स्वच्छ हवेचा भरपूर पुरवठा असेल, वर्गांत मुलांच्या दृष्टीला अपायकारक होणार नाहीं अशी उजेडाची व्यवस्था असेल, वर्गांत मुलांची दाटी नसेल व मुलांना सुखावह व आरोग्यदृष्ट्या इष्ट अशी बसण्याची व्यवस्था असेल, तर मुलांचें आरोग्य चांगलें राहातें. खेळण्याला भरपूर जागा व स्वच्छ व गार पाणी मिळण्याची व्यवस्था शाळेंत अवश्य असली पाहिजे. शाळेंतील अभ्यासक्रमही मुलांना मनोरंजक व आकर्षक असला पाहिजे. कंटाळवाण्या व त्रासदायक अभ्यासक्रमाचा परिणाम मुलांच्या शरीर-प्रकृतीवर तेव्हांच होतो. शाळेची इमारत मोकळी, भरपूर प्रकाशाची व रह-दारीपासून जरा लांब असली पाहिजे. राष्ट्राच्या सर्व संपत्तीपेक्षां लहान मुलें ही संपत्ति फार मौल्यवान आहे. राष्ट्राच्या या भावी पिढीवर राष्ट्राचें कल्याण अव-लंबून आहे. मुलांना लहानपणीं चांगल्या शाळागृहांत, प्रेमळ व अनुभवी शिक्ष-कांच्या हाताखालीं शिक्षण मिळणें इष्ट आहे. कसल्यातरी भिकार इमारती, गर्दीत बसविलेल्या मुलांनीं गच्च भरलेले वर्ग, क्रीडांगणाचा अभाव, साहि-त्याचा अभाव, अननुभवी व सहानुभूतिशून्य शिक्षक, वडील माणसांची बेफि-कीर वृत्ति यामुळें आमच्या बालकांच्या शरीरसंपत्तीची व बौद्धिक संपत्तीची हानि होत आहे. सक्तीच्या शिक्षणाची लाट आतां जिकडे तिकडे पसरत चालली आहे. धर्मशाळांतून, चावडींतून अगर भाड्याच्या भिकार घरांतून एकएका वर्गांत सकाळ संध्याकाळ ८०-८० मुलें कोंबून एका अनुभवशून्य शिक्षकाच्या हाताखालीं दिलीं कीं मुलाचें शिक्षण होतें, अशी आमच्यांतील कित्येक विद्वान् गृहस्थांचीही समज झाली आहे, यापरतें दुर्दैव कोणतें ! अशा प्रकारें लहान व

कोमल वृत्तीचीं मुलें कोंदट हवेंत दोन दोन तास 'ककां' गिरवितांना पाहिलीं कीं मनाला वाईट वाटतें. हें का शिक्षण कीं शिक्षणाची थट्टा! यापेक्षां हीं मुलें मैदानांत, शेतांत मोकळेपणानें फिरून किती तरी जास्त ज्ञान मिळवितील व त्यांची प्रकृतिही निकोप राहील.

आईबापांनीं घरीं व शिक्षकांनीं शाळेंत मुलांच्या वजनाची नोंद राखली पाहिजे. निदान सहा महिन्यांनीं मुलांचें वजन करावें व तें योग्य प्रमाणांत वाढलें आहे किंवा नाहीं हें पहावें. पुढें दिलेले आंकडे एका इंग्लिश पुस्तकांतून घेतले आहेत. त्यांजवरून निरनिराळ्या वयांच्या मुलांचें वजन मुलांच्या उंचीचे मानानें किती असावें व उंची किती असावी याची साधारण कल्पना येईल.

| | मुलगे | | मुली | |
|---|---|---|---|---|
| वय | उं. इं. | व. पौं. | उंची | व. पौं. |
| जन्मतां | २०.६ | ७.५५ | २०.५ | ७.१६ |
| ६ म. | २५.४ | १६ | २५ | १५.५ |
| १२ म. | २९ | २०.५ | २८.७ | १९.८ |
| १८ म. | ३० | २२.८ | २९.७ | २२ |
| २ वर्षें | ३२.५ | २६.५ | ३२.५ | [illegible] |
| ३ वर्षें | ३५. | ३१.२ | ३५. | ३०. |
| ४ वर्षें | ३८ | ३५ | ३८ | ३४ |
| ५ वर्षें | ४१.७ | ४१.२ | ४१.४ | ३९.८ |
| ६ वर्षें | ४४.१ | ४५.१ | ४३.६ | ४३.८ |
| ७ वर्षें | ४६.२ | ४९.५ | ४५.९ | ४८. |
| ८ वर्षें | ४८.२ | ५४.५ | ४८. | ५२.९ |
| ९ वर्षें | ५०.१ | ६०. | ४९.६ | ५७.५ |
| १० वर्षें | ५२.२ | ६६.६ | ५१.८ | ६४.१ |

मुलांना समवयस्क सोबत्यांत खेळूं देणें व त्यांना निरनिराळे खेळ शिकविणें हें मुलांच्या मानसिक व शारीरिक शिक्षणाच्या दृष्टीनें किती आवश्यक आहे याचें विवेचन मागील भागांत केलेंच आहे. मुलांच्या निरनिराळ्या स्नायूंना

योग्य व्यवसाय मिळून ते सुदृढ व्हावे व त्यांच्यांत चपलता यावी यांजकरितां नमस्कार व कवाईत यांजसारखे व्यायाम अवश्य लागतात. शाळांतून सध्यां जी ड्रिल शिकविली जाते ती इतकी कांहीं कंटाळवाणी असते कीं, तिच्यांत मुलांना कधींच गोडी वाटत नाहीं. आणि गोडी नसेल, तर तो व्यायाम कसचा? लंडन एथील बोर्ड ऑफ एज्युकेशन या संस्थेनें मुलांकरितां जे नवीन खेळ बसविले आहेत त्यांत कवाईत व खेळ यांचें मनोरंजक मिश्रण केलें आहे. हे खेळ मुलांना फार आवडतात. त्यांत त्यांच्या स्नायूंना भरपूर व्यायाम मिळतो व त्यांत चपलताही येते. हे खेळ थोडासा जरूर तो फेरफार केला असतां आपल्या शाळांतून फार उपयुक्त होतील. पोहणें व सायकलवर बसणें याही गोष्टी मुलांना लहानपणींच शिकविल्या पाहिजेत. लहानपणीं मुलें या गोष्टी फार लौकर शिकतात.

मूल आजारी पडल्याशिवाय त्याची प्रकृति आपण डॉक्टरला केव्हांही दाखवीत नाहीं. वास्तविक पहातां मूल जरी निरोगी असलें, तरी कुटुंबाच्या डॉक्टरकडून वर्षांतून दोनदांतरी त्याची तपासणी करून घेतली पाहिजे. शाळेंतही निदान दर सहामाहीस मुलांची शारीरिक तपासणी झाली पाहिजे. या गोष्टीचें महत्त्व शिक्षक, पालक व शाळांचे चालक यांच्या लक्षांत हळूहळू येत आहे व थोड्या वर्षांत प्राथमिक शाळांतून मुलांची शारीरिक तपासणी हा शाळेच्या आयुष्यक्रमांतील एक अत्यंत आवश्यक भाग मानला जाईल.

लहान मुलाला पुढ्यांत घेऊन निजण्याची आपल्याकडे फार चाल आहे. मूल वर्ष दीडवर्षाचें होईपर्यंत तें आईच्या पुढ्यांत निजतें. नंतर तें दोन तीन वर्षें बापाच्या पुढ्यांत निजतें. लहान मूल आईच्या पुढ्यांत निजलें कीं, तें जागें झाल्याबरोबर आईच्या अंगावर पिऊं लागतें, अथवा तें किरकिर करूं लागतें. मग आई त्याला मांडीवर घेऊन थोपटते. अशाप्रकारें अनियमितपणें वागण्याची व हट्ट करण्याची वाईट संवय मुलास जडते. लहानपणापासून मुलाला वेगळ्या अंथरुणावर निजविणें फार इष्ट असतें. मुलाला आपल्या ताटांत जेवावयास घेणें, दोन तीन मुलांना मिळून एकाच ताटांत जेवावयाला वाढणें, आपण आंघोळ करीत मध्येंच मुलाला बोलावून त्याच्या अंगावर चार तांबे लगबगीनें ओतणें ह्याही गोष्टी मुलाच्या शारीरिक व मानसिक हिताच्या दृष्टीनें इष्ट नाहींत. मुलाला स्वतंत्रपणें जेवण्यास त्याची ताटली व

लोटी असावी. त्याला नेमलेल्या वेळीं स्वतंत्रपणें आंघोळ घालावी. मूल पांच वर्षांचें झाल्यावर त्याला स्नानास पाणी मात्र उपसून द्यावें व त्यानें अंग स्वच्छ घासून आंघोळ करावी व खरखरीत वस्त्रानें तें मग पुसून कोरडें करावें. या गोष्टी दिसण्यांत जरी क्षुल्लक आहेत, तरी त्यांच्या योगानें मुलाला ज्या उत्तम संवयी लागतात त्यांचें महत्त्व फार आहे.

लहानपणापासून मुलाला शारीरिक श्रम करण्याची संवय लावावी. शारीरिक श्रमांत अपमानाचा प्रश्न नाहीं, उलटपक्षीं शारीरिक श्रम करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे हें मुलाच्या मनावर बिंबलें पाहिजे. मुलें शाळेंत जाऊं लागलीं कीं, तीं घरच्याकामाकडे बिलकूल लक्ष देत नाहींत. बिचारी आई साऱ्या दिवसभर कष्ट करीत असते. कष्ट करणें हा आईचा 'जन्मसिद्ध हक्क' आहे अशीच मुलांची दृढ समजूत होते. शारीरिक कष्ट न करणें हें मुलाच्या शारीरिक व मानसिक शिक्षणदृष्ट्या आनिष्ट आहे. स्वतांचे कपडे धुणें, घर झाडणें, पाणी भरणें, वगैरे कामांत मुलांनीं आईला शक्य ती मदत केली पाहिजे. प्रिन्सिपाल तावडे आपल्या लहानपणची गोष्ट मोठ्या अभिमानानें सांगत असतात. लहानपणीं त्यांची फार गरिबी असे. त्यांची आई फार अशक्त होती व तिची प्रकृतिही चांगली नव्हती ते आपल्या आईला दळणें, झाडणें, धुणें वगैरे सर्व कामांत मदत करीत. आपल्या वडिलांनाही ते शेतीच्या कामांत मदत करीत. बालपणीं केलेल्या शारीरिक श्रमाचा त्यांच्या शरीरावर व मनावर फारच हितकारक परिणाम झालेला आहे.

घराच्या पुढें किंवा मागें मोकळी जागा असेल, व त्या जागेंत फुलझाडें लावण्यास व त्यांची जोपासना करण्यास मुलांना सांगितलें, तर त्यांना फार आनंद वाटतो. या फुलबागेच्या योगानें मुलांना शारीरिक श्रम करण्याची संवय लागते व मुलांत व्यवस्थितपणाची व नीटनेटकेपणाची आवड उत्पन्न होते. या बागेमुळें मुलांचें निरीक्षण वाढतें व त्यांना सृष्टिसौंदर्याची गोडी लागते.

# भाग १९ वा

## मुलांचें मानसिक आरोग्य

मुलाच्या पचन, रुधिराभिसरण, श्वसन वगैरे क्रिया चांगल्या चालल्या, त्याला पौष्टिक व त्याच्या वयाला योग्य असें अन्न वेळच्या वेळीं नियमितपणें मिळालें, त्याला खेळण्याचा भरपूर व्यायाम मिळाला, म्हणजे मुलाच्या शरीराची चांगली वाढ होते, त्याच्या स्नायूंत चपलता व शक्ति येते व त्याचें आरोग्य चांगलें राहातें. मुलाच्या शारीरिक आरोग्याची ज्याप्रमाणें आपण काळजी घेतों त्याचप्रमाणें त्याच्या मानसिक आरोग्याचीही आपण काळजी घेतली पाहिजे. ज्याप्रमाणें मानसिक आरोग्य हें शारीरिक आरोग्यावर अवलंबून असतें त्याचप्रमाणें शारीरिक आरोग्य हेंही मानसिक आरोग्यावर अवलंबून असतें. मुलाच्या मनांत भीति, राग, द्वेष, मत्सर वगैरे मनोविकार फार प्रबळ झाले तर मुलाचें मानसिक आरोग्य बिघडतें. यांशिवाय आणखीही कांहीं कारणामुळें मुलाचें मानसिक आरोग्य बिघडण्याचा संभव असतो.

शिक्षणाच्या योगानें मुलाच्या सहजप्रवृत्तींना वळण लावावयाचें असतें व मुलाच्या विचारशक्तीची वाढ करून मुलाच्या मनांत उच्च मनोवृत्ति बनवून त्या स्थिर करावयाच्या असतात. आईबाप व शिक्षक यांना हें काम करावयाचें असतें. शिक्षण घेण्याचें काम मनुष्य बाल्यांतच संपवितो असें नाहीं. हें काम पुष्कळ वर्षें चाललेलें असतें. भोंवतालचा समाज, सोबती, ग्रंथ हेही शिक्षण देण्याचें काम करीत असतात.

सुशिक्षित माणसाच्या सहजप्रवृत्तींना इष्ट असें वळण लागलेलें असतें. यामुळें या सहजप्रवृत्तींच्या प्रेरणेनें त्याला व समाजाला उपयुक्त अशा क्रिया तो करतो. ज्यांच्या योगानें त्याच्या दररोजच्या आयुष्यक्रमांत त्याला अथवा समाजाला त्रास होईल अशा खोडी अगर विक्षिप्तपणा त्या माणसांत नसतो. शिक्षणाच्या योगानें मनुष्य भोंवतालच्या परिस्थितीला योग्य असें आचरण करण्यास शिकतो व त्या आचरणानें त्याचा व समाजाचा फायदा होतो.

शिक्षणाच्या दोषांमुळें सहजप्रवृत्तींना योग्य वळण लागत नाहीं, यामुळें त्या सहजप्रवृत्तींतील विकार फार प्रबळ होतो किंवा दुर्बळ होतो. यामुळें मनु-

ष्याचें आचरण त्याच्या परिस्थितीला अनुरूप असें होत नाहीं, व त्या योगानें त्याचें व समाजाचें हित होत नाहींच पण उलटपक्षीं दोघांचें नुकसान होतें. संपादन सहजप्रवृत्ति व तिच्यांतील माझेपणाचा आनंद हा मनोविकार उदाहरणार्थ घेऊं. या सहजप्रवृत्तीला नीट वळण लागलें नाहीं कीं, मनुष्य चोऱ्या करूं लागतो. त्या योगानें त्याचें व समाजाचें नुकसान होतें.

शरीराच्या सर्व क्रिया ठीक चालल्या, शरीर सशक्त व बळकट असलें म्हणजे तें निरोगी आहे असें आपण समजतों. त्याप्रमाणें मनुष्याच्या मनाच्या सर्व क्रिया ठीक चालल्या म्हणजे मनुष्याचें मन निरोगी आहे असें आपण समजतों. ज्या मनुष्याचें मन निरोगी आहे, त्याच्या सर्व क्रिया विचारपूर्वक होत असतात. त्याचे मनोविकार बेफाम झालेले नसतात किंवा दुबळेही झालेले नसतात. त्याची प्रवर्तक शक्तिही भक्कम असते.

तीन वर्षेपर्यंत लहान मुलाचे प्रेम, राग, मत्सर हे मनोविकार फार प्रबळ असतात. मग मुलाला हळूहळू कळू लागतें. स्वतःचा मोठेपणा दाखविण्याची त्याची सहजप्रवृत्ति मग वाढत जाते. मुलाला जरी आईबापाचें प्रेम वाटत असतें, तरी तें प्रेम स्वार्थी असतें. त्याला आपणावर आईबापांनीं प्रेम करावें ही फार इच्छा असते. मूल प्रेमाचें भुकेलें असतें. ज्याप्रमाणें सात्विक अन्न व मोकळी हवा यांची त्याला आवश्यकता असते, त्याचप्रमाणें प्रेमाची त्याला आवश्यकता असते. प्रेमाच्या वातावरणांत मुलाला सुख व आनंद मिळतो व त्याचें मानसिक आरोग्य चांगलें राहतें. मुलावर प्रेम करणें म्हणजे मुलाचे फाजील लाड करून त्याला बिघडविणें नव्हे. मूल तीन वर्षांचें होईपर्यंत, आईनें व बापानें प्रेमानें आपणास घ्यावें, मांडीवर बसवावें, पोटाशीं धरावें अशी त्याला फार इच्छा असते. आईबापांच्या या प्रेमाच्या वर्तनानें मुलाच्या मनाला शांति मिळते व त्याला फार आनंद वाटतो.

घरांत आईबापांच्यामध्यें खरें प्रेम नसलें व प्रेमाचें व शांतीचें वातावरण नांदत नसलें, कीं त्याचा अनिष्ट परिणाम मुलाच्या मानसिक आरोग्यावर होतो. ज्याप्रमाणें भरपूर सूर्यप्रकाश व पाणी हीं वनस्पतींला मिळालीं नाहींत कीं, त्यांची वाढ खुंटते, त्या रोगट बनतात, त्याप्रमाणें घरांतील निष्प्रेम वातावरणाचा व भांडणाचा परिणाम मुलावर होतो. गुन्हेगार वृत्तीचीं जीं मुलें असतात त्यांचें मानसिक आरोग्य बिघडण्याला घरचें निष्प्रेम वातावरण व

भांडणतंटे हींच कारण होतात. ज्या कुटुंबांत पतीचें पत्नीवर व पत्नीचें पतीवर उत्कट प्रेम असतें, परस्पराबद्दल अत्यंत आदर व विश्वास असतो, त्या कुटुंबांतील मुलांच्या मानसिक आरोग्याची वृद्धि होण्याला अत्यंत अनुकूल असें वातावरण असतें.

लहान मूल प्रेमाचें भुकेलें असतें. मूल तीन वर्षांचें होईपर्यंत आईबापांनीं आपणांस घ्यावें, पोटाशीं धरावें, मांडीवर किंवा खांद्यावर घ्यावें, गाणीं गावीं, थोपटावें अशी त्याला फार इच्छा असते. ही इच्छा तृप्त झाली, तर त्याला समाधान व शांति मिळते. आईबापांनीं मुलाला एकसारखें मांडीवर खेळवावें, तें रडलें कीं लगेच त्याला थोपटावें व त्याचे फाजील लाड करावे ही गोष्ट मुलाच्या आरोग्यदृष्ट्या वाईट आहे. मूल स्वतंत्र खेळलें पाहिजे, तें परावलंबी न बनलें पाहिजे. फाजील लाडानें मूल बिघडतें व तें परावलंबी बनतें.

तिन वर्षांनंतर मुलाची स्वतःचा मोठेपणा दाखविण्याची सहजप्रवृत्ति हळू हळू काम करूं लागते. ही फार महत्त्वाची सहजप्रवृत्ति आहे. तिची योग्य वाढ झाली पाहिजे व तिला चांगलें वळण मिळालें पाहिजे. या सहजप्रवृत्तीला अनिष्ट वळण मिळालें किंवा ती दाबून टाकण्यांत आली कीं, मुलाचें मानासिक आरोग्य बिघडतें. लहान मूल वडील माणसाच्या मानानें फार दुर्बळ असतें, त्याची विचारशक्तीहि कमी असते, ही गोष्ट त्याला माहीत असते. तें स्वतः आपली मानासिक शक्ति व शारीरिक शक्ति वाढविण्याचा प्रयत्न करीत असतें. या कामांत वडील माणसांनीं त्याला उत्तेजन दिलें पाहिजे. त्याच्या मनाच्या व शरीराच्या दुर्बळपणाची जाणीव त्याला प्रत्येक वेळीं करून देणें व त्याला हिणविणें हें फार अनिष्ट आहे.

मुलाकडून हळूहळू त्याचीं स्वतःचीं कामें करून घ्यावीं, त्याला आपणांस मदत करण्यास सांगावें, त्याला विचार करण्यास व शारीरिक सामर्थ्याचीं व चातुर्याचीं कामें करण्यास उत्तेजन दिल्यानें मुलाच्या या सहजप्रवृत्तीला योग्य वळण लागतें व तिची वाढ होते. तीन वर्षांचा रामू हळूच मोठ्या चतुराईनें खुर्चीवर चढून मग टेबलावर उभा राहिला. त्यानें टाळ्या वाजविल्या व बापाला हाक मारून आपली कृति मोठ्या डौलानें दाखविली. वडिलांनीं त्याचा दंड धरून त्यास खालीं ओढलें व त्याच्या पाठींत एक धपका दिला. चार

वर्षांच्या यमूनें आईचा स्वयंपाक झालेला पाहिला व पाट मांडले. त्यांच्या शेजारीं पाण्यानें भरलेले तांबे ठेवण्यास सुरवात केली. एक तांब्या तिच्या हातून सांडला. आईला अतिशय राग आला व तिनें तिचा चांगला गालगुच्चा घेतला. मुलाचा हेतु लक्षांत न घेतां अशा प्रकारें त्याची मानखंडना केली, तर त्याचा मोठेपणा दाखविण्याच्या सहजप्रवृत्तीची वाढ होत नाहीं किंवा तिला अनिष्ट असें वळण लागतें. रामभाऊचा मुलगा वसंत यानें एकदां त्यांचा टाक घेऊन त्यांच्या लिहिलेल्या एका कागदावर रेघोट्या ओढल्या. रामभाऊनें असें करूं नये म्हणून गोडीनें त्यास सांगितलें व त्याला एक कोरी वही व लाकडी पेन्सिल रेघोट्या काढण्यास दिली. पांच वर्षांची बनी एकदां चहाची कपबशी घेऊन बापाला चहा देण्यास गेली. तिच्या हातून चहा सांडला गेला, पण आई तिला रागें भरली नाहीं. तिनें तो चहा टाकून दिला व कपबशी कशी धरावी हें तिला दाखविलें. या नंतर बनी नेहमीं चहा नेऊन देत असे व त्यांत तिला धन्यता वाटे.

'हें करूं नको' 'तें करूं नको', 'हें कर, तें कर' अशा आज्ञा लहान मुलांना सतत देण्याचा वडील माणसांना फार मोह होतो. एका मानसशास्त्रज्ञानें लिहिलें आहे कीं, तो आपल्या स्नेह्याच्या एथें बसला असतां, त्या स्नेह्यानें व त्याच्या बायकोनें अर्ध्या तासाच्या आंत 'अमुक एक गोष्ट करूं नको व अमुक एक गोष्ट कर' अशा १५० आज्ञा लहान मुलीला दिल्या. दुसरी एक मजेची गोष्ट एका इंग्लिश लेखकानें दिली आहे. जॉन नांवाचा एक मुलगा होता. त्याला त्याचे आईबाप नेहमीं John Don't, "जॉन, हें करूं नको, तें करूं नको", अशा सतत आज्ञा द्यावयाचे. एकदां एक गृहस्थ जॉनचे घरीं आले. त्यांनीं त्याला विचारिलें, "बाळ, तुझें नांव काय !" मुलानें उत्तर दिलें, "माझें नांव John Don't." [ करूं नको जॉन ! ] मोठेपणा दाखविण्याच्या सहजप्रवृत्तीला योग्य संधि मिळाली नाहीं कीं ती अनिष्ट मार्गाला लागते. एका कुटुंबांत दोन मुलें होतीं. लहाना भाऊ वडील भावापेक्षां बुद्धीनें चांगला होता. यामुळें घरांत त्याचें कोडकौतुक होऊं लागलें. दोन्ही मुलें शाळेंत गेल्यावर शिक्षकही लहान भावाची स्तुति करूं लागले. वडील भाऊ हळूहळू वर्गांत खोड्या करूं लागला. सर्व वर्गाचें व त्याच्या सोबत्यांचें लक्ष त्याजकडेच लागलें. शिक्षक त्याच्या घरीं

येऊन त्या मुलाबद्दल आईबापांस सांगूं लागले. यामुळें त्या मुलाला फार धन्यता वाटली. मोठेपणा दाखविण्याची संधि त्यानें खोड्या करून मिळविली.

शाळेंत खोड्या करणारीं मुलें, शिस्तीचा भंग करणारीं मुलें हीं स्वभावानें वाईट नसतात. त्यांची तशी वृत्ति बनण्याला कारण योग्य संधीचा अभाव हेंच असतें. वर्गांत हुशार मुलाची स्तुति होते. त्या मुलाच्या कृतीची जो तो वाहवा करीत असतो. ज्या मुलांना अशी संधि मिळत नाहीं तीं मुलें खोड्या करून अथवा शिस्तीचा भंग करून मोठेपणा दाखविण्याचा प्रयत्न करितात. शिक्षा केल्यानें मुलांतील ही खोड कमी न होतां अधिकच वाढते. माझ्याच नातेवाईकाचा एक मुलगा पुण्यांतील एका हायस्कुलांत होता. तो बुद्धीनें कमी नव्हता, पण अभ्यासांत त्याला गोडी वाटत नसे. त्यानें एकदा शाळेंतील वार्षिक संमेलनाचे वेळीं लेखन हॉलमधील दौतींत थोडें थोडें तूप ओतून ठेविलें. दुसऱ्या दिवशीं शिपायानें या दौतींत शाई घातली. लेखनाला जेव्हां एक वर्ग आला तेव्हां एकाही मुलांचें अक्षर उमटेना. शिक्षकाला अत्यंत आश्चर्य वाटलें. एका मुलाला शाईला तुपाचा वास आला. त्यानें ती गोष्ट शिक्षकाला सांगितली. सरतेशेवटीं चौकशी केल्यावर अमक्या विद्यार्थ्यानें तूप दौतींत घातलें ही गोष्ट कळली. हेडमास्तरनें ह्या मुलाला दंड केला. पण तो विद्यार्थी सर्व शाळेंत प्रसिद्ध झाला व मुलांचा मोठा आवडता झाला. खोड्या करण्याची व शिस्तीचा भंग करण्याची त्याची संवय नाहींशी झाली नाहीं. याच विद्यार्थ्याला आईबापांनीं व शिक्षकांनीं मोठेपणा दाखविण्याची योग्य संधि दिली असती, तर तो चांगल्या मार्गाला लागला असता व त्या योगानें त्याचें व समाजाचें कल्याण झालें असतें. लॉर्ड क्लाईव्ह लहानपणीं फार खोडकर होता; पण त्याला हिंदुस्तानांत मोठेपणा दाखविण्याची योग्य संधि मिळाल्याबरोबर त्यानें स्वतःचें व ब्रिटिश राष्ट्राचें अपरिमित कल्याण केलें. सारांश, मुलाच्या मोठेपणा दाखविण्याच्या प्रवृत्तीला संधि देऊन तिला इष्ट मार्गाला लावलें, तर मुलाचें मानसिक आरोग्य वाढतें. नाहींतर तें बिघडतें. कित्येक वेळां वडील माणसें मुलाला त्याचा मोठेपणा दाखविण्याची संधि तर देत नाहींत पण उलटपक्षीं ' तूं वेडा आहेस, तुला कांहीं यावयाचें नाहीं, ' अशा प्रकारें बोलून त्याची मानहानी करितात. वडिलांच्या अशा कृतीमुळें मुलाच्या मनावर वाईट परिणाम होतो. आपण कमी आहोंत व दुबळे आहोंत ही

समजूत त्याच्या मनांत दृढ होते, वत्याची मानसिक प्रगति थांबते. या मानहानी-मुळें वडील माणसांबद्दल भीति व द्वेष त्याच्या मनांत उत्पन्न होतात व तें मूल या मनोविकारांच्या प्रेरणेनें कांहींतरी विक्षिप्तपणाच्या व वेडेपणाच्या कृति देखील करूं लागते.

मुलावर वाटेल तसा अंमल चालविण्याची मोठ्या माणसांना फार संवय असते. बापाचे चार स्नेही जमून चकाट्या पिटीत बसतात व मुलगा अभ्यास करीत असला, तरी बाप त्याला उठवून विड्या आणण्यास धाडतो व मुलगा कां कूं करूं लागला तर त्याला शिक्षा करतो. या असल्या कृतीनें मुलाचा स्वाभिमान नाहींसा होतो, व वडील माणसाबद्दल द्वेष त्याचे मनांत उत्पन्न होतो.

मुलाच्या मनांत द्वेष व मत्सर हे मनोविकार उत्पन्न होऊं नयेत व ते प्रबळ होऊं नयेत याजबद्दल काळजी घेतली पाहिजे. कारण या दोन्ही मनोविकारांनीं मनाची शांति बिघडते व मनाला विकृति जडते. एका मुलाचे लाड करणें व दुसऱ्या मुलाला तुच्छ लेखणें, मुलाला वारंवार हुकूम देणें व त्याला तुच्छतेनें वागविणें, त्याच्या मोठेपणाच्या सहजप्रवृत्तीला दडपून टाकणें इत्यादि गोष्टींनीं मुलाच्या मनांत वडील माणसाबद्दल द्वेष उत्पन्न होतो. हा द्वेष उघडउघड नसतो; तो मनांत दडलेला असतो. यामुळें मूल कधीं कधीं कांहीं तरी विक्षिप्तपणाच्या कृति करितें. विद्वान मानसशास्त्रज्ञ नील साहेब यांनीं आपल्या शाळेंतील एका मुलाची एक गमतीची गोष्ट सांगितली आहे. एका मुलाला त्यांनीं कांहीं एक कृति करूं दिली नाहीं. त्यामुळें नील साहेबांचा त्याला फार राग आला. मुलाच्या बापाच्या जुलमी वर्तनानें या मुलाच्या मनांत द्वेषाचा मनोविकार फार प्रबळ झालेलाच होता. नील साहेबांवर तें मूल रागावलें व बागेंत जाऊन त्यानें गोगलगाई बुटाखालीं चेंगरण्याचा क्रम आरंभिला. नील साहेबांनीं त्याला परत बोलाविलें. त्याला त्यांनीं " माझें नांव लिही " असें सांगितलें. मुलानें R. S. Neil असें लिहिलें. नंतर आपल्या नांवाखालीं Snail म्हणजे गोगलगाय हा शब्द लिहिण्यास त्यास सांगितलें. S. Neil आणि Snail शब्दाचें अगदीं साम्य होतें. एस्. नील साहेबांचा राग स्नेल या प्राण्यावर मुलानें काढला.

भीति हा मनोविकार प्रबळ झाला असतांना देखील मुलाच्या मनाचें आरोग्य बिघडतें. भीति हा मनोविकार योग्य प्रमाणांत असला व भीति विचारपूर्वक

असली म्हणजे तिचा मनाच्या आरोग्यावर अनिष्ट परिणाम होत नाहीं. पण तीच वेडेपणाची असली म्हणजे तिजपासून मनावर अनिष्ट परिणाम होतो. एखाद्या भयंकर भीतीनें मुलाच्या मनाला धक्का बसतो व पुढें हा भीतिदायक प्रसंग मूल विसरलें तरी अंतःकरणांत खोल दडून असलेली भीति मुलाच्या मनांत भलतीच विकृति उत्पन्न करिते. एका मानसशास्त्रज्ञ डॉक्टरकडे एक बाई उपचाराकरितां आली; ही बाई शिक्षक होती. कोणताही धारेचा पदार्थ पाहिला कीं, तिच्या अंगाला घाम येत असे व तिचें अंग थरथर कापूं लागे. आपली भीति वेडेपणाची आहे हें जरी तिला माहित होतें, तरी तिला आत्म-संयमन करितां येत नसे. डॉक्टरनें तिला मोहनिद्रा आणिली व तिला निद्रेंत लहानपणाची हकीकत विचारली. तेव्हां तिनें लहानपणीं घडलेली हकीकत डॉक्टरला सांगितली. ही बाई लहान असतांना तिला एक भाऊ झाला. हा भाऊ कोठून आला म्हणून तिनें घरांतील स्वयंपाक करणाऱ्या बाईला विचा-रलें. तिनें सांगितलें कीं, डॉक्टर आईचें अंग चाकूनें फाडून काढतात व त्याचें मूल बनवितात. तेव्हांपासून तिच्या मनांत चाकूची भीति खूप खोल दडून बसली होती व तिच्यामुळें तिच्या अंगाचा थरकांप होई.

आईबाप व शिक्षक यांबद्दल मुलाच्या मनांत प्रेम व विश्वास पाहिजे. त्यांच्या-बद्दल मुलाचे मनांत धाक वाटतां कामा नये. धाकामुळें मुलें खोटें बोल-तात व लबाडी करितात. मुलाला ज्या ज्या गोष्टीची भीति वाटते त्या त्या गोष्टी त्यांनीं निःशंक मनानें वडील माणसांना किंवा शिक्षकाला सांगितल्या पाहिजेत. खऱ्या भीतीपेक्षां वेडेपणानें वाटत असलेली भीतीच मुलाचें आरोग्य बिघडविण्यास कारण होते. बागुलबुवाची भीति, राक्षसाची भीति, डॉक्टरची भीति, शिक्षकाची भीति, नरकाची भीति, देवाच्या शिक्षेची भीति, या सर्व भीतींमुळें मुलाचें आरोग्य बिघडतें. संकटें आयुष्यांत येणारच. संकटाला धैर्यानें तोंड देण्याची मुलाला संवय लागली पाहिजे. काल्पनिक भीतीनें त्यानें गांगरून जातां कामा नये.

मुलाचें मानसिक आरोग्य बिघडण्याला बहुधा त्याच्या भोंवतालची परि-स्थिति हेंच कारण होतें. आईबाप, वडील माणसें, चाकर माणसें, शिक्षक यांच्या अविचारी वर्तनानें मुलाचें मानसिक आरोग्य बिघडतें. मुलाचें मानसिक

आरोग्य बिघडलें कीं, त्याच्या मनाची वाढ होत नाहीं. कांहींतरी मानसिक विकृति उत्पन्न होते. त्यामुळें मूल हट्टी, चिडखोर, खोडकर, खोटें बोलणारें व कधीं कधीं वेडसरही बनतें. ताप, खोकला, पडसें, गोवर वगैरे विकृति झाल्या असतां ज्याप्रमाणें आपण मुलाला त्याजबद्दल जबाबदार धरत नाहीं, त्याचप्रमाणें असत्य भाषण, अप्रामाणिकपणा, खोड्या, हट्टीपणा, चिडखोरपणा, भित्रेपणा वगैरे मानसिक विकृतींबद्दल मुलाला दोष देण्यांत अर्थ नाहीं. या सर्व दोषांची जबाबदारी वडील माणसांच्या वर्तनावरच असते. वडील माणसांनीं शहाणपणानें आपलें वर्तन सुधारणें हाच मुलाच्या मानसिक विकृति दूर करण्याचा मार्ग आहे. मुलाला शिक्षा करून कांहीं फायदा नाहीं. मुलाला पडसें आलें, तर तें त्याला शिक्षा करून दूर होत नाहीं, त्याचप्रमाणें मुलाची हट्टीपणाची मानसिक विकृति त्याला झोडपून बरी होणार नाहीं. भोंवतालची परिस्थिति सुधारून मुलाच्या दबलेल्या किंवा अनिष्ट मार्गानें जाणाऱ्या सहजप्रवृत्तीला योग्य मार्गानें काम करण्याची भरपूर संधि देणें हाच मानसिकविकृति दूर करण्याचा उत्कृष्ट मार्ग होय. कुटुंबांत प्रेम आणि शांति पाहिजे. त्याशिवाय मुलाच्या मनाचें आरोग्य राखण्याला योग्य असें वातावरणच तयार होणार नाहीं. घरच्या वडील मंडळींनीं व शिक्षकांनीं मुलाच्या सहजप्रवृत्तींना योग्य मार्गानें काम करण्याची संधि देणें हेंच मुलाचें मानसिक आरोग्य राखण्याचें उत्कृष्ट साधन आहे. मुलाच्या मनांत द्वेष, मत्सर यांना थारा मिळतां कामा नये. मुलाच्या मनांतील भीति हा मनोविकार प्रबळ होतां कामा नये. सुधारलेल्या देशांत मुलाच्या मानसिक विकृतींचा अभ्यास केलेले मानसशास्त्रज्ञ डॉक्टर असतात. हे मुलाच्या विकृतींचा विचार करून योग्य उपाय सुचवितात व अशा प्रकारें शिक्षकाला आणि पालकाला मदत करतात.

मुलाच्या स्वभावांत जे निरनिराळे दोष दिसून येतात ते कां उत्पन्न होतात व ते नाहींसे होण्याकरितां कोणते उपाय योजले पाहिजेत याचा थोडक्यांत विचार करूं. प्रथम आपण हट्टी मुलांचा विचार करूं. ज्या मुलाचे घरीं फार लाड करितात तींच मुलें बहुधा हट्टी बनतात. मुलाला जी कांहीं इच्छा होईल ती पुरविण्याला आईबाप व इतर माणसें तयार असतात. यामुळें मुलाला विचार करण्याची व आत्मसंयमन करण्याची मुळींच संवय लागत नाहीं. हट्टी मुलें दुसऱ्याच्या सोयीकडे मुळींच पाहात नाहींत. हट्टी मुलें शाळेंत

जाऊं लागलीं म्हणजे तेथील निराळ्या वातावरणांत तीं चांगलीं सुधारतात. शाळेंत आपला हट्ट कोणी पुरवीत नाहीं, आपण जर हट्ट केला, तर सगळीं मुलें आपणांला हसतात व शिक्षक आपणाला वर्गाच्या बाहेर बसवितात हें मुलाला कळलें म्हणजे मूल हट्ट सहसा करीत नाहीं. आपल्या वर्गातील मुलें आपला हट्ट चालूं देणार नाहींत व आपणाला खेळावयालाही घेणार नाहींत हें हट्टी मुलाच्या लक्षांत आलें म्हणजे तें हट्ट करण्याचें सोडून देते व मुलांत मिळून मिसळून वागूं लागतें व खेळाचे सर्व नियम पाळूं लागतें. मुलाला त्याच्या समवयस्क सोबत्यांत मिसळूं दिल्यानें मुलाचा हट्टी स्वभाव कमी होतो. जीं मुलें अशक्त व दुबळीं असतात तीं देखील पुष्कळ वेळां हट्टी असतात. दुर्बळ मेंदूमुळें त्यांना आत्मसंयमन करण्याची शक्तीच नसते. अशा मुलांची प्रकृति सुधारली व तीं समवयस्क मुलांत खेळूं लागलीं कीं त्यांचा हट्टी स्वभाव नाहींसा होतो. मुलांनीं हट्ट केल्यास पुष्कळ वेळां त्यांच्याकडे लक्ष न देणेंच चांगलें असतें. जेवतांना हट्ट घेऊन रुसलेल्या मुलाकडे लक्ष न देतां घरची मंडळी जेऊन उठली व मूल उपाशी राहिलें कीं, दुसऱ्या खेपेला तें रुसत नाहीं व हट्ट करीत नाहीं. मारझोड केल्यानें किंवा आरड ओरड केल्यानें हट्टी मुलावर कांहींच इष्ट असा परिणाम होत नाहीं.

मुलें पांच सहा वर्षांचीं झालीं कीं त्यांची प्रवर्तकशक्ति जोरदार होऊं लागते. यावेळीं सर्वच मुलांचा स्वभाव कांहींसा हट्टी बनतो. यावेळीं मुलांना वडील माणसांची आज्ञा धाब्यावर बसवून आपल्या इच्छेप्रमाणें वागण्यांत गंमत वाटते. पण मुलाची हट्ट करण्याची ही प्रवृत्ति थोड्याच काळांत नाहींशी होते. घरच्या व शाळेच्या नियमांची उपयुक्तता त्यांना कळूं लागते. हट्ट केल्यानें घरीं किंवा शाळेंत आपणाला त्रास होतो याची त्यांना जाणीव होते. समाजसहवासप्रियता ही प्रवृत्ति मुलांत जोरदार असल्यामुळें ज्यायोगानें घरची मंडळी अगर शाळेंतील आपले शिक्षक व सोबती आपणाला त्यांच्या सहवासांत राहूं देणार नाहीं असें आचरण करण्यास मूल भितें. घरच्या मंडळीनें व शाळेंत शिक्षकानें व सोबत्यांनीं आपणांस चांगलें म्हणावें अशी मुलास फार आवड असते. यामुळेंही मूल आपलाच हट्ट धरून बसत नाहीं. मनाची अथवा शरिराची दुर्बलता, फाज़ील लाड, घरच्या शिस्तीचा अभाव, इत्यादि कारणांनीं मुलें हट्टी बनतात. मुलांची शरीरप्रकृति सुधारली, त्यांच्या ज्ञानांत

भर पडली, त्यांच्या वयाच्या मुलांत मिळूनमिसळून वागण्याची त्यांना संधि मिळाली कीं त्यांचा हट्टीपणा नाहींसा होतो. मुलांतील हा दुर्गुण नाहींसा करितांना शिक्षकांनीं व पालकांनीं फार काळजी घेतली पाहिजे. धमकीमुळें किंवा शिक्षेमुळें मुलाची प्रवर्तकशक्ति दुर्बल होते व त्यांचा स्वाभिमान कमी होतो. कधीं कधीं वडील माणसांच्या शिक्षेमुळें मुलाच्या मनांतील त्यांच्या-बद्दलचें प्रेम व विश्वास हीं कमी होतात व मूल जास्तच हट्टी बनतें.

कांहीं मुलें फार स्वार्थी असतात. स्वतांच्या स्वार्थापलीकडे त्यांना कांहींच दिसत नाहीं. सर्व खाऊ मलाच दिला पाहिजे, नवीन खेळणीं मलाच दिलीं पाहिजेत, वडील माणसांनीं माझेच लाड केले पाहिजेत असें त्यांना वाटतें. मुलें तीन चार वर्षांचीं होईपर्यंत त्यांना स्वतांच्या पलीकडे फारसें कळत नाहीं. या वयांत त्यांच्या अंगीं सहानुभूति, परोपकार वगैरे मनोवृत्तींची अपेक्षा करणें शक्य नाहीं. यानंतर मुलांच्या मनांत समाजसहवासप्रियता ही सहजप्रवृत्ति जोरदार होऊं लागते. यामुळें प्रेम, सहानुभूति, आदर, वगैरे मनोविकार त्यांच्या मनांत उत्पन्न होतात व आईला व वडिलांना मदत करणें, लहान भावाला खेळविणें, थोरल्या व धाकट्या भावंडांना आपल्या खाऊंतील खाऊ देणें, सोबत्याला आपलीं खेळणीं देणें वगैरे कृति तीं करूं लागतात. मुलांचा आप्पलपोटेपणा त्यांच्या वाढत्या वयाबरोबर कमी कमी होत गेला पाहिजे. ज्या मुलांचे घरीं फार लाड होतात, ज्या मुलांना घरीं भाऊबहिणी नसतात, ज्यांना समवयस्क मुलांत मिसळण्याची व खेळण्याची संधि मिळत नाहीं तींच मुलें फार स्वार्थी बनतात. मुलांना बरोबरीच्या मुलांत खेळण्याची संवय लागली कीं, बहुधा त्यांचा स्वार्थीपणा कमी होतो. गणू फार आप्पलपोट्या होता. त्याच्या बापानें त्याला एक रंगित दांडू व रबरी चेंडू आणून दिला. गणूला चेंडूदांडू खेळण्याची फार इच्छा झाली. त्यानें शेजारच्या रामूला हाक मारली व खेळावयास बोलाविलें. खेळाला सुरुवात झाली. गणू दांडूनें चेंडू मारूं लागला व रामू तो झेलण्याचा यत्न करूं लागला. गणूनें पांचसहा टोले मारल्यावर रामूनें गणूचा चेंडू झेलला व तो गणूजवळ चेंडू व दांडू खेळण्यास मागूं लागला. गणूला आपला नवा चेंडू व दांडू रामूला देण्याचें जिवावर आलें. पण जर आपण रामूला खेळूं दिलें नाहीं, तर तो खेळ सोडून घरीं जाईल अशी भीति गणूला वाटली व त्यानें तो दांडू व चेंडू रामूला दिला

व आपण चेंडू झेलावयास उभा राहिला. अशा प्रकारें त्याला आत्मसंयमन करून आपला आप्पलपोटेपणा दाबून टाकावा लागला. गणूला सोबत्याचे सहवासांत हळूहळू मिळूनमिसळून वागण्याची संवय लागली व त्याचा आप्पलपोटेपणा कमी झाला. मुलांना पोपट, मैना, मांजर, कुत्रा वगैरे प्राणी पाळण्यास दिले असतां त्यांचा आप्पलपोटेपणा पुष्कळ कमी होतो. आपल्या आवडत्या प्राण्याचे लाड करण्यांत किंवा त्याची काळजी घेण्यांत त्यांना स्वतःला कितीही जरी त्रास झाला, तरी त्याजबद्दल त्यांना कांहींच वाटत नाहीं.

कांहीं मुलें फार मत्सरी असतात. दुसऱ्याचा उत्कर्ष त्यांना बिलकूल सहन होत नाहीं. हाही दुर्गुण मुलांत उत्पन्न होण्यास त्यांच्या वडील मंडळीचें आचरण कारण असतें. आईबापांच्या मत्सरी स्वभावामुळें पुष्कळ वेळां हा दुर्गुण मुलांना जडतो. शेजाऱ्यापाजाऱ्यांचा उत्कर्ष सहन न झाल्यामुळें आई-बाप मत्सरानें जळफळत असतात व त्या शेजाऱ्याबद्दल नेहमीं वाईट असें बोलत असतात. या त्यांच्या आचरणानें नकळतच या दुर्गुणाचीं बीजें मुलांच्या मनांत पेरलीं जातात. घरांतील वडील मंडळीच्या भाषणानें व कृतीनें लहान मुलांच्या मनांत आपल्या भावंडाबद्दल मत्सर उत्पन्न होतो व तो पुढील आयुष्यांतही कायम राहतो हें पुढें दिलेल्या गोष्टीवरून दिसून येईल. या गोष्टीवरून वडील माणसांनीं पुष्कळ बोध घेण्याजोगा आहे. एका श्रीमंत गृहस्थाला एक मुलगा झाला. या मुलाचे पाठीवर त्या श्रीमंत गृहस्थाचे पत्नीस सहासात वर्षें मूल झालें नाहीं, यामुळें या मुलाचे लाड त्या कुटुंबांत फार होत असत. हा मुलगा सहा वर्षांचा झाल्यावर त्या श्रीमंत गृहस्थास आणखी एक मुलगा झाला. नवीन भाऊ पाहून त्या मुलाला फार आनंद झाला. कांहीं दिवसांनीं त्या श्रीमंत गृहस्थाच्या घरचीं नातेवाईक मंडळी या धाकट्या मुलाचे फार लाड करूं लागली. एक दिवस त्या मुलाची आत्या त्याला म्हणाली "बघ, हा तुझा भाऊ कसा तुझ्यापेक्षां गोरा आहे. आतां तुला या घरांत कोण विचारतो? आतां आई व बाबा या बाळालाच घेतील व त्यालाच खेळवतील. आम्ही सगळे आतां त्यालाच खेळवूं व खाऊ देऊं. आतां तुला नकट्याला कोण विचारतें?" आत्याचें हें भाषण ऐकून त्या मुलाला फार वाईट वाटलें. आणखी इतर माणसांचींही अशाच प्रकारचीं भाषणें ऐकल्यावर या मुलाला आपल्या भावाचा फार मत्सर वाटूं लागला व तो त्या चिमुकल्या

भावाचा फार द्वेष करूं लागला. पुढें हा मुलगा मोठा झाल्यावरही त्याच्या मनांत भावाबद्दलचा मत्सर कायम राहिला. वडील माणसांच्या अशा प्रकारच्या बोलण्यानें लहान मुलांच्या मनावर अनिष्ट परिणाम घडतो. आपण दुसऱ्यापेक्षां कमी आहों अशी खात्री झाल्याशिवाय दुसऱ्याबद्दल मत्सर उत्पन्न होत नाहीं. तेव्हां अशी कमीपणाची कल्पना मुलाच्या मनांत न येईल अशी खबरदारी वडील माणसांनीं घेतली पाहिजे. 'अमुक मुलगा कसा हुशार आहे, तूं फार शंख आहेस; तुला त्याच्या खेटरांची देखील लायकी नाहीं,' अशा-प्रकारें मुलाची मानहानी केल्यामुळेंच त्या हुशार मुलाबद्दल मत्सर या मुलाच्या मनांत उत्पन्न होतो. मत्सराच्या योगानें मुलाची मानसिक शक्ति दुबळी होते व त्याचा आनंद नाहींसा होतो. स्पर्धेबद्दल लिहितांना मत्सराबद्दल विवेचन केलेंच आहे.

असत्यभाषण हा दुर्गुण पुष्कळ मुलांत लहानपणीं दिसून येतो. लहानपणीं मुलांचें ज्ञान व अनुभव हीं अगदीं कोतीं असतात, यामुळें अमुक एक गोष्ट खरी आहे किंवा ती खोटी आहे हें त्यांना कळतच नाहीं. मुलांच्या वयाबरोबर त्यांचें ज्ञान व अनुभव हीं वाढत जातात व नंतर सत्य व असत्य यांतील भेद मुलांना कळूं लागतो. कित्येक मुलांची कल्पनाशक्ति फार दांडगी असते व तीं मुलें आपल्या कल्पनेनें एखादी गोष्ट रचतात व ती आपण प्रत्यक्ष पाहिली असाच त्यांचा ग्रह होतो. पुढें या मुलांची विचारशक्ति वाढली म्हणजे कल्पनेनें काढलेलीं हीं चित्रें खरीं नाहींत असें त्यांना कळूं लागतें. स्तुतिप्रियता ही सहजप्रवृत्ति लहानपणीं फार जोरदार असते, यामुळें पुष्कळ वेळां मुलें आपल्या स्वतःविषयीं, आपल्या वडिलाविषयीं, भावाविषयीं, घरच्या संपत्ती-विषयीं अतिशयोक्ति करून खोट्या गोष्टी सांगतात. घरीं आईबापांची शिस्त कडक असली व मुलांना आईबापांची भीति वाटत असली म्हणजे आपला अपराध लपविण्याकरितां व शिक्षा टाळण्याकरितां मुलें खोटं बोलतात. शाळें-तील शिस्त जर अतिशय कडक असली व मुलांना शिक्षकाची फार भीति वाटत असली म्हणजे शाळेंतही मुलें शिक्षेच्या भीतीनें खोटें बोलतात. मुलाच्या आंगचा हा असत्यभाषणाचा दुर्गुण घालविण्याचे कामीं शिक्षकांनीं व पालकांनीं फार काळजी घेतली पाहिजे. मुलांवरील आपला विश्वास पार उडाला आहे असें त्यांनीं दाखवितां कामा नये. मुलांच्या ज्ञानांत भर पडली, मुलांचा

अनुभव वाढत गेला, पालक व शिक्षक यांजबद्दल त्यांच्या मनांत असलेली भीति नाहींशी झाली कीं, मुलांची असत्य बोलण्याची वृत्ति कमी होत जाते. असत्य बोलण्यानें दुसऱ्याचा आपल्यावरील विश्वास नाहींसा होतो हें त्यांना कळलें म्हणजे ही त्यांची असत्यभाषणाची वृत्ति कमी होते.

रागिटपणा, भित्रेपणा, भांडखोरपणा, खोडकरपणा इत्यादि मुलांच्या दोषांबद्दल मागें सहजप्रवृत्तीसंबंधानें लिहितांना विवेचन केलेंच आहे. तेव्हां त्या दोषांचें पुन्हा याठिकाणीं आणखी विवेचन करण्याचें कारण नाहीं. लहान मुलांच्या आचरणांत किंवा स्वभावांत जे दोष असतात त्यांचीं कारणें दोन प्रकारचीं असतात. मुलांच्या शरीरप्रकृतींत कांहीं दोष असल्यामुळें अगर मानसिक दुर्बळतेमुळें मुलाचे स्वभावांत व आचरणांत दोष उत्पन्न होतात. मुलांची शरीरप्रकृति चांगली असली व त्याच्यांत मानसिक दुर्बळता नसली, तरी घरच्या शिथिल अगर फाजील कडक शिस्तीमुळें मुलांच्या स्वभावांत दोष उत्पन्न होतात व त्यांचा परिणाम त्यांच्या वर्तनावरही दिसून येतो. शाळेंतील शिथिल अगर फाजील कडक शिस्तीचाही असाच अनिष्ट परिणाम होतो. मुलाच्या स्वभावांत जर कांहीं दोष आढळला, तर त्या दोषाचें कारण मुलाच्या शारीरिक अगर मानसिक दुर्बळतेंत आहे कीं काय याचा शोध करावा. शारीरिक अगर मानसिक दुर्बलता नाहींशी करण्यास डॉक्टरचा सल्ला घ्यावा. आपल्या फाजील लाडामुळें अगर अत्यंत कडक शिस्तीमुळें मुलांच्या स्वभावांत दोष उत्पन्न झाला आहे असें जर कळून आलें, तर पालकांनीं आपली शिस्त अवश्य सुधारावी. शिस्त सुधारल्यावर तिचा इष्ट असा परिणाम मुलाच्या स्वभावावर खात्रीनें होईल.

# भाग २० वा

## शिस्त, बक्षिसें व शिक्षा

प्राण्याचें पोषण व्हावें, रक्षण व्हावें व त्याची वंशवृद्धि व्हावी या हेतूनें प्रत्येक प्राण्यास कांहीं सहजप्रवृत्ति जन्मतः दिलेल्या असतात; या सहज-प्रवृत्तींच्या प्रेरणेनेंच त्या प्राण्याच्या कृति होत असतात, हें आपण मागें पाहि-लेच आहे. इतर प्राणी व मनुष्य प्राणी यांत फार अंतर आहे. इतर प्राण्यांप्रमाणें जरी मनुष्याला स्वतांचें पोषण, संरक्षण व वंशवृद्धि करावी लागते, तरी एव-ढेंच करणें हें त्याच्या आयुष्याचें ध्येय नव्हे. इतर प्राण्यांचा आयुष्यक्रम ठर-ल्याप्रमाणें हजारों वर्षें चाललेला आहे. पांच हजार वर्षांपूर्वी हरणांचा जो आयुष्यक्रम होता तोच सध्यांही चालू आहे. त्यांत कांहीं सुधारणा झाली नाहीं. मनुष्य प्राण्याची सुधारणा व प्रगति एकसारखी चालू आहे. मनुष्याला आ-पल्या पूर्वजांनीं मिळवून ठेवलेलें ज्ञान मिळवून त्यांत पुढील पिढीकरितां आणखी ज्ञानाची भर घालावी लागते. त्याला आपल्या स्वतांच्या शारीरिक बौद्धिक व नैतिक शक्तींचा शक्य तितका विकास करावयाचा असतो. परो-पकार, स्वार्थत्याग, ईश्वरभक्ति इत्यादि कृत्यांनीं त्याला स्वतांची अध्यात्मिक उन्नतिही करून घ्यावयाची असते. या सर्व कारणांकरितां मनुष्याला अगदीं लहानपणापासून शिक्षणाची गरज असते. हें शिक्षण त्याला कुटुंबांत व समा-जांत राहिल्यानें मिळतें.

मनुष्यप्राण्याला आपलें सर्व आयुष्य समाजांतच घालवावें लागतें. समा-जांतच राहिल्यानें त्याचे अनेक फायदे होतात. समाजांत राहिल्यानें व्यक्तीचें कल्याण होतें व तिचा सर्व प्रकारें फायदा होतो ही गोष्ट जरी खरी आहे, तरी समाज सुव्यवस्थित रहावा म्हणून जीं बंधनें अगर नियम केलेले असतात ते त्या समाजांतील प्रत्येक व्यक्तीला पाळावेच लागतात. आपल्यापासून दुसऱ्याला कोणत्याही प्रकारें त्रास होणार नाहीं अशाच प्रकारें समाजांतील प्रत्येक व्यक्तीला वागावें लागतें. प्रत्येक व्यक्तीला समाजाच्या कल्याणाकरितां कांहीं कर्तव्येंही करावीं लागतात. कुटुंब हाही लहानसा समाज आहे. कुटुंबांतच समाजांत वागण्याचें प्राथमिक शिक्षण मुलाला मिळतें. जेवतांना आपल्याच जागेवर

बसणें, आपल्या ताटांत वाढलेलेच पदार्थ खाणें, सर्व मंडळी जेवावयास लाग-ल्याशिवाय आपणच आधीं सुरुवात न करणें, स्वतांच्या वस्तु जपून ठेवणें, घरांतील वस्तूची मोडतोड न करणें, वडील माणसांना मदत करणें, धाकट्या मुलांच्या उपयोगीं पडणें, आरडून ओरडून दुसऱ्याला त्रास न देणें, वेळेच्या वेळेला आपलीं कामें करणें, पाहुण्यांशीं गोड बोलणें, वडील माणसांना नमस्कार करणें, त्यांच्याशीं विनयानें वागणें वगैरे कितीतरी गोष्टी मूल कुटुंबांत शिकतें. केवळ आपल्या इच्छेप्रमाणें वागल्यानें सुख होत नाहीं, कुटुंबांतील नियम पाळण्यानेंच फायदा होतो हें हळूहळू मुलाच्या लक्षांत येतें व तें कुटुंबां-तील शिस्तीचे नियम पाळूं लागतें. प्रथम कांहीं दिवस हे नियम पाळणें त्याला जड जातें, पण हळूहळू त्याला ते नियम पाळावयाची संवय लागते. ज्या कुटुंबांत उत्तम शिस्त आहे, जेथें मुलांचे फाजील लाड होत नाहींत, त्या कुटुंबांत मुलांना शिस्तीचे नियम पाळण्याची संवय लवकर लागते. ज्या कुटुं-बांत मुलाचे फाजील लाड होतात व जेथील शिस्त चांगली नसते, तेथें मुलांना नियम पाळण्याची संवय लागत नाहीं. अशाच कुटुंबांतील मुलें हट्टी व हेके-खोर असतात. मुलाच्या भोंवतालचें वातावरण प्रेमाचें पाहिजे. घरांतील सर्व मंडळीनें, विशेषतः आईबापांनीं मुलाला अत्यंत प्रेमानें वागविलें पाहिजे. प्रेमाच्या वातावरणाशिवाय मुलाची शारीरिक, बौद्धिक व नैतिक वाढ होणेंच शक्य नाहीं. पण प्रेमाच्या बरोबर शिस्त पाहिजे. प्रेमळ आईबाप जें सांगतात त्याजवर मुलाचा पूर्ण भरंवसा असतो व त्यांचा राग होऊं नये म्हणून ते जें सांगतील त्याप्रमाणें वागण्यास मूल तयार असतें. धाकदपटशानें व भीतीनें शिस्त लागत नाहीं. रागीट व मारकुट्या आईबापांच्या मुलांची सर्व प्रकारें वाढ थांबते व त्यांच्या आंगीं खोटेपणा, अप्रामाणिकपणा, ढोंगीपणा इत्यादि दुर्गुण फार लवकर जडतात.

पुष्कळ वेळां मुलें शिस्तीच्या एखादी विरुद्ध कृति करतात व आईबापांना मुलांचा राग येऊन ते मुलांना शिक्षा करितात, पण मुलानें एखादी कृति केल्यावर ती कृति मुलाच्या हातून कां घडली, याचा शांतपणें विचार केला पाहिजे. पुष्कळ वेळां मुलानें केलेल्या कृतीचा त्याच्या दृष्टीनें विचार केला असतां मुलाचा अपराध जितका मोठा आपणांला दिसतो तितका तो नसतो. जगाकडे पाहण्याची वडील माणसाची दृष्टि वेगळी असते, लहान मुलाची

दृष्टि वेगळी असते. मांजर, कुत्रें, चिमणी, कावळा, गाय, वासरूं, भुंगे, पोपट, फुलपांखरूं, इत्यादि दररोज पाहण्यांत येणाऱ्या, प्राण्यांविषयीं प्रौढ माणसांना कांहींच वाटत नाहीं, पण मुलांना यांत फार मौज वाटते. त्यांना भोंवतालच्या सर्व सृष्टीचें ज्ञान मिळवावयाचें असतें, म्हणूनच जिज्ञासा ही सहजप्रवृत्ति बाळपणीं फार जोरदार असते, तिच्या साहाय्यानें मूल आपल्या ज्ञानांत भर टाकीत असतें. रघुनाथरावानें आपल्या पांच वर्षांच्या शरद्‌ला एक दोन तीनचा धडा दिला व आपण कामाकरितां जरा बाहेर निघून गेले. ते परत आल्यावर पहातात तों शरद् मांजरीचीं तीन गोजिरवाणी पिलें पहात उभा होता. तें पाहून रघुनाथरावांला शरदचा फार राग आला. त्यांनीं त्याला एक थापड दिली व त्याचा हात धरून त्याला फरफर ओढीत आंत नेलें, व धडा करावयास बसविलें. मनी मांजरीनें आणलेलीं तीं तीन सुंदर पिलें पाहून शरदनें पाटी फेकून दिली व तो तीं पिलें पहावयास गेला यांत त्याची चूक ती काय झाली ? त्याच्या बापानें त्याला समजावून परत न्यावयास पाहिजे होतें. शरदचें लक्ष धड्याकडे बिलकूल लागेना. बापानें आपणांस कां मारावें हेंच त्याला कळेना. तो एकसारखा मुसमुसत होता. अखेर बापानें कंटाळून त्याची पाटी हिसकावून घेतली व त्याला आणखी दक्षिणा देऊन खोलीच्या बाहेर घालवून दिलें ! गणपतराव हे शिशुवर्गाचे शिक्षक होते. वर्गांत धडा चालत असतांना रस्त्यानें एक मिरवणूक चालली होती. तो आवाज ऐकतांच मुलांचें लक्ष साहजीकपणें पाठाकडून त्या मिरवणुकीकडे गेलें. गणपतरावांनीं आपला धडा बंद ठेवला व ते म्हणाले, 'पडवींत उभें राहून मिरवणूक पहा व चटकन् परत या.' मुलें पडवींत गेलीं. एक दोन मिनिटांत तीं परत आलीं व आपल्या पाठाकडे लक्ष देऊं लागलीं. मुलांची वृत्ति फार चंचल असते. जें जें कांहीं नवीन व आकर्षक त्यांना दिसतें तिकडे त्यांचें लक्ष ओढलें जातें. त्यांना आत्मसंयमनाची संवय लावावयाची असते, पण ती संवय लागण्यास त्यांच्या प्रवर्तक शक्तीची वाढ व्हावी लागते. ही शक्ति मुलांच्या वयाबरोबर हळूहळू वाढत असते ही गोष्ट आईबापांनीं व शिक्षकांनीं लक्षांत ठेविली पाहिजे.

कित्येक वेळां पालक मुलाचा हेतु लक्षांत न घेतां मुलाच्या हातून न कळत झालेल्या नुकसानीबद्दल त्याला शिक्षा करितात. ५ वर्षांचा धाकटा रामू

मधल्या सुटींत फराळाकरितां घरीं आला. त्याच्या वर्गांतील दगडू माने हा त्याच्या घराच्या मागील गल्लींत राहात होता. दगडू फार गरीब होता. त्याला बाप नव्हता. त्याची आई मोलमजूरी करून आपलें व आपल्या दोन मुलांचें पोट भरीत असे. मधल्या सुटींत त्याची आई घरीं नसे. दगडू रामूला म्हणाला. 'रामू, मला भूक फार लागली आहे. पण आई घरीं नाहीं. आज सकाळीं आईनें मला फारच थोडी भाकरी दिली होती.' आपल्या सोबत्याचे हे शब्द ऐकून रामूचें कोंवळें मन द्रवलें. तो त्याला घेऊन घरीं गेला. त्याची आई सरस्वतीबाई आपल्या बहिणीचे घरीं गेली होती. रामूनें दोन ताटें घेतलीं. एका ताटांत दगडूस वाढलें व एका ताटांत आपणांस त्यानें वाढून घेतलें, जेवण झाल्यावर दोघेहि निघून गेले. थोड्याच वेळानें सरस्वतीबाई परत आल्या. संध्याकाळकरितां ठेविलेल्या अन्नाचा रामूनें नाश केलेला पाहून त्यांना रामूचा फार राग आला. रामू घरीं परत आल्यावर त्याला सरस्वतीबाईनें चांगला चोप दिला; पण आपणांस आईनें शिक्षा कां दिली हें रामूला मात्र कळलें नाहीं.

मुलाच्या हातून अपराध झाला, तर त्या अपराधाचा योग्य विचार करून नंतर त्याला समजावून सांगावयाचें किंवा थोडी फार शिक्षा करावयाची हें पालकानें व शिक्षकानें ठरविलें पाहिजे. मुलांना नेहमीं शिक्षा दिल्यानें त्याचा परिणाम फार अनिष्ट होतो. शिक्षा देणाऱ्या माणसावरील त्यांचा विश्वास नाहींसा होतो व प्रेमही नष्ट होतें. आईबापांवरील किंवा शिक्षकावरील मुलांचें प्रेम व विश्वास हीं नष्ट झालीं कीं, मुलाच्या सुधारणेची आशाच खुंटली. नेहमीं शिक्षा मिळाल्यानें मुलाचा उल्हास व उत्साह हे नष्ट होतात. मिसेस मंफर्ड या इंग्लिश लेखिकेनें अशा मुलाची मनःस्थिति दाखविण्याकरितां एक मजेची गोष्ट सांगितली आहे. एका बाईला एक पांच वर्षांचा मुलगा रस्त्याच्या कडेला रडतांना दिसला. बाई त्याच्याजवळ गेली. तिनें त्याच्या पाठीवर हात फिरविला व 'बाळ, तूं कां रडतोस?' म्हणून त्याला विचारलें. मुलगा स्फुंदत स्फुंदत म्हणाला, 'बाबा घरीं नाहींत. ते आले म्हणजे मला मारतील. घरांत कांहीं फुटलें तुटलें, तर मींच तें केलें असें समजून बाबा मलाच मारतात.' बाई म्हणाली, "पण आज तुझ्या घरीं काय झालें आहे?" मुलगा म्हणाला, "आमच्या घरीं आज एक लहानसें नवीन बाळ आलें आहे. तें

सारखें रडतें आहे. बाबा आले म्हणजे ते मला मारतील व म्हणतील तूंच हें रडकें मूल आणलें, आणि म्हणून मी रडत आहें.—"

नवीन भाऊ झाल्यानें मुलाला नेहमीं आनंद वाटतो. पण घरांत एक नवीन मूल आलें याजबद्दल बाप नेहमींप्रमाणें आपल्याला जबाबदार धरून शिक्षा करील अशी भीति या मुलाला वाटत होती व त्यामुळें तो रस्त्यावर रडत उभा राहिला होता. ही गोष्ट दिसण्यांत जरी चमत्कारिक वाटते, तरी वडील माणसच्या विक्षिप्तपणामुळें मुलाच्या स्वभावावर कसा विपरित परिणाम होतो हें या गोष्टीवरून चांगलें लक्षांत येतें. दिवसभर जातां येतां मुलाला मारझोड केल्यामुळें मुलाची स्वाभाविक आनंदीवृत्ति नाहींशी होते. तें भित्रें बनतें. वडील माणसावरील त्याचा विश्वास, आदर व प्रेम हीं नाहींशीं होतात. शिक्षेच्या भीतीनें तें खोटें बोलूं लागतें. शाळेंत काय किंवा घरीं काय मुलाला प्रेमानें वागविलें पाहिजे. वडिलानें किंवा शिक्षकानें त्याला विनाकारण कधींही शिक्षा करितां कामा नये. मुलाच्या हातून अपराध झाला व त्या मानानें त्याला शिक्षा झाली, तर त्या शिक्षेबद्दल मुलाला अन्याय झाला असें वाटत नाहीं. वडील माणसांनीं व शिक्षकानें मुलाच्या स्वाभिमानाचें पोषणच केलें पाहिजे. शाळेंतील व घरांतील शिस्त प्रेमाची असावी; मुलाला शिक्षकाची किंवा वडिलाची भीति वाटतां कामा नये. हातून अपराध झाला, तर तो निःशंकपणें कबूल करण्याची मुलाला संवय लागली पाहिजे.

मुलाला टोंचून बोलणें, त्याचा पाणउतारा करणें ही गोष्ट चांगली नव्हे. मुलावर आपला विश्वास नाहीं असें वडील माणसांनीं किंवा शिक्षकानें कधींही दाखवूं नये. 'तूं चोर आहेस, तूं लबाड आहेस, तूं गाढव आहेस, तुला अक्कल कधींच यावयाची नाहीं' अशा प्रकारच्या वडील माणसाच्या विधानांनीं मुलाच्या स्वाभिमानाला धक्का बसतो व शिवाय असल्या विघातक सूचना केल्यानें मुलाच्या मनावर वाईट परिणाम होण्याचाही संभव असतो हें मागें सांगितलेंच आहे.

मुलाला घरीं व शाळेंत योग्य तें स्वातंत्र्य असलें पाहिजे. सकाळपासून रात्रीं निजेतोंपर्यंत वडील माणसांनीं मुलांना आज्ञा करावयाच्या व त्या मुलांनीं पाळावयाच्या अशी स्थिति जेथें असते तेथें मुलांचा नैतिक विकास होत नाहीं.

वडील माणसाच्या शिक्षेच्या किंवा रागाच्या भीतीनें मुलांनीं आपलीं कामें करावीं, याजपेक्षां त्यांनीं स्वतांच्या आवडीनें तीं कामें करावीं हें जास्त चांगलें. मुलांना योग्य तें स्वातंत्र्य असल्याशिवाय त्यांना खरें नैतिक शिक्षण मिळणेंच शक्य नाहीं व आत्मसंयमनाची उत्कृष्ट संवयही त्यांना लागणें शक्य नाहीं.

घरचे किंवा शाळेंतील नियम आनंदानें पाळणें, आपल्या सोबत्यांशीं मिळून-मिसळून वागणें, कुटुंबांतील मंडळीला, शिक्षकाला किंवा वर्गांतील सोबत्यांना जरूर पडेल तेव्हां मदत करणें, स्वतांच्या वस्तूंना व हक्कांना जपणें व दुसऱ्यांच्या वस्तूंना व हक्कांना धक्का न लावणें, स्वच्छतेनें व व्यवस्थित राहणें, धीटपणानें पण विनयानें वागणें, सत्य बोलणें इत्यादि चांगल्या संवयी लहानपणापासून मुलांना लावावयाच्या असतात. या सर्व संवयी लागण्यास घरीं व शाळेंत मुलाच्या भोंवतीं प्रेमाचें वातावरण पाहिजे. त्याचप्रमाणें त्याला योग्य तें स्वातंत्र्यही पाहिजे. प्रेमळ आईबाप व प्रेमळ शिक्षक यांचीच शिस्त मुलाच्या नैतिक विकासाला फार अनुकूल असते व अशा शिस्तींत वाढलेल्या मुलांच्या आंगीं अनेक चांगल्या संवयी जडतात.

मुलांना स्वाभाविकपणेंच काम करण्याची आवड असते. त्यांना रिकामें बसणें कधींही आवडत नाहीं. करावयाचें काम मात्र आनंददायक व त्यांना झेपेल असें असलें पाहिजे. घरीं व शाळेंत मुलें ज्या अनेक खोड्या करितात त्याचें कारण त्यांची कृतिप्रेमाची सहजप्रवृत्ति होय. मुलांना आनंददायक असें काम पुरवून त्यांना शिक्षण देणें यांतच आईबापाचें व शिक्षकाचें खरें चातुर्य असतें. कृतिप्रेम या सहजप्रवृत्तीबद्दल लिहितांना या गोष्टीचें विवेचन केलेंच आहे. मुलामध्यें आळस, हट्ट, चिडखोरपणा, तामसीपणा, कुचरपणा, असत्य-भाषण, मत्सर वगैरे जे अनेक दोष दिसून येतात त्यांचें कारण बहुधा मुलांच्या शारीरिक प्रकृतींतील दोष किंवा घरची अगर शाळेंतील चुकीची शिस्त हें असतें. मुलांच्या आचरणांत जर एखादा दोष दिसून आला, तर पालकांनीं व शिक्षकांनीं हा दोष कोणत्या कारणामुळें उत्पन्न झाला हें काळजीपूर्वक शोधून काढलें पाहिजे. मुलाला नुसतें रागें भरून किंवा शिक्षा करून त्याचे दोष दूर होत नाहींत.

कित्येक आईबापांना मुलांनीं आपली आज्ञा निमुटपणें पाळलीं कीं मोठी धन्यता वाटते व आपल्या शिस्तीचा त्यांना फार अभिमान वाटतो. शिस्तीचा

हेतु मुलांना गुलाम बनाविणें हा नाहीं. वडील माणसांनीं आपल्या लहरीला वाटेल तसे हुकुम देणें व मुलांनीं तें निमुटपणें पाळणें ही खरी शिस्तही नव्हे व खरी आज्ञाधारकताही नव्हे. मुलांना व्यवस्थितपणा, नियमितपणा, स्वावलंबन वगैरे चांगल्या संवयी लावण्याचें शिस्त हें उत्कृष्ट साधन आहे. मुलाला शिस्त लावतांना मुलाच्या कल्याणाचाच विचार वडील माणसांच्या मनांत असला पाहिजे. वडील माणसांची आज्ञा मुलांनीं पाळावी ही गोष्ट शिस्तीला अगदीं आवश्यक आहे, पण या बाबतींत वडील माणसांनींही काळजी घेतली पाहिजे. बापानें आपल्या मित्रमंडळीबरोबर पत्ते खेळत बसावें व मुलगा अभ्यासांत गुंतलेला असतां त्याला अभ्यास बंद करण्यास सांगून, विड्या आणण्यास बाजारांत धाडावें ही शिस्त नव्हे. यांत खरोखर बापानेंच शिस्तीचा भंग केला आहे. शिक्षकानें आपल्या शिक्षक–बंधूंबरोबर वर्गाच्या बाहेर चकाट्या माराव्या व मुलांनीं निमूटपणें एक तास–भर खर्डे लिहावे ही शिस्त नव्हे. मुलांनाही कांहीं हक्क आहेत, त्यांनाही स्वाभिमान आहे, त्यांना मनोविकार आहेत ही गोष्ट वडील माणसें पुष्कळ वेळां लक्षांतच ठेवीत नाहींत. यामुळें मुलांना खरी शिस्तच लागत नाहीं.

शिक्षा व बक्षिसें हीं शिस्त राखण्याचीं दोन मोठीं साधनें आहेत असें आपण समजतों. समाधान व्यक्त करणें, शाबासकी देणें, खाऊ, खेळणें वगैरे देणें, खेळ, जत्रा वगैरे दाखविणें वगैरे गोष्टींचा आईबाप नेहमीं उपयोग करीत असतात. हे सर्व बक्षिसांचे निरनिराळे प्रकार होत.

मूल अगदीं लहान असतें तेव्हां त्याला विचारशक्ति अगदीं कमी असते. अमुक कृति चांगली व अमुक कृति वाईट हें त्याला बिलकुल समजत नाहीं. आईबापांवर मुलाचें प्रेम असतें म्हणून ज्या कृतीनें त्यांना संतोष होतो ती कृति चांगली व ज्या कृतीनें त्यांना राग येतो ती कृति वाईट असें मुलाला वाटतें. बाळाला झोका दिला, वेळेवर पानावर बसून नीट जेवलें, तर आईला संतोष होतो. खेळ झाल्यावर खेळण्याच्या वस्तु पेटींत ठेविल्या, तर बाबांना संतोष होतो. म्हणून या कृति चांगल्या अशी मुलाची खात्री होते. जेवतांना रडलें, शेजारच्या मुलाला चावलें, टोपी भलतीकडेच टाकली, तर आई किंवा बाबा रागावतात म्हणून या गोष्टी वाईट असें मुलाला वाटतें. अशा प्रकारें

आईबापांच्या शाबासकीनें मुलाला चांगली कृति कोणती हें कळतें व ती करण्यास उत्तेजन मिळतें. दुसरें असें कीं, लहान मुलाची आपला मोठेपणा दाखविण्याची सहजप्रवृत्ति हळूहळू कार्य करूं लागते. तिच्या प्रेरणेनें मूल नवीन कृति करण्यास शिकतें. अक्षर शिकणें, अंक शिकणें, दोरीवरून उड्या मारण्यास शिकणें वगैरे गोष्टींबद्दल मुलांना शाबासकी देऊन त्यांना उत्तेजन देणें अगदीं आवश्यक असतें. शाबासकी किंवा स्तुति ही अगदीं प्रमाणांत असावी. जसजसें मूल मोठें होत जाईल तसतसा तिचा उपयोग कमी करावा. मुलाला बरें वाईट समजूं लागलें, त्याचा स्वाभिमान वाढत चालला म्हणजे खरोखरीच मुलानें जर कांहीं विशेष कृति केली, तर तिजबद्दलच वडील माणसांनीं आपलें समाधान व्यक्त करून शाबासकी द्यावी. आयुष्यांतील दररोजचीं जीं कृत्यें प्रत्येक मुलानें केलींच पाहिजेत त्यांजबद्दल उठल्या सुटल्या शाबासकी देणें व स्तुति करणें चांगलें नव्हे. आईबापांबद्दल मुलाच्या मनांत प्रेम व आदर असला म्हणजे त्यांच्या संतोषाच्या व शाबासकीच्या एका शब्दानें जो आनंद व जें समाधान त्याला वाटतें तें दुसऱ्या कोणत्याही मोठ्या किंमतीच्या बक्षिसानेंही वाटणार नाहीं.

शाळेंतील बक्षिसांच्या बाबतींत असेंच म्हणतां येईल. शिक्षकाबद्दल मुलाच्या मनांत प्रेम व आदर असला म्हणजे मुलाला त्याच्या शाबासकीनें किंवा समाधानाच्या व संतोषाच्या शब्दानें आनंद होतो व श्रम करण्यास त्यास उत्तेजन येतें. मुलें जोंपर्यंत लहान आहेत तोंपर्यंत त्यांना शिक्षकाच्या या उत्तेजनाची जरूर लागते. मुलें मोठीं झाल्यावर जर त्यांनीं एखादा विशेष प्रयत्न केला, तरच त्यांना शाबासकी देणें योग्य होईल.

शाळेंत किंवा घरीं शिस्त राखण्याबद्दल बक्षिसें देणें हें चांगलें नाहीं. या योगानें मुलांत आप्पलपोटेपणा वाढतो व कांहींतरी स्वार्थ साधल्याशिवाय आपलें कर्तव्य करावयाचेंच नाहीं किंवा दुसऱ्याच्या उपयोगी पडावयाचेंच नाहीं अशी त्याला वाईट संवय लागते. ‘ गणू, बाळाला झोका दे व त्याला खेळव म्हणजे मी तुला लाडू देईन ’, ‘रामू, आज शाळेंत जा, संध्याकाळीं तुला मी खाऊला पैसा देईन ’ अशा प्रकारची बक्षिसाची लालुच मुलाला दाखविणें हें शिस्तीच्या दृष्टीनें अयोग्य आहे. मुलावर अशा वागण्याचा फार अनिष्ट

परिणाम होतो. शाळेंतही जो घंटेच्या आंत येईल त्याला १० मार्क देणें हेंही चांगलें नव्हे. मुलानें विशेष परिश्रम करून हुशारी दाखविली, तर त्याला शाळेनें बक्षिस देण्यास हरकत नाहीं. बक्षिसें नेहमीं कमी किमतीचीं असावीं.

अमुक एक कृति वाईट आहे, ती करणें योग्य नाहीं हें मुलाचे मनावर बिंबविणें व त्याची सुधारणा करणें हा शिक्षेचा हेतु आहे. रागाचे शब्द, नापसंतीची नजर, एखादी थप्पड, खाऊ वगैरे न देणें, मौज पहाण्यास न नेणें हे शिक्षेचेच प्रकार होत. यांच उपयोग कुटुंबांत वडील माणसें नेहमीं करीत असतात. बक्षिसें व शिक्षा यांच्यासंबंधीं मागील भागांतून ठिकठिकाणीं विचार केला आहे. मुलाच्या कृतीचा विचार करतांना त्याच्या हेतूचा प्रथम विचार केला पाहिजे. मुलांची विचारशक्ति अगदीं कमी असते, त्याचा व वडील माणसाचा दृष्टिकोन एकच नसतो, यामुळें जी कृति वडील माणसांना अगदीं अयोग्य वाटते ती मुलाला तशी वाटत नाहीं. मुलाच्या कृतीनें आपणास राग आला आहे व त्रास झाला आहे व राग काढण्याकरितां मुलाला आपण शिक्षा करीत आहों कीं काय याचा विचार वडील माणसांनीं केला पाहिजे. पुष्कळ वडील माणसें मुलांनीं त्यांच्या म्हणण्याविरुद्ध कांहीं कृति केली कीं रागावतात व मुलांना मारीत सुटतात. अशा प्रकारच्या शिक्षेचा मुलावर फार अनिष्ट परिणाम होतो. अशाच प्रकारें एका बापानें आपल्या आठ वर्षांच्या मुलाला चोप दिल्यानंतर त्याला विचारलें, ‘ मीं तुला कां मारलें हें तुला कळलें काय ? ’ ‘ मुलानें उत्तर दिलें, ‘ हो; तुम्ही मोठे व बळकट आहां. मी लहान व अशक्त आहें म्हणून. ’ आपल्या आईबापांबद्दल जर मुलाच्या मनांत प्रेम व आदर नसेल, तर त्यांनीं केलेल्या शिक्षेचा मुलावर कांहींच परिणाम होणार नाहीं. हाच नियम शिक्षकालाही लागू आहे. मुलाला अन्यायानें शिक्षा केली, तर शिक्षा करणाऱ्या माणसाबद्दल त्याचे मनांत द्वेष उत्पन्न होतो. वडील माणसाबद्दल किंवा शिक्षकाबद्दल जर द्वेष उत्पन्न झाल, तर त्या वातावरणांत मुलाच्या मनाची वाढ होणें शक्य नाहीं व त्याला शिस्तही लागणें शक्य नाहीं.

शिक्षकाला किंवा आईबापांला मुलाला शिक्षा कमी करण्याचा जितका कमी प्रसंग येईल तितकें चांगलें.

कांहीं लोकांचें म्हणणें असें असतें कीं, मुलानें एखादी कृति केली व तिचा वाईट परिणाम त्याला भोगावा लागला कीं आपोआप त्याला शिस्त लागते.

मग त्याला शिक्षा करण्याचा प्रसंगच येत नाहीं. विस्तवाला बोट लावलें कीं तें भाजतें; मग मूल विस्तवाला कधींही बोट लावीत नाहीं. पण अशाप्रकारें मुलाला वागूं देण्यांत फार धोका असतो. मुलाला पडसें, खोकला आलें व त्याला जर बाहेर पाण्यांत खेळूं दिलें, तर सर्दीनें त्याला कफ होईल व ताप येईल. या योगानें पडसें आलें असतां बाहेर जाऊं नये हें त्याला खात्रीनें कळेल व तो पुन्हा ती कृति करणार नाहीं, ही गोष्ट जरी खरी आहे, तरी त्या दुखण्यांत तें मूल दगावण्याचा किंवा त्याची शरीरप्रकृति कायमची बिघडण्याचाही संभव आहे. शिक्षेच्या योगानें पुढें होणाऱ्या दुष्परिणामापासून मुलाचें रक्षण करावयाचें असतें. जेथें शक्य आहे तेथें मुलाला आपल्या कृतीचा परिणाम पाहून शिस्तीनें वागण्यास शिकण्याची संधि अवश्य द्यावी. मूल जेवणाच्या वेळीं आळसामुळें किंवा हट्टामुळें किंवा निष्काळजीपणानें आलें नाहीं, तर त्याला एकट्याला वाढूं नये. पुढच्या वेळेपर्यंत खुशाल त्याला तसेंच राहूं द्यावें. शाळेंत मूल जर कारणाशिवाय उशीरा आलें, तर जो धडा चालला आहे तो संपेपर्यंत त्याला वर्गाबाहेर उभें करावें. मुलानें खेळतांना जर निष्कारण दुसऱ्याची खोडी केली, तर त्याला खेळांतून बाहेर काढावें. अशाप्रकारें मुलाला आपल्या कृतीचा काय परिणाम होतो हें कळलें कीं तें शिस्तीचे नियम आपोआपच पाळूं लागतें. शिस्तीसंबंधानें आणि बक्षिसें व शिक्षा यासंबंधानें जितकें लिहावें तितकें थोडेंच आहे. वाचकांनीं जास्त माहितीकरितां माझें 'शिक्षक आणि शिक्षण' ह्या पुस्तकांतील हे भाग वाचावे अशी त्यांना विनंती करून शिस्तीसंबंधी महत्त्वाच्या गोष्टी थोडक्यांत सांगून हा लांबलेला भाग आटोपता घेऊं.

१. घरीं प्रेमळ व दक्ष आईबापांच्या सहवासांत मुलांना उत्तम शिस्त लागते. शाळेंतही शिक्षक प्रेमळ व दक्ष असल्याशिवाय मुलांना शिस्त लागणें शक्य नाहीं.

२. शिस्तीला मुलाच्या भोंवताली प्रेमाचें व स्वतंत्रतेचें वातावरण असावें. वडील माणसांच्या धाकानें मुलानें शिस्तीचे नियम पाळणें ही खरी शिस्त नव्हे. मुलानें समजून उमजून व आनंदानें शिस्तीचे नियम पाळले पाहिजेत.

३. शिस्तीच्या विरुद्ध वागणाऱ्या बहुतेक मुलांत मानसिक विकृति असते. मुलांची ही विकृति दूर झाल्याशिवाय तीं शिस्तीनें वागणार नाहींत.

४. शिस्त अगदीं कडक नसावी किंवा ती अगदीं शिथिलही असूं नये.

५. मुलांना शिस्त लावण्याचे कामीं बक्षिसें व शिक्षा यांचा उपयोग शक्य तितका कमी करावा. आदर्शभूत कुटुंबांतून व शाळांतून या साधनांचा उपयोग करण्याची जरूरच राहात नाहीं.

६. शिस्त राखतांना वडील माणसांनीं मुलांचा दृष्टिकोन नेहमीं लक्षांत घेतला पाहिजे.

७. शिक्षा द्यावयाची ती मुलाच्या कल्याणाकरितां द्यावयाची हें तत्त्व वडील माणसांनीं लक्षांत ठेवावें.

८. मुलांना शिस्त लावतांना त्यांच्या स्वाभिमानाला धक्का लागणार नाहीं याजबद्दल वडील माणसांनीं काळजी घ्यावी.

९. शिस्तीचें नुसतें बंड माजविण्यांत अर्थ नाहीं.

# भाग २१ वा

## सूचना

आतांपर्यंत, बालमनाचा कसा विकास होतो, या विकासाला अनुकूल गोष्टी कोणत्या, प्रतिकूल गोष्टी कोणत्या याचा आपण विचार केला. मुलाच्या सहजप्रवृत्तींना वळण कसें लावावें, मुलाच्या स्वाभाविकवृत्तींचा शिक्षणाचे कामीं कसा उपयोग करून घ्यावा याचेंही विवेचन मागील दोन भागांत केलें आहे. स्वाभाविक वृत्तींपैकीं महत्त्वाच्या दोन स्वाभाविकवृत्ति खेळ व अनुकरण यांचें जास्त विस्तारपूर्वक विवेचनही केलें आहे. स्वाभाविकवृत्तींपैकीं राहिलेली तिसरी वृत्ति जी सूचनाग्रहण तिचें मुलाच्या शिक्षणाचे कामीं फार महत्त्व आहे. तेव्हां सूचनाग्रहणासंबंधानें या भागांत विवेचन करावयाचें योजिलें आहे.

दुसऱ्याचें म्हणणें किंवा विचार खरा आहे किंवा खोटा आहे याचा स्वतां विचार न करितां तो खरा आहे असें मानून ग्रहण करणें याला सूचनाग्रहण म्हणतात व ग्रहण केलेल्या विचाराला किंवा विधानाला सूचना असें म्हणतात. सूचनाग्रहणामध्यें दोन व्यक्ति लागतात. एक सूचना देणारी व दुसरी सूचना घेणारी. दोन व्यक्ति असल्याशिवाय सूचनाग्रहणाची क्रियाच होणार नाहीं.

जीं माणसें ज्ञानानें आपणांपेक्षां श्रेष्ठ असतात त्यांचें म्हणणें सत्य मानण्यास आपण नेहमीं तयार असतों. याचमुळें जेव्हां एखादा प्रख्यात शास्त्रज्ञ आपल्या शास्त्रासंबंधीं नवीन सिद्धांत सांगतो, तेव्हां त्याचें म्हणणें सत्य मानून आपण ताबडतोब ग्रहण करितों. त्याचप्रमाणें ज्या माणसाबद्दल आपल्या मनांत प्रेम, पूज्यभाव किंवा आदर असतो त्याचेंही म्हणणें आपण ताबडतोब खरें मानतों. मुलांना आईबापांबद्दल फार आदर व प्रेम असतें म्हणून त्यांचें म्हणणें तीं अक्षरशः खरें मानतात. मनुष्यांत जितकें ज्ञान कमी तितका दुसऱ्याचें म्हणणें सत्य म्हणून ग्रहण करण्याकडे त्याचा कल जास्त. यामुळें अशिक्षित व अज्ञानी माणसांचा मंत्र, तंत्र, जादू, गंडेदोरे यांजवर विश्वास असतो.

मुलांचें ज्ञान फारच कमी असतें. त्यांची विचारशक्ति दुर्बळ असते, आपल्या आईबापांबद्दल त्यांच्या मनांत फार प्रेम व आदर असतो. यामुळें ते जें कांहीं सांगतात अगर बोलतात तें सर्व सत्य व चांगलें आहे असें मुलें मानतात. मुलांत ही सूचनाग्रहणाची वृत्ति फार जोरदार असते. यामुळें वडिलांचें विधान तीं ताबडतोब ग्रहण करितात. परलोकवासी नारायणराव टिळक यांनीं आपल्या 'लेंकराची जिज्ञासा' या कवितेंत मुलाच्या सूचनाग्रहणाचें फार मार्मिक वर्णन केलें आहे. एखादी नवी गोष्ट दृष्टीस पडते व मूल आपल्या वडिलांस हें काय आहे म्हणून विचारतें. वडिलानें जर सांगितलें कीं, बाळ हा बाऊ आहे, तर मुलाला बाबाचें तें म्हणणें अगदीं खरें वाटतें व त्या पदार्थाविषयीं त्याचे मनांत भीति उत्पन्न होते. बापानें जर म्हटलें कीं बाळ तो देव आहे, तरी बापाचें हें म्हणणें मुलाला खरें वाटतें व मूल श्रद्धेनें त्या पदार्थाला नमस्कार करतें. मेघगर्जना ऐकून मूल वडिलाला विचारतें, 'बाबा, हें काय आहे'? बाप उत्तर देतो, 'मुला, ही तुझी सासू आभाळांत दळण दळीत आहे.' बापाचें हेंही बोलणें मुलाला खरें वाटतें. अशा प्रकारें वडिलाचीं विधानें मूल खरीं मानून ग्रहण करीत असतें. हळूहळू मुलाच्या ज्ञानांत भर पडत जाते व त्याची विचारशक्ति वाढत जाते, मग वडिलांनीं सांगितलेल्या गोष्टीचा तें विचार करूं लागतें व सांगितलेली गोष्ट त्याला पटली नाहीं, तर तिजबद्दल वडील माणसाजवळ जास्त चौकशी करतें. वडील माणसें जर कांहींतरी त्याला सांगत असतील, तर त्यांचें म्हणणें असत्य आहे हें मुलाला कळूं लागतें

व वडिलांवरील त्याचा सर्व विश्वास नाहींसा होतो व मग तें त्यांचें विधान ग्रहण करण्यास तयार होत नाहीं.

सूचना हें शिक्षणाचें एक मोठें साधन आहे. सुशिक्षित व प्रेमळ आईबाप आणि शिक्षक या साधनाचा चांगला उपयोग करून घेतात. सूचनाही शब्दांनींच देतात असें नाहीं. पुष्कळ वेळां ती कृतीनें दिली जाते. कृतीनें दिलेली सूचना ही शाब्दिक सूचनेपेक्षां अधिक परिणामकारक असते. आईबापांना जर स्वच्छतेची व सुव्यवस्थितपणाची आवड असेल व ते त्याप्रमाणें वागत असतील, तर त्यांच्या कृतींनीं स्वच्छपणानें व सुव्यवस्थितपणें वागण्याची सूचना मुलाला मिळते व तिचा परिणाम मुलाच्या आवडीवर व वागणुकीवर दिसून येतो. बाप जर निष्काळजी अव्यवस्थित असेल, तर त्याच्या कृतींमुळें मुलांना अव्यवस्थितपणाची व निष्काळजीपणाची सूचना मिळते व तिचा परिणाम मुलाच्या स्वभावावर व कृतींवर दिसून येतो.

आईबाप व शिक्षक यांचें बोलणें व वागणें यांजकडे मुलाचें फार लक्ष असतें व त्यांच्या शब्दांनीं व कृतींनीं मुलाला अनेक इष्ट अगर अनिष्ट सूचना मिळत असतात ही गोष्ट आईबापांनीं व शिक्षकांनीं चांगली लक्षांत ठेविली पाहिजे.

सूचनेच्या योगानें मुलाला जसें चांगलें शिक्षण मिळतें, तसेंच तिच्या योगानें वाईट शिक्षणही मिळण्याचा फार संभव असतो. बाप घरांत काम करीत असतो. इतक्यांत त्याला भेटण्याकरितां कोणीतरी येतो. बाप मुलाला सांगतो, 'जा, त्या बाहेरच्या गृहस्थाला सांग कीं, बाबा गांवाला गेले आहेत.' मुलगा त्याप्रमाणें करितो. अशा प्रकारें खोटें सांगण्याची व दुसऱ्याला फसविण्याची जी सूचना मुलाला मिळाली तिचा परिणाम मुलाच्या मनावर होईल यांत शंकाच नाहीं. वडील माणसें आपल्या कृतींनीं अशा प्रकारें मुलांना ज्या अनिष्ट सूचना देतात त्यांचा मुलांच्या शिक्षणावर अनिष्ट परिणाम होतो. पुष्कळ आईबाप 'सत्य बोलावें, प्रामाणिकपणानें वागावें इत्यादि उपदेश आपल्या मुलांना करीत असतात. अशा प्रकारें मुलांना उत्कृष्ट सूचना त्यांच्यापासून मिळत असतात, पण ते स्वतां असत्य बोलणारे व अप्रामाणिकपणें

वागणारे असल्यामुळें त्यांच्या कृतींनीं मुलांना जी सूचना मिळते ती त्यांच्या उपदेशापेक्षां जास्त परिणामकारक असते.

आईबाप नेहमीं मुलाच्या प्रकृतीसंबंधानें किंवा स्वभावासंबंधानें एकमेकांशीं किंवा दुसऱ्यांशीं बोलत असतात. कधीं कधीं मुलाजवळ देखील ते त्याच्या स्वभावासंबंधानें व प्रकृतीसंबंधानें ते बोलतात. आईबापांच्या या शब्दांनीं मुलाला सूचना मिळते व तिचा परिणाम मुलाच्या मनावर व प्रकृतीवर होतो. 'आमचा बाळ फार नाजूक आहे, तो फार अशक्त आहे, त्याला थंडी वारा सोसत नाहीं,' अशीं आईबापांचीं विधानें नेहमींच ऐकल्यामुळें मुलालाही तसेंच वाटूं लागतें व त्याचा त्याच्या शरीरावर व मनावर परिणाम होतो.

मुलाला आपल्या प्रकृतीसंबंधानें अनिष्ट सूचना मिळेल असें कधींही मुलासमक्ष बोलूं नये. वेळेवर औषधोपचार केल्यानें मुलाचा आजार लवकरच बरा होतो. मुलाला वैद्याला किंवा डॉक्टरला दाखवून उपचार करण्याचे कामीं आईबापांनीं बिलकुल हयगय करूं नये. पण मुलासमक्ष त्याच्या आजाराची चिकित्सा करणें हें फार वाईट आहे. एक आठ वर्षांचा मुलगा तापानें आजारी होता. त्याच्या नातेवाइकांपैकीं एक बाई त्याला पहावयास आली. ती त्या मुलाच्या आईला म्हणाली, 'बाई, या मुलाला नीट औषधोपचार करा हो. हा ताप फार विषारी आहे. आमच्या शेजारीं गोपाळराव राहतात. त्यांच्या मुलाला असाच ताप आला आणि आठव्या दिवशीं तो मुलगा आटोपला.' बाईच्या या मूर्खपणाच्या भाषणानें आजारी मुलाचे मनास धक्का बसला व तो 'आतां मी मरतों, आतां मी वाचत नाहीं' अशी बडबड करूं लागला.

मुलें खेळतांना पडतात व त्यांना बरेंच लागतें. अशा वेळीं कांहीं आया फार घाबरून जातात व मुलालाही घाबरून सोडतात. मुलाला खरचटलें असेल किंवा जखम झाली असेल, तर ती जागा पाण्यानें व साबणानें स्वच्छ धुऊन टाकावी व त्या जागेवर आयोडिनसारखें जंतुनाशक औषध लावून वर कापूस ठेवून स्वच्छ फडक्यानें ती जागा बांधून टाकावी. जखम मोठी असेल किंवा हाड ढळलें असेल अगर मोडलें असेल, तर डॉक्टरला बोलावून आणणें आवश्यक असतें. पण हें सगळें अगदीं शांतपणें झालें पाहिजे. आपण लव-

करच बरें होऊं अशी मुलाची समज होणें अगदीं आवश्यक असतें. उल्हसित मन हें रोग बरें होण्याचें मोठें साधन आहे.

मुलाच्या हातून एखादा अपराध झाला असतां तो अपराध कां झाला याचें कारण शोधून काढलें पाहिजे. तें कारण नाहींसें केलें कीं मुलाच्या वर्तनांत सुधारणा होते. मुलाच्या अपराधाकडे पाहण्याचा वडील माणसाचा दृष्टिकोण बदलला पाहिजे. सात वर्षांच्या एका मुलानें आईच्या नकळत फडताळांतून एक पैसा घेतला व शाळेंत सुटींत त्याचा चिवडा विकत घेऊन खाल्ला. ही चोरी झाली, पण मोठ्या माणसाची चोरी व ही चोरी यांत महदंतर आहे. मुलाची ही कृति त्याच्या प्रतिकूल परिस्थितीमुळें किंवा मानसिक दोषामुळें घडली. मुलाच्या नैतिक दोषाबद्दलचें विवेचन मागील भागांत केलेंच आहे. या ठिकाणीं सांगावयाचें हें कीं, मुलानें अशी एकादी कृति केली, तर त्या मुलाला 'तूं वाईट आहेस, तूं चोर होशील, तूं चोऱ्या करशील' असें बोलणें बरें नव्हे. या अनिष्ट सूचनांनीं मुलाचें नैतिक वर्तन बिघडण्याचा जास्त संभव असतो. या सूचनांचे योगानें आपण चोर होणार अशीच मुलाची समजूत दृढ होत जाते आणि मग चोरीचा मोह आवरण्याची त्याची आत्मसंयमनाची शक्ति कमी होत जाते.

'मुला, तूं मठ्ठ आहेस. तुला बुद्धीच नाहीं. तुला कांहीं यावयाचें नाहीं,' असें सांगणारा शिक्षक मुलाचें फार नुकसान करतो. शिक्षकाच्या या अनिष्ट सूचनांचा मुलावर फार वाईट परिणाम होण्याचा फार संभव असतो. आपणाला बुद्धि नाहीं असें समजून मूल प्रयत्न करिनासें होतें व त्याची प्रगति होत नाहीं. मुलाला प्रयत्न करण्यास उत्तेजन देणें हें शिक्षकाचें काम आहे. सर्वच मुलांची बुद्धि सारखीच तीव्र नसते. मंदबुद्धीच्या मुलानें केलेल्या प्रयत्नाचें कौतुक करून, 'तूं प्रयत्न केला, तर तुला हें खात्रीनें येईल,' अशी इष्ट सूचना देण्यानें मुलाच्या प्रगतीस मदत होते.

मुलाच्या बुद्धीचा जसजसा जास्त विकास होत जातो व त्याचा स्वाभिमान जसजसा वाढत जातो, तसतशी त्याची सूचनाग्रहणाची प्रवृत्ति कमी कमी होत जाते. मुलाच्या शिक्षणाच्या दृष्टीनें हीच गोष्ट इष्ट आहे. दुसऱ्या माणसाच्या विधानाचा मनुष्यानें विचार करावा व स्वतांच्या बुद्धीला तें विधान

पटलें, तर तें खरें मानावें. विचार न करतां भोळसटपणानें दुसऱ्याचें म्हणणें ग्रहण करणें हें फार अनिष्ट असतें. या योगानें मनुष्याची बौद्धिक किंवा नैतिक प्रगति कधींच होत नाहीं, याजकरितां शिक्षकानें व आईबापांनीं मुलांची विचार-शक्ति वाढविण्याचा प्रयत्न करावा. आपण जीं विधानें करितों त्यांचीं कारणें मुलांना सांगावीं व त्यांना प्रश्न विचारण्यास उत्तेजन द्यावें.

आईबाप व शिक्षक यांनीं आपल्या कृतींनीं व शब्दांनीं मुलाला शिक्षण-दृष्ट्या इष्ट अशा सूचना देण्याचें कार्य केलें पाहिजे. मुलाच्यापुढें चांगलें ध्येय ठेवणें हेंही एक प्रकारची सूचनाच होय. सूचना देण्याचें काम फार चातुर्यानें करावें लागतें. एका यूरोपियन विद्वान स्त्रीनें शिस्त राखण्याचे कामीं सूच-नेचा किती हितकारक परिमाण होतो याचें फार सुंदर वर्णन केलें आहे. या बाईची लहान मुलांची एक शाळा होती. शाळेंत जर मुलांच्या हातून एखादा दोष घडला, तर सकाळीं प्रार्थनेच्या वेळीं सदरहू बाई आपल्या मुलांना अमुक एक प्रकारें वागण्याची सूचना देई व सर्व मुलें आम्ही आतां याप्रमाणें वागूं असें म्हणत. उदाहरणार्थ, जर एखाद्या महिन्यांत मुलें नियमितपणें शाळेंत आलीं नाहींत, तर बाई नियमितपणें शाळेंत येण्याची मुलांना सूचना देई व सर्व मुलें ‘ आम्ही वेळेवर शाळेंत येत जाऊं ’ अशी प्रतिज्ञा करीत. ‘आम्ही वेळेवर शाळेंत येऊं ’ हें वाक्य चांगल्या अक्षरांनीं लिहून प्रमुख जागीं तें लावून ठेवीत. अशा रीतीनें मुलांना मिळालेल्या इष्ट सूचनेचा उपयोग फार चांगला होईल.

दुसऱ्याची निंदा करणें, गांवांतील लोकांच्या दुष्कृत्यांची व व्याधींची चर्चा करणें, वाईट पुस्तकें घरांत ठेवणें या सर्व गोष्टींनीं मुलांना अनिष्ट सूचना मिळते, प्रेमळ, सदाचारी, सुव्यवस्थित आईबापांच्या व शिक्षकाच्या संगतींत मुलांना हितकारक सूचना मिळत असतात. अशा या अनुकूल वातावरणांत मुलाची शारीरिक, बौद्धिक व नैतिक प्रगति फार चांगली होते. पण अशा या हितकारक वातावरणाचा लाभ मिळण्याचें भाग्य फारच थोड्या मुलांना मिळतें.

कांहीं मुलांवर वडील माणसांच्या सूचनांचा उलटाच परिणाम होतो. हीं मुलें फार हट्टी असतात. ‘ बाळ, सकाळीं लवकर ऊठ ’ असें बाळाला सांग-तांच बाळ अंथरुणांत तसाच निजून राहतो. ‘ यमू, खेळायाला जाऊं नको, ’

असें आईनें सांगतांच यमू ताबडतोब खेळावयाला निघून जाते. मुलांत हा जो हट्टीपणा येतो त्याचें कारण त्याचे घरीं होणारे फाजील लाड हेंच बहुधा असतें. कित्येक वेळां मुलाच्या मनांत वडील माणसांबद्दल प्रेम व आदर नसतो, पण उलट त्यांचेबद्दल त्यांच्या मनांत द्वेष असतो, यामुळें मूल त्यांच्या आज्ञा मोडण्यास नेहमीं तयार होतें. कित्येक वेळां हा हट्टीपणा मानसिक किंवा शारीरिक दोषामुळें मुलांत उद्भवतो. ‘ मुलाचा हट्टीपणा ’ या दोषाचें विवेचन ‘ मुलाचें मानसिक आरोग्य ’ या भागांत केलेंच आहे.

आतां पुढील भागांत मूल मातृभाषा बोलण्यास कसें शिकतें, या भाषेंत त्याची कशी प्रगति होते, मुलाला भाषा शिकविण्याचे बाबतींत वडील माणसांनीं कोणती काळजी घ्यावी याचें विवेचन करूं.

## भाग २२ वा

## मुलांची भाषा

मनुष्यप्राणी व इतर प्राणी यांजमधील एक मोठा भेद म्हटला म्हणजे मनुष्यप्राण्याला आपल्या कल्पना, भावना व विचार भाषेच्या द्वारें दुसऱ्यास समजावून सांगतां येतात, तसें इतर प्राण्यांना करितां येत नाहीं, हा होय. भाषेच्या योगानें मनुष्याच्या मागील पिढींचा अनुभव व ज्ञान हीं पुढील पिढीला देतां येतात व या योगानें मनुष्यप्राण्याची प्रगति अव्याहत चालते. भाषा हें मनुष्याच्या प्रगतीचें एक मोठें साधन आहे. परमेश्वरानें मनुष्याच्या गळ्यामध्यें अत्यंत आश्चर्यकारक स्वरोत्पादक पेटी ठेविली आहे; व बोलण्याची प्रवृत्तिही मनुष्यामध्यें जन्मतःच ठेविली आहे. यामुळेंच मनुष्यप्राण्यामध्यें भाषेचा उदय व वाढ झाली आहे.

तहान किंवा भूक लागली असतां अथवा शरीरास थंडी, वारा, ऊन इत्यादिकांचा त्रास झाला असतां रडावें व किंकाळावें ही प्रवृत्ति अगदीं लहान मुलांत देखील आपण पहातों. मुलें चार पांच महिन्यांचीं झालीं म्हणजे स्वतांशींच खेळतांना किंवा शेजारीं आई, बाप वगैरे घरांतील माणसें उभीं असतांना त्यांच्याकडे पाहून तीं लडिवाळपणें मृदु आवाज काढितात. आईनें

घेतलें नाहीं, तर रागावून किंवा निराशेनें मूल निराळ्याच आवाजांत रडतें किंवा ओरडतें. अशा प्रकारें तहान, भूक, शारीरिक त्रास, रोग, निराशा इत्यादि भावना मूल भिन्न भिन्न आवाजानें दाखवीत असतें. या रडण्यांत किंवा ओरडण्यांत अ, आ, इ, ई इत्यादि स्वर साहाजिकपणेंच येत असतात.

मूल सहासात महिन्यांचें झालें कीं, बाबा, दादा, काका वगैरे शब्द सहजगत्या खेळतांना बोलूं लागतें. साहजिक प्रवृत्तीनें मुलांचा हा अक्षरोच्चार चालला असतांना तीं भाषेंतील सर्व मूळाक्षरें, उच्चारीत असतात. ट, ठ, ण सारखे कठीण वर्ण, ज्यांचा उच्चार करण्यास पुढें मुलांना कठीण जातें, ते देखील मुलें सहज लीलेनें यावेळीं उच्चारीत असतात. यावेळीं मुलें ज्या कित्येक चमत्कारिक अक्षरांचा उच्चार करितात तीं लिहितां देखील येणार नाहींत. ज्याप्रमाणें एखादा वादनपटु, आपल्या वादनास प्रारंभ करण्याच्या पूर्वी आपल्या वाद्याच्या पट्ट्यांवर किंवा तारांवर बोटें फिरवून वाद्याचे सूर बरोबर आहेत कीं नाहींत हें पाहाण्याकरितां तिन्ही सप्तकांतील सा, री, ग, म वाजवून पाहातो, त्याप्रमाणें हे बालवादनकार जणुं काय भाषा बोलण्याचें काम सुरू करण्यापूर्वी आपल्या कंठांतील वाद्याचे सर्व सूर बरोबर आहेत कीं नाहींत हें पाहण्याकरितां अनेक प्रकारचे चमत्कारिक उच्चार करीत आहेत असें वाटतें.

सातव्या किंवा आठव्या महिन्यापासून शब्द बोलण्याला मुलें प्रारंभ करितात. कोणताहि शब्द समजून बोलतांना मुलांना तीन क्रिया कराव्या लागतात. प्रथमतः एखाद्या वस्तूचें, क्रियेचें किंवा स्थितीचें त्यांना निरीक्षण करावें लागतें. मग त्या वस्तूला, क्रियेला अगर स्थितीला वडील माणसें कोणतें नांव देतात हें लक्षांत ठेवावें लागतें व तें स्वतः आपण उच्चारण्याचा प्रयत्न करावा लागतो. मुलांना या तिन्ही गोष्टी साध्य होण्यास बराच वेळ लागतो व पुष्कळ प्रयत्न करावा लागतो.

मुलें अतिशय अनुकरणप्रिय असतात. अनुकरणाची ही वृत्ति देखील साहजिक आहे. या अनुकरणप्रियतेमुळेंच मुलें वडील माणसाचे शब्द ऐकून बोलण्यास सुरुवात करितात. वडील माणसांच्या शब्दांचें अनुकरण करण्यांत मुलांना फार आनंद वाटतो. ज्या स्नायूंचा बोलण्याच्या कामीं उपयोग होतो त्यांना व्यवसाय देण्याच्या कामीं या शब्दोच्चाराचा उपयोग होतो व भाषा बोलण्याचें काम सुगम होतें. मुलें प्रारंभीं अशा प्रकारें जे शब्द बोलतात

त्यांचा अर्थ त्यांना माहीत नसल्यामुळें व केवळ अनुकरणप्रियतेमुळें तीं शब्दोच्चार करीत असल्यामुळें भाषा बोलण्याच्या त्यांच्या कार्याला सुरुवात झाली असें म्हणतां येणार नाहीं. पुढील महत्त्वाच्या कार्याची ही पूर्वतयारी असते. अशाप्रकारें अनुकरणानें शब्दोच्चार करणें हा एक प्रकारचा मुलांचा खेळच आहे. त्यांत त्यांना फार आनंद वाटतो.

पहिल्या वर्षाच्या शेवटीं मुलें समजून शब्द बोलण्याचा प्रयत्न करूं लागतात. आरंभीं मुलांच्या बोलण्यांत जे शब्द येतात ते बहुतेक नामें असतात. बाबा, आई, मामा, दादा इत्यादि कुटुंबांतील प्रेमाचीं व निकट परिचयाचीं माणसें; कुत्रा, मांजर, गाय, कावळा, चिमणी वगैरे भोंवतालचे पशुपक्षी; दूध, खाऊ वगैरे नेहमीं लागणारे पदार्थ यांचीं नांवें मुलांच्या बोलण्यांत प्रथम येतात. मुलें जरी एका शब्दांतच बोलत असतात, तरी त्या शब्दाच्या योगानें तीं पूर्ण वाक्याची कल्पना देत असतात. हा शब्द बोलतांना आपली कल्पना दुसऱ्याला स्पष्टपणें कळावी म्हणून तीं खुणांचाही उपयोग करितात. एकाच शब्दांत मुलांना एकापेक्षां जास्त कल्पना स्पष्ट करून दाखवाव्या लागत असल्यामुळें तीं एकच शब्द निरनिराळ्या वेळीं भिन्न अर्थानें वापरतात. एका दीड वर्षाच्या मुलीनें 'पाऊस' या शब्दाचा दोन दिवसांत तीन वेळां निरनिराळ्या अर्थांनीं उपयोग केला. सकाळीं पावसाकडे बोट दाखवून व आश्चर्याची मुद्रा करून ती 'पाउ' असें म्हणाली. यावरून 'पाऊस पडत आहे, तो पहा' असें तिला म्हणावयाचें होतें, हें उघड दिसलें. दुपारीं आपला भाऊ पागोळ्याचें पाणी हातावर घेत आहे असें तिनें पाहिलें. तेव्हां तिनें तळहात पुढें करून 'पाऊ' असें म्हटलें. यावरून 'मला पावसांत हात धरूं द्या,' असें तिला म्हणावयाचें होतें हें स्पष्ट दिसलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिचा भाऊ पावसांत उभा राहून भिजत होता, त्याजकडे बोट दाखवून ती पुन्हा 'पाऊ' असें म्हणाली. यावेळीं भाऊ पावसांत उभा आहे हें तिला सांगावयाचें होतें, हें उघड झालें. 'आई' या शब्दानें 'आई कोठें आहे?' 'मला आईकडे ने.' 'आईला एथें आणा,' वगैरे अनेक कल्पना लहान मुलें प्रदर्शित करितात. एका २१ महिन्यांच्या मुलीनें स्वयंपाक घराकडे बोट दाखवून म्हटलें, 'आई, गो गो बाळी', व त्यावरून

' मला सैंपाक घरांत ने म्हणजे आई मला ( बाळीला ) खाऊ देईल, एवढी कल्पना तिनें व्यक्त केली.

मुलें कित्येक वेळां एखादी वस्तु किंवा कृति पाहून, त्या वस्तूला किंवा कृतीला स्वतांच्या बुद्धीनें नांव देण्याचा प्रयत्न करितात. मांजर, कुत्रा, गाय, कावळा, चिमणी इत्यादि पशुपक्ष्यांच्या आवाजावरून ' माऊ ' ' भूभू ' ' हम्मा, ' ' काऊ, ' ' चिऊ ' इत्यादि नांवें त्या पशुपक्ष्यांना मुलांनीं दिलीं आहेत. बाबा, काका, दादा, मामा वगैरे नांवें देखील मुलांनीं आपल्या वडील माणसांना दिलीं असावींत. वस्तूला नांव देण्याच्या कामीं मुलें जी कल्पनाशक्ति दाखवितात तिजबद्दल पुष्कळ वेळां फार कौतुक वाटतें. एक लहान मुलगा दिव्याचा हिरवा ग्लोब पाहून त्याला चांदा ( चंद्र ) असें म्हणत असे. एका लहान मुलीनें आकाशांतील चांदण्या पाहून त्यांना ' दिऊ ' ( दिवा ) हें नांव दिलें. एका मुलाचें बोट विस्तवानें भाजलें तेव्हांपासून दिवा व विस्तव यांना तो ' हा ' असें म्हणत असे. ज्या कल्पना मनांत चाललेल्या असतात, त्या स्पष्ट करून दाखविण्यास योग्य ते शब्द माहित नसल्यामुळें, मुलें कित्येक वेळां मजेदार कृति करून आपला हेतु व्यक्त करितात. एक तीन वर्षांचें मूल आपल्या बापाच्या मांडीवर रात्रीं आंगणांत बसलें होतें. आकाशांत अनेक चांदण्या या वेळीं चमकत होत्या. मुलाचें लक्ष त्या चमचमणाऱ्या चांदण्यांकडे गेलें. आकाशांत चांदण्या लखलखत आहेत, ही कल्पना आपल्या शब्दांनीं त्या मुलाला आपल्या बापास सांगतां येईना. तेव्हां त्या मुलानें बोटानें त्या चांदण्या बापास दाखविल्या व ' चांदा ' असें म्हणून जलदीनें त्यानें आपल्या डोळ्यांची चार पांच वेळां उघड झाप केली व अशा प्रकारें लखलखण्याची कल्पना आपल्या बापाला उघड करून दाखविली. मुलांना अनुप्रासयुक्त शब्द बोलण्याची फार हौस असते. याचें कारण एकच उच्चार करण्यास सोपें जातें किंवा ध्वनीचा पुनरुच्चार कानाला आनंद देतो हें असावें. काका, मामा, दादा, भूभू, दुधू, हे शब्द या प्रवृत्तीच्या योगानें अस्तित्वांत आले.

प्रारंभीं मुलें नामांना विभक्तिप्रत्यय लावण्याच्या भानगडींत पडत नाहींत. बहुतेक नामांचें तीं मूळचेंच रूप वाक्यांत वापरतात. हळूहळू षष्ठी व चतुर्थी या विभक्तींचा तीं उपयोग करूं लागतात. लिंगाच्या संबंधानेंही पुष्कळ वेळां

मुलांचा फार गोंधळ उडतो. ' माऊ गेला ' ' यूयू आली ' असे हास्यास्पद वाक्यप्रयोग मुलें कधीं कधीं करितात. मराठी भाषेंतील शब्दांचीं लिंगें ओळखणें हें काम किती कठीण आहे याचा अनुभव जे परदेशस्थ लोक मराठी शिकतात त्यांना नेहमीं येतो. कानडी लोकांची, मराठी भाषा बोलतांना त्या भाषेंतील शब्दांचीं लिंगें न कळल्यामुळें जी फजीती होते, ती आपणां सर्वांस माहीत आहेच. " आम्ही तिला म्हणाले, ' सतारीचा खुंटी पिरगाळ ' तों तेणें आमची कानच पिरगाळला " वगैरे राणोजीरावी वाक्यरचना मराठी भाषेंतील शब्दांच्या सामान्यरूपाच्या व लिंगांच्या अज्ञानाचा परिणाम होय. मुलें चारपांच वर्षांचीं झालीं कीं, शब्दांच्या लिंगांच्या बाबतींत तीं चुकत नाहींत व विभक्तिप्रत्ययांचा देखील बरोबर उपयोग करूं लागतात, हें खरोखरीच मोठें आश्चर्य आहे.

प्रारंभीं मुलें नामाचाच जरी पुष्कळ उपयोग करीत असतात तरी या नामांच्या योगानें पूर्ण वाक्यांची कल्पना देण्याचा मुलें प्रयत्न करीत असतात, हें आपण वर पाहिलेंच आहे. यापुढें नामांच्या बरोबर ' गोड, ' 'हा' (तिखट), ' इशी ' ( वाईट ) इत्यादि विशेषणांचा उपयोग मूल करूं लागतें. नाम व विशेषण यांच्या योगानें वाक्याचें काम भागविण्याचा मुलांचा प्रयत्न सुरू होतो. ' काक गोड, ' ( साखर गोड आहे ), ' भू भू इशी, ' ( कुत्रा वाईट आहे ) वगैरे शब्दप्रयोग वाक्याचें काम करीत असतात. क्रियाविशेषणांचा उपयोग प्रारंभीं पुष्कळवेळां मुलें पूर्ण आज्ञार्थी वाक्याकरितां करीत असतात, जसें, ' भूर ' म्हणजे मला बाहेर घेऊन चल; ' तिके ' म्हणजे मला तिकडे ने. नामाच्या खालोखाल मुलें क्रियापदांचा उपयोग करितात. क्रियापदाचा उपयोग करितांना मुलें आज्ञार्थाचा उपयोग जास्त करितात. बालराजाला कुटुंबांतील सर्व मंडळीनें आपली आज्ञा शिरसावंद्य करावी असें वाटतें, यामुळें आज्ञार्थाचा त्यानें वारंवार उपयोग करावा हें साहजिकच आहे. ' गोगो दे ' ' भूर ने ' ' कडे घे, ' असे शब्दप्रयोग मुलांच्या तोंडून आपण नेहमीं ऐकत असतों. मुलांना सर्वनामाचा उपयोग करण्यास फार वेळ लागतो. मी, मला, माझ्या इत्यादि सर्वनामांच्या रूपांच्या ऐवजीं मुलें आपल्या नांवाचा उपयोग करितात. ' मला दे ' असें म्हणण्याच्या ऐवजीं ' बाबू दे, ' ' बाळी दे ' अशा प्रकारें आपलें नांव घालून शब्दरचना करण्याची प्रवृत्ति दोन तीन

वर्षांच्या मुलांत आपण नेहमीं पाहातों. एका दीड वर्षाच्या मुलीची टोपी तिच्या भावानें घेतली व ती माझी आहे असें तो म्हणाला. त्याबरोबर ती टोपी हिसकावून घेऊन ती म्हणाली, ' टोटो बाळी, ' ( ही टोपी बाळीची आहे. ) सर्वनामांचा उपयोग करावयाला विचारशक्तीची बरीच वाढ व्हावी लागते. प्रश्नार्थक सर्वनामांचा उपयोग मुलें आधीं करितात. मी व तूं या सर्वनामांचा उपयोग कारतांना प्रारंभीं मुलें फार घोंटाळा करितात. अगदीं लहान मुलें ' मला दे ' असें म्हणतांना आपण ऐकतों, पण वस्तु मागण्याच्या वेळीं इतर मुलें मला दे असें म्हणतांना मूल ऐकतें व तेच शब्द उच्चारतें; म्हणून त्यानें सर्वनामाचा उपयोग केला असें म्हणतां यावयाचें नाहीं. मुलें ७/८ वर्षांचीं होईपर्यंत त्यांना भाववाचक नामाचा चांगला उपयोग करितां येत नाहीं.

मुलें दोन वर्षांचीं झालीं कीं, पूर्ण वाक्यांचा तीं उपयोग करूं लागतात. कांहीं मुलें १॥ किंवा १॥। वर्षांचीं झालीं कीं वाक्यें बोलूं लागतात. कांहीं मुलांना पूर्ण वाक्यें बोलूं लागण्यास जास्त काळ लागतो.

मुलें वाक्यें जरी बोलूं लागलीं, तरी अपूर्ण वाक्यांचा भरणा त्यांच्या बोलण्यांत पुष्कळ असतो. संयुक्त वाक्यांचा उपयोग प्रारंभीं मुलांना करितां येत नाहीं. मिश्र वाक्यांचा उपयोग करण्याला याहीपेक्षां जास्त काळ लागतो. एका अमेरिकन शास्त्रज्ञानें आपल्या लहान मुलाचें बोलणें लक्षपूर्वक ऐकून टांचण करून ठेविलें. त्यावरून त्याला असें आढळून आलें, कीं हें मूल जेव्हां २८ महिन्यांचें झालें तेव्हां त्याच्या बोलण्यांत शेंकडा ३ संयुक्त वाक्यें येत व मिश्र वाक्य मुळींच येत नसे; पण हेंच मूल जेव्हां ४६ महिन्यांचें झालें तेव्हां त्याच्या बोलण्यांत शेंकडा २९ संयुक्त वाक्यें येऊं लागलीं; व मिश्र वाक्येंहि शेंकडा १४ या प्रमाणांत येऊं लागलीं. संयुक्त किंवा मिश्र वाक्यांचा उपयोग जरी प्रारंभीं मुलांना करितां येत नाहीं, तरी नुसते शब्दच एका जागीं आणून व थोड्याबहुत खुणांचा उपयोग करून मुलें आपला हेतु व्यक्त करितात. वडील माणसांच्या भाषणाकडे पूर्ण लक्ष देऊन शब्दांचीं निरनिराळीं रूपें, वाक्यांतील निरनिराळ्या प्रयोगांची रचना, लिंग, वचन व विभक्ति यांजमुळें नामांच्या रूपांत होणारे फेरफार या सर्वांचा मुलें मुकाट्यानें व शांतपणें अभ्यास करितात. व्याकरणाचे मुख्य नियम जरी त्यांना सांगतां येत नाहींत,

तरी ते त्यांना चांगले समजतात. कित्येक वेळां व्याकरणाच्या सामान्य नियमाला अपवादक असलेलीं रूपें त्यांच्या लक्षांत येत नाहींत व यामुळें त्यांचीं शब्दांची रूपें चुकतात. पण त्यांत त्यांचा कांहीं दोष नसतो. धातूला ' ला ' प्रत्यय लागून भूतकाळाचीं रूपें होतात हा सामान्य नियम आहे. मुलें या नियमाप्रमाणें बसला, हसला, धरला, निजला इत्यादि भूतकाळाचीं रूपें बनवितात व याच नियमान्वयें मरला, करला वगैरे रूपांचा उपयोग करितात. परंतु सामान्य नियमाला मर कर वगैरे धातु अपवाद आहेत ही गोष्ट त्यांच्या लक्षांत येण्यास बरेच दिवस लागतात.

मूल भाषा शिकण्याला पांचव्या किंवा सहाव्या महिन्यापासून सुरुवात करितें हें मागें सांगितलेंच आहे. सातव्या आठव्या महिन्यापासून एखाद्या दुसऱ्या शब्दाचा उपयोग तें समजून करूं लागतें. प्रारंभीं दोन तीन वर्षें मुलाला जरी फारसे शब्द बोलतां येत नाहींत, तरी बरेचसे शब्द त्याला समजतात. एखाद्या दीड वर्षाच्या मुलाला आप्पा कोणता, बाळ कोणता, ताई कोणती वगैरे प्रश्न विचारल्यास तें बरोबर त्या त्या माणसाकडे पाहातें. ' मला बूक दे, मला पाटी दे ' म्हटल्यास तें मूल त्या त्या जिनसा आपणांस देतें, यावरून त्यांला यांपैकीं कांहीं शब्द बोलतां येत नाहींत तरी ते त्याला समजतात हें उघड होतें. कांहीं मुलें तर दोन तीन वर्षें बोलत नाहींत, पण दुसऱ्यानें बोललेले बरेचसे शब्द त्यांना समजतात. मूल चालावयास शिकूं लागल्यापासून त्याला चांगलें चालतां येईपर्यंत त्याचें भाषा शिकण्याचें काम थांबतें असें म्हणण्यास हरकत नाहीं; कारण दोन गोष्टी एकदम शिकण्यास त्यास कठीण जातें. मुलाला चांगलें चालतां येऊं लागलें कीं तें भाषा शिकण्याचा आपला उद्योग पुन्हा जोरानें सुरू करतें. साधारणपणें पहिल्या वर्षाच्या शेवटीं मुलाला ५।१० शब्दांचा बरोबर उपयोग करितां येतो; व ३०।४० शब्द त्याला समजतात.

घरांतील माणसें ज्याप्रमाणें शुद्ध अगर अशुद्ध बोलतात त्याचप्रमाणें मूल शुद्ध अगर अशुद्ध बोलतें. शब्दांचा उच्चार, बोलण्याची पद्धति, शुद्ध अगर अशुद्ध वाक्यरचना इत्यादि सर्व गोष्टींत मूल वडील माणसांचें अनुकरण करीत असतें. आईबापांनीं किंवा वडील माणसांनीं मुलांशीं बोलतांना साध्या

व शुद्ध भाषेंत बोलावें. त्यांनीं बाल-भाषेचा अगर मुलाच्या बोबड्या शब्दांचा उपयोग करूं नये. मुलांना जितकी शुद्ध भाषा ऐकावयास मिळेल तितकें चांगलें. मुलांशीं बोलतांना शिक्षकानें व पालकांनीं अवघड शब्द व मोठमोठालीं वाक्यें यांचा उपयोग करूं नये. मिश्र वाक्यें, भाववाचक नामें, सामासिक शब्द यांचा उपयोग मुलांशीं बोलतांना शक्य तितका टाळावा. मुलांनीं शब्दाचा चुकून उपयोग केल्यास ती चूक त्यांना समजावून सांगावी.

मुलें साधारणपणें ४।५ वर्षांचीं होईतोंपर्यंत थोडेंबहुत बोबडें बोलतात. वर्णांचा उच्चार करण्यास स्नायूंला जें कौशल्य लागतें तें त्यांना फारसें नसल्यामुळें कांहीं कांहीं वर्णांचा शुद्ध उच्चार मुलांना करितां येत नाहीं. कांहीं मुलें कंठ्य वर्णांऐवजीं तालव्य वर्णांचा उपयोग करितात. कांहीं मुलें तालव्य वर्णांच्या ऐवजीं मूर्धन्य वर्णांचा उपयोग करितात. मराठींतील ट ठ ड ढ ण हे वर्ण यूरोपियन लोकांसही उच्चारण्यास कठीण जातात व त्याऐवजीं ते दंत्य वर्णांचा उपयोग करितात. त्याचप्रमाणें पुष्कळ लहान मुलें ट, ठ, ड, ढ, ण, यांच्या ऐवजीं त थ द ध न या वर्णांचा उपयोग करितात. 'श' अथवा 'ष' याच्या ऐवजीं 'स,' 'ळ' चे ऐवजीं 'ल' असा उच्चार करणारींही कांहीं मुलें आढळतात. मुलांना उच्चार शुद्ध करण्यास शिकविलें पाहिजे. या कामीं आईबापांनीं व वडील माणसांनीं काळजी घेतली कीं, मुलें हळू हळू वर्णांचा शुद्ध उच्चार करूं लागतात. या कामीं वडील माणसांनीं घाई करितां कामा नये.

बालविद्यार्थ्यांची जन्मभाषा शिकण्याची आस्था, त्यांचे परिश्रम व त्यांचा दीर्घोद्योग हीं अत्यंत आश्चर्यकारक असतात. शेंकडों शब्दांचा संग्रह करणें, निरनिराळ्या रूपांची तुलना करून त्यांतील नियम शोधून काढणें, अपवादात्मक रूपें लक्षांत ठेवणें इत्यादि कठीण गोष्टी हे बाल-विद्यार्थी स्वयंस्फूर्तीनें करितांना पाहून कोणास त्यांचें कौतुक करावेंसें वाटणार नाहीं !

# भाग २३ वा

## उपसंहार

आतांपर्यंत आपण बालमनासंबंधानें जें विवेचन केलें त्याजवरून बालमनासंबंधानें शिक्षकानें व पालकानें कोणत्या विशेष गोष्टी लक्षांत ठेविल्या पाहिजेत व मुलाच्या बौद्धिक व नैतिक शिक्षणाचे बाबतींत कोणती काळजी घेतली पाहिजे याचा पुन्हा एकदां थोडक्यांत विचार करूं.

मूल जन्मास येतें त्यावेळेस त्याच्या शारीरिक व मानसिक शक्ति बीजरूपानें असतात. त्यांचा हळूहळू विकास व्हावयाचा असतो. चेहरा, रंग, शरीराची ठेवण इत्यादि गोष्टींत मूल आपल्या आईचें, बापाचें अगर दुसऱ्या एखाद्या पूर्वजाचें अनुकरण करतें, म्हणजे या गोष्टी त्याला अनुवंशिकतेनें प्राप्त झालेल्या असतात. कांहीं मानसिक गुणही त्याला आईबापांपासून अगर इतर पूर्वजांपासून मिळतात असें कांहीं शास्त्रज्ञांनीं सिद्ध केलें आहे, पण अद्यापि या बाबतींत पुष्कळ शोध व्हावयाचा आहे. आईबापांला व शिक्षकाला मुलांत अनुवंशिक जे चांगले गुण असतील त्याचा विकास करावयाचा असतो व जे दुर्गण किंवा दोष असतील ते नाहींसे करावयाचे असतात. शारीरिक शिक्षणालाही हाच नियम लागू पडतो. प्राणिमात्राचें रक्षण, पोषण व वंशवृद्धि व्हावी म्हणून सर्व प्राण्यांत कांहीं सर्वसाधारण सहजप्रवृत्ति असतात. याशिवाय कांहीं प्राण्यांना त्यांच्या विशिष्ट आयुष्यक्रमाला उपयोगी अशा जास्त सहजप्रवृत्ति आलेल्या असतात. मनुष्यप्राण्याला इतर प्राण्यांपेक्षां जास्त सहजप्रवृत्ति आहेत. या सर्व सहजप्रवृत्ति मूल जन्मल्यावर लागलींच जागृत होऊन काम करावयास लागत नाहींत. मुलाच्या आयुष्यक्रमांत योग्य काळीं त्या त्या प्रवृत्ति जागृत होऊन काम करूं लागतात. मुलाच्या सहजप्रवृत्तींना इष्ट तें वळण देणें हें महत्त्वाचें काम आईबाप व शिक्षक यांना करावयाचें असतें.

जन्मापासून पहिल्या तीन महिन्यांचा बहुतेक काळ मूल झोपेंत घालवितें. भूक लागली कीं जागें व्हावें, आईच्या अंगावर प्यावें व लागलींच झोपीं जावें असा त्याचा आयुष्यक्रम असतो. जागें झाल्यावर तें रडतें व थोडेंबहुत हातपाय हालवितें. या व्यवसायानें या कालांत त्याला भरपूर व्यायाम होतो.

त्याचा मेंदू व शरीर यांची वाढ या कालांत फार जोरानें चाललेली असते. यापुढें मूल दिवसांतून अर्धा पाऊण तास जागें राहतें. जागें राहिलें कीं तें सारखें हातपाय हालवितें. प्रथम त्याची दृष्टि स्थिर नसते पण हळूहळू स्थिर होऊं लागते. मग मूल टक लावून एखाद्या पदार्थाकडे पाहूं लागतें. जवळ आवाज झाला कीं तिकडे तें पाहूं लागतें. दुधाची वाटी, काजळाची डबी वगैरे त्याच्या समोर नेहमीं येणारे व त्याच्या शरीराला सुखदुःख देणारे पदार्थ मूल ओळखूं लागतें. आई त्याच्या शारीरिक गरजा भागविते म्हणून ती त्याला ओळखूं येते. हळूहळू मूल पदार्थ हातांत घेऊं लागतें. तें पांचव्या सहाव्या महिन्यापासून सरकूं लागतें व मग रांगूं लागतें. कृतिप्रेम, जिज्ञासा या त्याच्या सहजप्रवृत्ति जागृत होऊं लागतात व त्यांच्या व्यापारांमुळें मुलाच्या ज्ञानेंद्रियांची शक्ति वाढते व त्याच्या ज्ञानांत भर पडते. मूल एक वर्षाचें झालें कीं बोलूं लागतें. त्याची अनुकरणाची स्वाभाविक वृत्ति जागृत होते व तें वडील माणसांची कृति पाहून अनेक कृति करतें. बोलणें, चालणें, जेवणें, पाणी पिणें इत्यादि अनेक कृति करण्यास तें या अनुकरणवृत्तीमुळेंच शिकतें. एक वर्षाच्या वयाच्या मुलाचें ज्ञान बरेंच वाढलेलें असतें व त्याच्या स्नायूंत चपलता व सामर्थ्य हींही बरींच येतात. पलायनप्रवृत्ति, जिज्ञासा, कृतिप्रेम या सहज-प्रवृत्ति आणि खेळाची व अनुकरणाची स्वाभाविक वृत्ति त्याच्यांत जागृत झालेली असते.

दुसऱ्या वर्षी मूल चालूं लागतें. त्याच्या मेंदूची, शरीराची वाढ एक-सारखी सुरू असते. ज्ञानसंग्रह करण्याचें व भाषाज्ञान संपादन करण्याचें त्याचें काम सतत सुरू असतें. स्वतांची जाणीव मुलाला हळूहळू होऊं लागते. वडील मंडळींनें आपणालाच घ्यावें, आपलेच लाड करावे अशी त्याला प्रबळ इच्छा असते. एखादी क्रिया केली व तिजपासून शारीरिक सुख झालें, तर मूल ती क्रिया पुन्हा पुन्हा करतें व एखादी क्रिया केली व तिजपासून त्याला त्रास झाला, तर ती क्रिया करण्याचें तें टाळतें. दीड दोन वर्षांचें मूल झालें कीं, ज्ञानेंद्रियांनीं वस्तूसंबंधानें त्याला जे निरनिराळे बोध झालेले असतात, त्यांचा एकमेकांशीं संबंध लावण्याचें त्याचें कार्य सुरू होतें. विचार-शक्तीच्या व्यापाराचा हा प्रारंभ आहे.

मुलाची कृतिप्रेम ही सहजप्रवृत्ति दुसऱ्या वर्षापासून जास्त जोरानें काम करूं लागते व मूल अनेक कृति मोठ्या आवडीनें करूं लागतें. या कृतींच्या योगानें मुलाच्या स्नायूंतील चापल्य व सामर्थ्य हीं वाढतात. या कृति करीत असतांना वस्तूंचे गुणधर्म त्याला कळतात. मुलाच्या कृतिप्रियतेला भरपूर व योग्य संधि मिळाली नाहीं, तर त्याचा शारीरिक व मानसिक विकास थांबतो. मूल अजाण असतें याकरितां त्याच्या कृतींपासून त्याला त्रास होणार नाहीं अशी काळजी मात्र वडील माणसांनीं घेतली पाहिजे.

दुसऱ्या वर्षापासूनच मुलाला नियमितपणाच्या व स्वच्छतेच्या संवयी लावण्यास सुरुवात केली पाहिजे. नियमित ठिकाणीं शौचाला किंवा लघवीला बसण्याची, लघवीनें कपडे खराब न करण्याची, नियमित वेळीं निजण्याची व उठण्याची संवय मुलाला लाविली पाहिजे. याच वयापासून मुलाला दुसऱ्या मुलांत मिसळण्याची संवय हळूहळू लाविली पाहिजे. चौथ्या वर्षापासून मुलाला बरोबरीच्या मुलांत खेळण्याची हौस उत्पन्न होते. घरांत किंवा शेजारीं मुलाच्या बरोबरीचीं मुलें नसणें हें शिक्षणदृष्ट्या अनिष्ट आहे. आईबापांनीं मुलाचे फाजील लाड करून त्याला अगदीं जवळ बाळगितां कामा नये. मुलाच्या भोवतीं प्रेमाचें वातावरण पाहिजे ही गोष्ट जरी खरी आहे, तरी लाडानें त्याला बिघडाविणें, त्याला नेहमीं जवळ बाळगिणें, त्याला मुलांत मिसळूं न देणें हें चांगलें नाहीं. मूल समाजांत मिसळल्याशिवाय त्याच्या मनाचा विकास होत नाहीं. मूल आपल्या समवयस्क सोबत्यांत जितकें जास्त मिसळतें तितका त्याच्या मनाचा विकास जास्त होतो.

बाल्याचा काळ हा खेळाचा काळ होय. खेळ हाच मुलाचा खरा शिक्षक होय. खेळाच्या योगानें मुलाच्या स्नायूंना चापल्य, सामर्थ्य व कौशल्य यांचा लाभ होतो. शरीराला इष्ट तो व्यायाम मिळतो व त्याची चांगली वाढ होते. मुलाच्या मानसिक विकासाला खेळासारखें दुसरें साधन नाहीं. पालकांनीं मुलाला निरनिराळ्या प्रकारचीं खेळणीं अवश्य पुरविलीं पाहिजेत. खेळण्यांच्या योगानें मुलांचें रचनाचातुर्य वाढतें. तीन ते आठ वर्षांच्या मुलांचा काळ खेळानें व कृतींनीं ज्ञानेंद्रियांना व्यवसाय देऊन ज्ञानसंपादन करण्याचा असतो. या काळांत मुलाला एके जागीं डांबून बसविणें, त्याला स्वतंत्रतेनें उड्डं-बागडूं

न देणें, त्याला खेळूं न देणें, त्याला मुलांत मिसळूं न देणें, त्याला खेळाचें साहित्य न पुरविणें हें त्याच्या मानसिक व शारीरिक विकासाच्या दृष्टीनें अत्यंत अनिष्ट आहे.

पांचव्या वर्षांपासून मुलाला गोष्टी आवडूं लागतात. या वेळीं आईबापांनीं व वडील माणसांनीं त्याला कळतील व आवडतील अशा मनोरंजक गोष्टी सांगितल्या पाहिजेत. सध्यां बहुतेक पालकांना मुलांना गोष्टी सांगण्याचा फार कंटाळा येतो व मुलांना सांगण्याजोग्या गोष्टींचा संग्रहही त्यांच्याजवळ नसतो. सहाव्या सातव्या वर्षांपासून मुलांना अद्भुत कथा आवडूं लागतात. गोष्टी या नैतिक शिक्षणाचें फार मोठें साधन आहे. मुलांचा शब्दसंग्रह गोष्टींच्या योगानें फार वाढतो.

लहानपणापासून मुलाला स्वावलंबनाची संवय लावावी. पांचव्या वर्षांपासून तर मुलानें तोंड धुणें, कपडे घालणें, स्नान करणें, आपला पाट, ताट व लोटी घेऊन जेवावयास बसणें वगैरे कृति स्वतां व्यवस्थितपणें केल्या पाहिजेत. आपल्या वस्तु जेथल्या तेथें ठेवण्याची त्याला संवय लागली पाहिजे. खेळ खेळून स्वतांचें मनोरंजन करून घेण्याचीही त्याला संवय झाली पाहिजे. कांहीं आईबाप मुलाचे इतके कांहीं लाड करितात कीं ते त्याच्या सेवेला सतत तयार असतात. यामुळें त्या मुलाला स्वतःचें कोणतेंच काम करितां येत नाहीं. प्रत्येक क्षुल्लक गोष्टीकरितां त्याला आईबापाची जरूर लागते. परावलंबनाची ही संवय लहानपणीं जडली कीं, ती सर्व आयुष्यभर तशीच राहते व त्या योगानें मनुष्याचें फार नुकसान होतें. याच्या उलट कांहीं आईबाप मुलाच्या कोणत्याच गोष्टीकडे जरूर तें लक्ष पुरवीत नाहींत. यामुळें मुलाला कोणतीच कृति व्यवस्थितपणें व नीटनेटकी करितां येत नाहीं. नेहमीं अव्यवस्थितपणें काम केल्यानें व्यवस्थितपणाची संवयच मुलाला लागत नाहीं.

दुसरी एक महत्त्वाची गोष्ट आईबापांनीं लक्षांत ठेविली पाहिजे, ती ही कीं मुलाला परिस्थितीशीं झगडण्याचें शिक्षण लहानपणापासून मिळालें पाहिजे. मनुष्याच्या आयुष्यांत अनेक अडचणी व अनेक संकटें येत असतात. मनुष्याला या अडचणींशीं व संकटांशीं झगडून आपलें साध्य प्राप्त करून घ्यावयाचें असतें. परिस्थितीशीं झगडण्याला धैर्य, आत्मविश्वास व अनुभव लागतो.

लहानपणापासूनच मुलाला परिस्थितीशीं झगडण्याचें शिक्षण मिळालें पाहिजे. पण पुष्कळ आईबाप मुलाच्या प्रेमातिशयामुळें मुलाला हें शिक्षण मिळूंच देत नाहींत. टोपी सांपडली नाहीं कीं बाबू आईकडे रडत जातो व आई हातांतील काम टाकून त्याला टोपी शोधून देते. मुलाला आंगांत सदरा घालतां येत नाहीं असें पाहिल्याबरोबर बाप झटकन येतो व मुलाच्या आंगांत सदरा घालतो. फळीवरील एखाद्या जिनसेला मुलाचा हात पोहोंचत नसला, तर वडील चटकन येऊन ती वस्तु काढून मुलाला देतात. शेजारच्या गणूनें बाबूला जर वेडावलें, तर बाबू गळा काढतो व आईकडे जातो. मग आई बाहेर येऊन गणूला रागें भरते. वडील माणसांच्या या असल्या कृतींमुळें मुलाला अडचणींना तोंड देण्याची संवयच लागत नाहीं. मुलाच्या ज्या अडचणी त्याला स्वता दूर करितां येतील, त्या स्वतांच दूर करण्याची मुलाला लहानपणापासून संवय लाविली पाहिजे म्हणजे मुलाच्या मनांत आत्मविश्वास व धैर्य हीं उत्पन्न होतात. मनुष्याच्या मनांत आत्मविश्वास व धैर्य हीं असलीं कीं तो कोणत्याही परिस्थितींत असला, तरी आलेल्या अडचणींना व संकटांना तोंड देऊन आपलें साध्य प्राप्त करून घेण्याचा यत्न करितो.

मुलाच्या आयुष्यांतील चवथ्या वर्षापासून सहाव्या वर्षाअखेरचा काळ फार महत्त्वाचा असतो. या काळांत त्याच्या शरीराची व बौद्धिक विकासाची फार काळजी घ्यावी लागते. सुधारलेल्या देशांत या वयाच्या मुलांची फार काळजी घेतात. या वयांतील मुलांकरितां शिशुशाळा ( Nursery School ), बालोद्यान शाळा, मांटेसरी शाळा अशा किती तरी प्रकारच्या शाळा तिकडे चालविलेल्या असतात. याशिवाय या वयांतील मुलांना खेळण्याकरितां मुद्दाम केलेले बाग असतात. या बागांत मुलांना अनेक खेळ खेळण्याची सोय केलेली असते. खेळांचें सर्व साहित्य तेथें तयार असतें. आईबापही आपल्या मुलांची शिक्षणदृष्टया शक्य तेवढी जास्त काळजी घेतात. ते सुटीच्या दिवशीं आपल्या मुलांना बरोबर घेऊन चित्रशाळा, अजबखाना, पशुसंग्रहालय अथवा गांवाबाहेर एखादें सुंदर स्थळ पाहाण्यास मुलांना घेऊन जातात. मुलांना सृष्टिसौंदर्याची गोडी लागावी, म्हणून वर्षांतून आठ पंधरा दिवस ते समुद्रकांठीं अथवा एखाद्या सरोवराच्या तीरावर अगर डोंगरावर राहण्यास जातात. आपण यांपैकीं कांहींच करीत नाहीं. फार झालें, तर उज-

ळणीं, वाचन, लेखन वगैरे विषय मुलांला अगदीं लहानपणींच शिकविण्याकरितां एखादा शिक्षक ठेवितों व त्याला दोन तीन रुपये दरमहा देतों. तो ठरलेल्या धोपट मार्गानें विद्यामृताचे घुटके लहान मुलाला बळेंदळें पाजतो. पण यायोगानें मुलाच्या मनाचा विकास तर होत नाहींच पण त्या मुलाला विद्येची शिसारी मात्र बसते.

सहाव्या वर्षापासून मूल शाळेंत जातें. मुलाच्या शारीरिक, मानसिक व नैतिक शिक्षणाचें केवढें मोठें कार्य प्राथमिक शाळेला करावयाचें असतें, व हें महत्त्वाचें कार्य जर शाळेनें केलें, तर बालमनाचा योग्य असा विकास सहज होईल. परंतु हें महत्त्वाचें कार्य आपल्या इकडील शाळांतून होत नाहीं अथवा अगदीं थोडें होतें असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें.

आपल्या प्राथमिक शाळांतून खालच्या वर्गांत मुलांची अगदीं गर्दी असते. शिशुवर्गांत बहुधा ४० च्या खालीं मुलें नसतात. कित्येक शाळांत शिशुवर्गांत व पहिल्या इयत्तेंत एका शिक्षकाच्या हाताखालीं ६० ते ७० मुलेंही दिलेलीं असतात. वर्गांत बसावयालाही पुरेशी जागा नसते; यामुळें मुलांना बिलकुल हालचाल करितां येत नाहीं. अशा स्थितींत मुलें तीनचार तास शिकत असतात. शाळेंत साहित्य नाहीं, खेळावयाला जागा नाहीं, मुलांना आनंददायक असा व्यवसाय नाहीं, मोकळी व स्वच्छ हवाही नाहीं, अशा स्थितींत हीं ५--६ वर्षांचीं मुलें काय शिकत असतील याची कल्पनाच करावी. कित्येक वेळां या वर्गांची हवा इतकी दूषित झालेली असते कीं बाहेरच्या स्वच्छ हवेंतून येणाऱ्या माणसाला त्या दूषित हवेची तेव्हांच घाण येते. प्राथमिक शिक्षणाची व सक्तीच्या शिक्षणाची कळकळ बाळगणाऱ्या कांहीं गृहस्थांनीं प्रत्येक शिक्षकाच्या हाताखालीं ८० मुलें दिलीं व शाळा दुबार भरविल्या कीं, शिक्षणाचा प्रश्न कोणास तोषीस न लागतां ताबडतोब समाधानकारक पद्धतीनें सुटेल असें प्रतिपादन केलें आहे !

पालकांच्या अनास्थेमुळें, समाजाला प्राथमिक शिक्षणाची खरी किंमत कळत नसल्यामुळें, व लहान मुलांना शिक्षण देण्याची पात्रता असणाऱ्या शिक्षकांच्या कमतरतेमुळें प्राथमिक शाळांतून मुलांच्या मनाच्या विकासाचें कार्य समाधानकारक होत नाहीं असें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. मुलांच्या मान-

सिक विकासाला अनुकूल परिस्थिति असणारीं कुटुंबेंही फार थोडीं असतात. या कारणामुळें आमच्या देशांतील मुलांच्या मनाचा विकास इतर देशांतील मुलांच्या मानानें फारच कमी होतो यांत नवल नाहीं.

मुलांच्या शारीरिक, बौद्धिक व नैतिक शिक्षणाच्या दृष्टीनें मुलांचा बाल्याचा काळ फार महत्त्वाचा असतो. या काळाचा सदुपयोग झाला नाहीं, तर मुलांची शिक्षणदृष्टया फार हानी होते. या वयांत मुलाला खेळण्यास भरपूर अवसर दिला पाहिजे. त्याच्या अभ्यासक्रमांत शैक्षणिक खेळ, गाणीं, संभाषणें, व्यवसाय, हातकाम व सृष्टिनिरीक्षण यांचा अंतर्भाव झाला पाहिजे. शिकत असतांना स्वतां कृति करून ज्ञान मिळविण्याची मुलाला संधि मिळाली पाहिजे. शाळेंतील व घरचें वातावरण प्रेमाचें असलें पाहिजे. मुलाची जिज्ञासा, कृतिप्रियता, स्वाभिमान यांना उत्तेजन दिलें पाहिजे. मुलांच्या कृतीकडे मुलांच्या दृष्टीनें शिक्षकांनीं व पालकांनीं पाहिलें पाहिजे. घरांतील व शाळेंतील स्वच्छता व टापटीप नमुनेदार असली पाहिजे. या सगळ्या गोष्टी मुलाच्या मानसिक विकासाला अत्यंत आवश्यक आहेत.

बालमन हा विषय अत्यंत मनोरंजक व महत्त्वाचा आहे. मुलाच्या मनाचा विकास करणें हें अत्यंत पवित्र व कौशल्याचें काम आहे. प्रेमळ, कर्तव्यदक्ष व शहाण्या आईबापांशिवाय व अशाच शिक्षकांशिवाय इतरांस तें साधावयाचें नाहीं. कितीतरी पालक व शिक्षक या बालमनाचा विकास आपल्या अजाणतेमुळें खुंटवून टाकीत असतात. मुलाच्या मनाचा विकास होण्याला त्याच्याभोंवतीं प्रेमाचें व स्वतंत्रपणाचें वातावरण पाहिजे. पालकांना व शिक्षकाला बालमनाच्या विकासाचें महत्त्वच वाटत नाहीं. मुलें ही राष्ट्राची अत्यंत बहुमोल संपत्ति आहे. शाळेंत व घरीं बालमनाच्या विकासाला योग्य संधि न दिल्यामुळें आमची ही संपत्ति आम्ही उधळून टाकीत आहों. मुलाची जिज्ञासा स्वाभिमान, कृतिप्रियता, स्वतंत्र विचार, बुद्धिमत्ता यांचा आमच्या घरच्या अनास्थेमुळें किंवा कडक शिस्तीमुळें व शाळेंतील शिक्षकाच्या बेपर्वाईमुळें, उद्दामपणामुळें, स्वार्थामुळें अथवा अडाणीपणामुळें नाश होत आहे. समाज, पालक व शिक्षक यांना बालमनाच्या विकासाचें महत्त्व ज्या दिवशीं वाटूं लागेल त्या दिवसापासून या देशाच्या भाग्याचा उदय होईल.

परलोकवासी कवि नारायणराव टिळक यांना बालमनाच्या विकासाचें अत्यंत महत्त्व वाटत असे. त्यांचें बालमनाचें निरीक्षण अत्यंत सूक्ष्म होतें. प्रत्येक शिक्षकानें व पालकानें टिळकांची ' लेंकराची जिज्ञासा ' ही कविता अवश्य वाचावी व मुखोद्गत करावी. तिच्यांत शिक्षणशास्त्राचें सार भरलें आहे. इकडील 'प्राथमिक शिक्षक,' 'शिक्षक' वगैरे मासिक पुस्तकाच्या मुखपृष्ठावरील श्लोक याच कवितेंतून घेतले आहेत. या कवितेंतील पहिलाच श्लोक किती गोड आहे ?

ईषत्प्रफुल्ल सुमना करिं बाळगावें<br>
किंवा मृदुस्मित मुलाप्रति खेळवावें<br>
कीं तन्मनःकुसुम रम्य करीं धरावें<br>
उत्फुल्ल शिक्षणसुधाकिरणीं करावें

बालमनाला फुलाची दिलेली उपमा किती गोड आहे ! शिक्षकाचा धंदा कोणीं करावा याविषयीं टिळक म्हणतात :

जरि असेल रसज्ञपणा पुरा<br>
जरि परोपकृतीच मनोहरा<br>
जरि असे चतुरत्व तरी मुला<br>
शिकविण्यासम छंद नसे भला

या श्लोकांतील छंद शब्द फार सुंदर आहे. जो शिक्षक, जी आई व जो बाप मुलाला उत्तम प्रकारें शिक्षण देऊन मुलाच्या मनाचा विकास करितो तो धन्य आहे यांत शंका नाहीं. टिळक म्हणतात :—

' तो धन्य तो सुकृति जो शिकवील याला ! '

—समाप्त—